

**डॉ. राम म्हैसाळकर**

जन्म : अमरावती २९.५.१९२९
शिक्षण : बी. एस्सी., एम. बी. बी. एस
व्यवसाय : खाजगी वैद्यकीय
माजी उपाध्यक्ष : स्वर साधना संगीत समाज, मैफिल नागपूर
माजी अध्यक्ष : नाट्य वलय, नागपूर
प्रसिद्ध पुस्तके : **धीर वीर पुरुष पदा** - (खाडीलकरांच्या नाटकांवरील टीकात्मक नाट्यप्रयोग ह्याचे अनेक प्रयोग झाले.)

**रवीन्द्र गीतांजली....**
(गुरुदेव टागोर ह्यांच्या Lover's Gift; Gardner; Geetanjali ह्या काव्य संग्रहांचा आणि मूळ बंगाली गीतांजली ह्या पुस्तकांचे मराठी भावानुवाद ह्या पुस्तकाला महाराष्ट्र साहित्य परिषदेचे सर्वोत्कृष्ट भावानुवादाचे स. ह. मोडक पारितोषिक मिळाले.)

**रवीन्द्र भावांजली ....**
(शिशु ह्या बंगाली आणि Crossing ह्या इंग्रजी काव्यसंग्रहांचा भावानुवाद)

**रवींद्र काव्यांजली....**
(नैवेद्य, खेया, बलाका ह्या बंगाली संग्रहांचा भावानुवाद)

**एक होता गंधर्व** या पुस्तकाला विदर्भ साहित्य संघाचे न. कृ. क्न्हाडपांडे स्मृति पारितोषिक मिळाले.
अनेक संगीत आणि गद्य नाटकांचे यशस्वी दिग्दर्शन आणि त्यात पारितोषिके.

**मानव मंदिरचे 'स्मिता पाटील' पारितोषिक**

'स्वगत स्वागत' 'ततः प्रविशति सूत्रधारः ।'
'सुरेल शब्द' 'अखंड मुरली वाजे'
'खाडिलकरांच्या पंचनायिका' इत्यादि समीक्षापूर्ण आणि वैचित्र्यपूर्ण कार्यक्रमाचे लिखाण आणि यशस्वी मंचन इत्यादि

# रवीन्द्र गीतांजली...

गुरुदेव रवीन्द्रनाथ टागोर ह्यांच्या
Lover's Gift, Gardener, Gitanjali
आणि मूळ बंगाली गीतांजली ह्या चार काव्यसंग्रहांचा
मराठी गद्य भावानुवाद





- डॉ. राम म्हैसाळकर
बी.एस्सी., एम्.बी.बी.एस.

प्रकाशक :
भवान म्हैसाळकर
२८ हिंदुस्थान कॉलनी, वर्धा रोड, नागपूर - ४४० ०१५
दूरभाष - ०७१२-२२२६४३८

प्रकाशन क्रमांक : २

प्रकाशक :
**भवान म्हैसाळकर**
२८ हिंदुस्थान कॉलनी,
वर्धा रोड, नागपूर - ४४० ०१५
दूरभाष - ०७१२-२२२६४३८



मुद्रक :
**नारायण ऑफसेट वर्क्स**
२२४, टिकेकर रोड, धनतोली,
नागपूर-१२ फोन : ५२२६४२

मूल्य रुपये ३००/-

साधारणपणे १९५२ च्या सुमाराला माझी मनःस्थिती फार बिकट झाली होती. जीवन ओझं वाटावं अशा परिस्थितीत दिवस जात होते. हे ओझं झटकून टाकावं असं अनेक वेळा वाटत असायचं. जीवनातला सारा रस निघून गेला आहे. कसातरी अस्तित्व टिकवायचा प्रयत्न करतोय् असं प्रकर्षानं जाणवायचं. त्या वेळी माझं मेडिकल कॉलेजमधलं शिक्षण चालू होतं. अशाच विमनस्क अवस्थेत रस्त्यातून हिंडत होतो. आणि कसा कुणास ठाऊक एका पुस्तकाच्या दुकानासमोर थबकलो. बाहेर प्रदर्शनार्थ मांडलेल्या पुस्तकांपैकी एक पुस्तक उचललं. मधलंच कुठलं तरी पान उघडून वाचू लागलो -

When the heart is hard and parched up,
Come upon me with a shower of mercy.
When grace is lost from life, come with a burst of song....

आणि मी थबकलो !... मला वाटलं कुणी तरी माझी मनःस्थिती समजून मला धीर देतय्. आधाशासारखी ती कविता वाचून काढली. पुन्हा पुन्हा वाचत राहिलो... लहानशीच कविता होती.

When my beggarly heart sits crouched, shut up in a corner, break open the door, my king, and come with a ceremony of a king !

वाटलं कुणीतरी आपल्या खांद्यावर हात ठेवून आश्वासन देतोय... हेही दिवस जाणार आहेत... धीर धर !

ते पुस्तक गुरुदेव रवीन्द्रनाथांचं गीतांजलीचं होतं. पुस्तक विकत घेऊन होस्टेलवर गेलो.. सारं पुस्तक वाचून काढलं. लहानसं पुस्तक होतं. फक्त लहान लहान १०३ कवितांचं !

त्यातली ही ३९ नंबरची कविता माझा पाठलाग करू लागली. मला haunt करू लागली.. मला धीर देत राहिली.. माझं नैराश्य पार कुठल्या कुठं पळालं. आणि नंतर भक्तिभावानं, श्रद्धेनं एखादी पोथी वाचावी तशी मी गीतांजली वाचू लागलो... रोजचा हा कार्यक्रम झाला आणि नंतर त्यातल्या कवितांचा मराठीत भावानुवाद करू लागलो. नंतर गार्डनर, लव्हर्स गिफ्ट, हे संग्रह विकत घेतले त्यातल्या कवितांचे देखील भावानुवाद करायला सुरूवात केली. साधारणपणे १९५२-५८ ह्या काळातले हे भावानुवाद आहेत आज ४० वर्षानंतर ते प्रसिद्ध होत आहेत. ह्या कवितांचा मला मराठीत भावानुवाद करावासा का वाटला याचं समर्पक उत्तर माझ्या जवळ नाही. अनेकदा त्या दिवशी वाचलेल्या कवितांपैकी एखादी कविता माझ्या समोर अचानक उभी राही. माझ्या बरोबर बरोबर वावरू लागेल. मनांत गुणगुणत राही.... सुरवातीला मूळ इंग्रजीत आणि मग पटकन् मराठीत. नंतर ती मी लिहून काढी.

ह्या भावानुवादाची ही अंशी कथा आहे.

टागोरांच्या कवितांवर भाष्य करण्याची माझी पात्रता नाही. तसा प्रयत्न देखील मी करणार नाही.

ह्या अनुवादाचं स्वागत कसं होईल. मला सांगता येणार नाही. एकच मनापासून वाटतं. मला जे समाधान ह्या कविता वाचून मिळालं ते सर्वांना मिळावं.


**- राम म्हैसाळकर**
२१.११.९९

२८, हिंदुस्थान कॉलनी
वर्धा मार्ग, नागपूर - ४४० ०१५
दूरभाष - ०७१२-२२२६४३८




# प्रस्तावना

डॉक्टर राम म्हैसाळकर हे व्यवसायाने वैद्यकशास्त्राचे डॉक्टर आहेत. त्यांनी जवळजवळ तीस वर्षापूर्वी एका विशिष्ट मनोवृत्तीच्या झपाट्यात रवीन्द्रनाथ टागोर यांच्या Lover's Gift, Gardener व Gitanjali या तीन इंग्रजी काव्यसंग्रहातील कवितांचा मराठीत अनुवाद केला. त्यानंतर आज एकोणीसशे नव्याण्णव साली मूळ बंगाली "गीतांजली" काव्यसंग्रहाकडे बघताना त्यांना जाणवले की इंग्रजी 'गीतांजली' मध्ये मूळ बंगाली संग्रहातून रवीन्द्रनाथांनी फक्त त्रेपन्न निवडक कविता घेतलेल्या आहेत. बाकीच्या कविता 'खेया', 'नैवेद्य', वगैरे संग्रहांमधून घेतलेल्या आहेत. ही त्रुटी भरून काढण्यासाठी म्हैसाळकरांनी मूळ 'गीतांजली'तील उर्वरित शंभरएक कवितांचा बंगालीतून मराठीत अनुवाद केला व अशा रीतीने आता जवळजवळ साडेतीनशे कवितांचा हा संग्रह प्रकाशित होत आहे. या संग्रहासाठी मला प्रस्तावना लिहिण्यास सांगून डॉ. म्हैसाळकरांनी मला या अनुवादित कवितांबद्दल आणि त्या अनुषंगाने रवीन्द्रनाथांच्या कवितेबद्दल चार शब्द मांडण्याची जी संधी दिली आहे, त्याबद्दल मी त्यांची अतिशय आभारी आहे.

या प्रस्तावनेत मी प्रथम रवीन्द्रनाथ ठाकुर यांच्या साहित्याबाबत व जीवनदृष्टीबाबत थोडेफार विवेचन करून त्यानंतर दुसऱ्या भागात डॉ. म्हैसाळकर यांच्या अनुवादित कवितांकडे वळेन.

## (१)

रवीन्द्रनाथ टागोर अथवा ठाकुर यांचा जन्म १८६१ साली झाला. वयाच्या पंधराव्या सोळाव्या वर्षापासून ते ऐंशीव्या वर्षापर्यंत त्यांनी दीर्घकाळ अखंड उत्तम साहित्यनिर्मिती केली. यात कविता, गाणी, नाटके, कादंबऱ्या, ललित निबंध, साहित्य व समाज विषयक वैचारिक निबंध, लघुकथा, दीर्घकथा, खंडकाव्ये, आध्यात्मिक प्रवचने वगैरे नानाविध साहित्यप्रकारांचा समावेश आहे. मुलांना मातृभाषेतून शिक्षण घेता यावे म्हणून त्यांनी बंगला भाषेत लहान मुलांसाठी क्रमिक पाठ्यपुस्तकेही लिहिली आहेत. या सर्व अफाट साहित्यनिर्मितीतही रवीन्द्रनाथांच्या जीवनाकडे बघण्याच्या दृष्टीतील सातत्य स्पष्टपणे जाणवत राहते. हा सूर कुठेही चुकत नाही आणि म्हणूनच त्यांच्या साहित्यातील विविध रूपांमधून एक समग्रता व समग्रतेतून बहुआयामी जीवनाला स्पर्शून जाणारे वैचित्र्य साकारत जाते.

निर्मितीचे स्वरूप कुठल्याही एका सरळ धाग्यात गुंफून टाकणे शक्य नसते, कारण लेखकाला आयुष्याच्या निरनिराळ्या टप्प्यांवर निरनिराळे अनुभव तीव्रपणे जाणवतात, त्यानुसार निर्मितीप्रेरक आवेगही बदलत जाणे स्वाभाविक असते, पण साहित्यकाराजवळ जर द्रष्टेपणाची साक्ष देणारी सुसंगत व परिपक्व जीवनदृष्टी असेल तरच निर्मितीचा ताल सर्व चढउतार पेलून सहजपणे निर्मितीला कालजयी परिमाणे देऊ शकतो. रवीन्द्रनाथांचे साहित्य आणि त्यातही विशेषतः त्यांची गाणी इतकी कालजयी ठरली आहेत की पूर्व व पश्चिम बंगालमधील सर्वसामान्य माणसाच्या जीवनाशी ती जन्मजात संस्कारांसारखी लगडून गेलेली आहेत. ही माझ्यामते विसाव्या शतकातील एक आश्चर्यकारक घटना ठरावी. कारण संपूर्ण भारत देशात अजूनही जन्मापासून मृत्यूपर्यंतच्या सर्व प्रमुख घटना पुरातन धार्मिक विधींद्वारा साजऱ्या केल्या जातात





पण बंगालमध्ये हे प्रसंग रवीन्द्रनाथांच्या गाण्यांनी साजरे होतात, फक्त ब्राह्मो धर्म मानणाऱ्या लोकांच्या घरात नव्हे तर निरनिराळ्या जातींच्या हिंदू व मुसलमान जनतेचे सामाजिक कार्यक्रम या गाण्यांनी सुफळ संपूर्ण होतात. हे एक नवल आहे. याचा एक अर्थ असाही होऊ शकतो की रवीन्द्रनाथांनी आपल्याच विविध भारतीय आध्यात्मिक चिंतनांचे मंथन करून - जे अनावश्यक व कालबाह्य झाले असेल ते गाळून - आपलेच भारतीय संचित नव्या काळाच्या भाषेत पुनर्रचना करून मांडले व म्हणूनच ते परंपराप्रिय भारतीय मनाला आधुनिक काळातही स्वागतार्ह वाटले.

यामुळेच रवीन्द्रनाथांनी पारंपारिक संचितातून गाळले काय आणि स्वीकारले काय याची साधारण रूपरेषा कळू शकली तर आधुनिक काळाशी सुसंगत ठरणाऱ्या त्यांच्या जीवनदृष्टीचाही काहीसा मागोवा घेता येऊ शकेल. त्यांनी गाळले काय या विषयाला प्रथम हात घालू या.

सौंदर्य, आनंद आणि मुक्ती ही रवीन्द्रनाथांच्या विचारधारेची मूलभूत त्रिसूत्री बैठक आहे. या त्रिसूत्रीच्या आड येणाऱ्या गोष्टी त्यांनी गाळल्या. भारतीय परंपरेतील धार्मिक विधींमध्ये वा व्रतवैकल्यांमध्ये वेदोपनिषदांपासून ते पौराणिक ग्रंथांपर्यंतच्या साहित्याचा उपयोग केला जातो. या विधींमध्ये व व्रतवैकल्यांमध्ये ऐश्वर्यप्राप्तीची व समृद्धीची सुखप्रार्थी भूमिका असते. अगदी 'तमसो मा ज्योतिर्गमय' सारख्या अद्वितीय वैश्विक प्रार्थनेपाठोपाठ 'पुत्र दे, गोधन दे, सोमरस दे, ऐश्वर्य दे' अशा तऱ्हेच्या मागण्या शब्दबद्ध झालेल्या दिसतात.

रवीन्द्रनाथांनी जाणले ते हे की आधुनिक काळात माणसाला इहलौकिक सुखप्राप्तीसाठी विज्ञानाचे वरदान लाभलेले आहे. प्राचीन युगातील माणसापेक्षा आजची जीवनपद्धती निश्चितच जास्त सोयीस्कर व सुरक्षित आहे. पण ही सुखप्राप्ती झाल्यावरही माणूस मनातून असुरक्षित व एकाकीच आहे. त्यामुळे आजही 'तमसो

मा ज्योतिर्गमय' ही प्रार्थना निरर्थक ठरत नाही, हे तिचे बलस्थान आहे. म्हणजे अंधार व प्रकाश या फक्त बाह्य विश्वातील घटना नसून अंतर्विश्वातील मनोवस्थांची प्रतीकेही आहेत. आजही माणसाला असुरक्षितता, एकाकीपण, अपूर्णता या मनोव्यथांशी टक्कर द्यावी लागते आहे. बाह्यविश्वातील सुखप्राप्तीला अंतर्विश्वातील शांतीची जोड लाभल्याशिवाय जाणीवेचा - रवीन्द्रनाथांच्या भाषेत चेतनेचा - विकास होऊ शकत नाही, कारण अशा विकासासाठी आवश्यक असणाऱ्या सौंदर्य, आनंद व मुक्ती या त्रिसूत्रीला फुलायला वावच मिळत नाही. अर्थपूर्ण सामाजिक व वैयक्तिक जीवनासाठी हे फुलणे नेहमीच आवश्यक असते. म्हणूनच पारंपरिक साहित्यातील सुखवाद गाळून रवीन्द्रनाथ 'तेन त्यक्तेन भुंजीथः'च्या मार्गाने जाऊन मुक्तीच्या दिशेने प्राप्त होणाऱ्या सौंदर्यपूर्ण आनंदाची खडतर साधना आधुनिक मानवासमोर मांडतांना दिसतात.

कारण माणसाला होणारे बाह्यसृष्टीचे ज्ञान अथवा विश्वपरिचय हा दोन प्रकारचा असतो. पहिला प्रकार माहितीच्या स्वरूपाचा असतो तर दुसरा जाणीवेला होणारा साक्षात्कार. पहिला प्रकार एकदा माहिती प्राप्त झाली की पूर्ण होतो तर दुसरा प्रत्येक क्षणी नवनवीन रूपे धारण करणारा असीम अनुभव असतो. अगदी साधे उदाहरण घ्यायचे तर 'सूर्य रोज सकाळी पूर्वेकडे उगवतो' ही माहिती आहे आणि तिची वैज्ञानिक कारणेही आहेत. या माहितीशी एकदा आपला परिचय झाला की तो कायम झाला. त्यात परिवर्तन होणे नाही. पण या परिचयाला जाणीवेच्या साक्षात्काराची परिमाणे देणारे अनुभव, म्हणजेच सूर्योदयाबरोबर ताजी टवटवीत होणारी आपली गात्रे, दवबिंदूचे मोती, हळूहळू उजळत जाणारे आसमंत, सृष्टीचे एक पुनर्नव रूप इत्यादि अनुभवही 'सूर्य रोज सकाळी पूर्वेकडे उगवतो' याच घटनेचा वेगळा परिचय आहे. हा परिचय एकदा झाला की झाला असे कधीच होत नाही, तो वारंवार अनुभवावा लागतो, हा चिरनूतन परिचय अनुभवून आपल्या संवेदनांना सतत प्रतीतिक्षम राखणे



ही मुक्तीची साधना होय.

यात रवीन्द्रनाथांनी विशेष काय सांगितले असे वाटू शकते, पण थोडी आत्मसमीक्षा केली तर जाणवेल की आयुष्यातल्या अत्यंत साध्या अनुभवांमधील सौंदर्य जाणवून आनंद घेण्याची शक्ती टिकवण्याचा प्रयत्न केला नाही तर बोथट होत जाते. सुखसमृद्धीच्या आत्यंतिक लालसेमुळे, ईर्षा-असूया व द्वेष या विकारांमुळे आमच्या मनाची अमर्याद चेतना संकुचित होत जाते. या संपूर्ण विश्वाशी आपला जो संबंध आहे तो बाह्यविश्वाची तार अंतर्विश्वाशी जोडून प्राणसंगीत निर्माण करणारा आहे. या विश्ववीणेच्या तारेचा ताण नेहमी संतुलित राखण्याचा प्रयत्न म्हणजेच मुक्तीची अविरत साधना. तार ताणली तर तुटते, सैल पडली तर बेसूर वाजू लागते. असे झाले तर सर्व सुखे दाराशी हजर असूनही आपण दरिद्री, एकाकी व असुरक्षित होऊन जातो. विश्वपरिचय व मानवी अस्तित्वातील ताणतणाव या दोहोंच्या अशा द्वंद्वमय संबंधात रवीन्द्रनाथांनी भारतीय परंपरेच्याच आधारे नवीन गाणी रचून सौंदर्याचे, आनंदाचे व मुक्तीचे धाम शोधण्याची प्रक्रिया संगीतबद्ध केली.

मानवाला दुःखातून सुटका नाही. रवीन्द्रनाथांना एकोणिसाव्या शतकाच्या अखेरच्या व विसाव्या शतकाच्या पहिल्या दशकांमध्ये, आयुष्याच्या ऐन मध्यावर असतांना, फारच कठीण व दुःखद परिस्थितीतून पार पडावे लागत होते. याच काळात शांतिनिकेतन पाठशाळेची स्थापना झाली खरी पण त्याबरोबरच पत्नीचा मृत्यू, पुत्रवियोग, आप्तेष्टांकडून मिळणारी अपमानजनक वागणूक, सामाजिक टीका वगैरे घटना घडत गेल्या आणि मनावर शोकाचे व दुःखाचे मळभ साचू लागले. अशा मनःस्थितीत निर्मतीक्षमता टिकवण्यासाठी सतत मानसिक संघर्ष करावा लागतो. उपनिषदातील 'द्वा सुपर्णा सयुजा सखायाः' या श्लोकातील दोन पक्ष्यांची प्रतीके रवीन्द्रनाथांना तीव्रपणे जाणवली. आपल्याच मनातला एक पक्षी सुखाने संतुष्ट होतो, दुःखाने व्याकूळ होतो, शोकाने

हताश होतो आणि दुसरा या सर्व घटनांची प्रवाही क्षणभंगुरता बघत स्थिर असतो. या स्थिर पक्ष्याशी मनाची एकरूपता होताच अनुभवातून मुक्तीचे व मुक्तीतून निर्मितीचे सूर झंकारू लागतात.

## (२)

डॉ. राम म्हैसाळकर यांनी ज्या कवितांचे गद्य भावानुवाद केले आहेत त्या कविता रवीन्द्रनाथांनी या वर उल्लेखिलेल्या काळात व मनस्थितीत लिहिलेल्या कविता आहेत. यानंतर विसाव्या शतकाच्या चढत्या दशकांमध्ये रवीन्द्रनाथांनी खूप वैचित्र्यमय प्रयोग व साहित्यनिर्मिती केली आहे. अतिशय श्रेष्ठ दर्जाचे साहित्य दिले आहे पण प्रत्येक पर्व वेगळे. या प्रस्तावनेच्या आवाक्यात ते सर्व टप्पे सामावणे शक्य नाही, आवश्यकही नाही, या अनुवादित संग्रहातील कवितांच्या निर्मितीच्या वेळी जी पार्श्वभूमी होती तिची थोडीफार कल्पना देण्याचा प्रयत्न वर केलेला आहे.

या पार्श्वभूमीवर या कवितांमधील निसर्ग, प्रेम, तू-मी संबंध, ईश्वरचिंतन वगैरे ताणतणाव उपनिषदातील तत्त्वज्ञानाशी साधर्म्य सांगणारे आहेत. विशेषतः तू-मी संबंध हा जसा प्रियकर-प्रेयसी संबंध आहे तसाच तो प्रतीकात्मक पातळीवर ईश्वर व भक्त अथवा पुरुष व प्रकृति संबंध आहे आणि आध्यातिमक पातळीवर हाच संबंध मनात राहणाऱ्या दोन पक्ष्यांचा, म्हणजेच क्षणभंगुर अनुभवांनी सुखावणाऱ्या-दुखावणाऱ्या व शाश्वताच्या जाणीवेने आश्वस्त होणाऱ्या दोन अंतःप्रवृत्तींचा संबंध आहे.

अशा बहुपरिमाणी कवितांचा व त्यातही गीतांचा अनुवाद करणे हे फार जिकिरीचे काम. डॉ. म्हैसाळकरांनी या कामाला हात घातला व चिकाटीने ते पार पाडले ही अभिनंदनीय बाब होय. रवीन्द्रनाथांनी स्वतःच या गीतांचा इंग्रजीत गद्य भावानुवाद केला व त्यासाठी १९१३ साली त्यांना साहित्याचे नोबेल पारितोषिक मिळाले, ही गोष्ट सर्वविदित आहे. इंग्रजी भाषेतील त्यांचा अनुवाद कितपत



सरस आहे याबाबतही तर्कवितर्क व मतभेद आहेतच. विशेषतः ज्या व्यक्तींनी बांगला भाषेतली ही गाणी वाचली आहेत, ऐकली आहेत, त्यातील छंदोबद्ध लालित्यपूर्ण भाषाविष्कार अनुभवला आहे, त्यांना खुद्द रवीन्द्रनाथांचाही इंग्रजी अनुवाद फारसा न रुचणे स्वाभाविकच आहे.

पण संपूर्ण बाह्य अलंकरण अटळपणे गळून पडल्यानंतरही विषयवस्तूमध्येच काव्यात्मकता व दमदारपणा असला तरच तो अनुवादात उतरू शकतो. श्रेष्ठ साहित्याच्या बाबतीत असे घडते. रवीन्द्रनाथांनी स्वतः इंग्रजीत भाषांतरित केलेली 'गीतांजली' वाचून देशविदेशातील हजारो वाचक प्रभावित तर झालेच, पण या पुस्तकाच्या वाचनामुळे त्यांना मनःशांती लाभली व त्यांचे मनोबळ वाढले असेही त्यांनी लेखी नमूद करून ठेवले आहे. हे सर्व वाचक विसाव्या शतकातले, प्रगत वैज्ञानिक सुखसुविधांमध्ये वावरणारे, सुशिक्षित व सुबुद्ध वाचक आहेत. त्यांच्या मतांवरून स्पष्टपणे जाणवते की भारतीय पारंपरिक चिंतनातील अतिशय सशक्त गाभा आणि आधुनिक मनाला ग्रासणाऱ्या एकाकीपणाला निरहंकारी आत्मसाधनेद्वारा वैश्विक पातळीवर नेऊन सौंदर्य, आनंद व मुक्ती या त्रिसूत्रीची परिमाणे प्राप्त करून देणारे तत्त्वज्ञान, आधुनिक भाषेत प्रतीकात्मकतेने व्यक्त करण्यात रवीन्द्रनाथांना असामान्य यश लाभले होते. अनुवादातही हे यश कमी झालेले नाही.

याचा अर्थ असा मात्र चुकूनही होऊ नये की रवीन्द्रनाथ हे आपल्या मध्ययुगीन संतकवींच्या पंक्तीतले कवी होत. भारतीय पारंपरिक चिंतनाची बैठक त्यांच्या काव्याला आहे पण अभिव्यक्ती संपूर्णपणे वेगळी, रुढीवादाला व अंधश्रद्धेला अमान्य करणारी, बुद्धिप्रामाण्यवादी विचारसरणीसकट त्यापलीकडील बोधशक्तीला आवाहन करणारी, जीवनाभिमुख आहे. संतकवींच्या काव्यातील मुक्ती अथवा मोक्ष आणि रवीन्द्रनाथांना अभिप्रेत असलेली मुक्ती या संपूर्णपणे दोन टोकांच्या प्रवृत्ती आहेत.

असो. डॉ. राम म्हैसाळकर यांनी रवीन्द्रनाथांच्या

इंग्रजी भाषांतरावरून मराठीत अनुवाद केला आहे. त्यामुळे अर्थातच मूळात पद्यबद्ध व गेय स्वरूपाच्या भावपूर्ण गीतांना गद्यरूप लाभले आहे. हे एकापरी बरेच झाले, कारण श्रेष्ठ पातळीवरील पद्यरचना तिच्या छंदासकट व लयीसकट दुसऱ्या कोणत्याही भाषेत पुनर्निर्मित करणे जवळजवळ अशक्यच असते. असे करण्याच्या ओढाताणीत फार मोठे रसविघ्न निर्माण होऊ शकते व त्यामुळे आशयातील गहन गांभीर्यही हरवून जाण्याचा धोका असतो. म्हैसाळकरांच्या अनुवादित कविता अतिशय प्रासादिक व प्रवाही गद्यात अवतरलेल्या असल्यामुळे कुठेही खटकत नाहीत.

रवीन्द्रनाथांचे अनुवादही गद्यातच आहेत आणि त्यांच्या गद्यातही वाहत्या पाण्यासारखी खळखळणारी काव्यात्मकता आहे. ही भाषांतर्गत काव्यात्मकता राखण्याचा आटोकाट प्रयत्न म्हैसाळकरांनी कसा केलेला आहे ते या छोट्याशा गीतात बघू या -

*"या आनंदाचे सर्व स्वर माझ्या या शेवटच्या गीतात रुजू दे ! साऱ्या ब्रह्मांडाला हिरवळीवरून पुढे धावायला लावणारा हा आनंद - जीवन नि मरण या जुळ्या भावंडांना साऱ्या विश्वात बेभानपणे नाचवणारा हा आनंद -*

*- दुःखाच्या आरक्त कमलांवर निश्चलपणे अश्रू आवरणारा हा आनंद !*

*आपली सर्व संपत्ती धरतीमातेच्या चरणी अर्पण करणारा आणि त्या असीम त्यागाबद्दल स्वतःच्या थोरवीचा एक शब्द देखील न उच्चारणारा हा बैरागी आनंद*

*या आनंदाचे सर्व स्वर माझ्या या शेवटच्या गीतात रुजू दे!"*

अनुवादात, आणि त्यातही भावपूर्ण गीतांच्या गद्य अनुवादात इतकी काव्यात्मकता राखण्याचा प्रयत्न करणे, ही अनुवादकाला करावी लागणारी फार कठीण कसरत डॉ. राम म्हैसाळकर यांनी जबाबदारीने पार पाडली आहे.



डॉ. म्हैसाळकरांच्या अनुवादातील आणखी एक उल्लेखनीय वैशिष्ट्य हे की त्यांनी रवीन्द्रनाथांच्या अनुभवविश्वातील ईश्वर ही संकल्पना नेमकेपणाने जाणली आहे. रवीन्द्रनाथ भक्ती या प्रवृत्तीचे महात्म्य जाणतात. प्रभो, पिता, परमेश्वरा इत्यादी संबोधनेही वापरतात. पण रवीन्द्रनाथांना जाणवलेला ईश्वर हा बाह्य व मूर्तरूपी नाही, तो संपूर्ण निसर्गरूपांमधून जाणवणारा आणि स्वतःच्याच आत्मस्वरूपातील विकारांकडे निश्चलपणे बघणारा आत्मरूपी ईश्वर आहे. भोगलालसा वाढली की स्वार्थ, असूया व अहंकार प्रबळ होत जातात आणि या आत्मरूपी ईश्वराशी दूरत्व निर्माण होते. अहंकाराचे प्रेमापोटी विसर्जन होण्याचा मुहूर्त हाच खरा ईश्वरदर्शनाचा मंगल मुहूर्त असतो. त्यामुळे ईश्वरवियोग व ईश्वरप्राप्ती या दोन्ही घटनांना माणूस स्वतःच जबाबदार ठरतो. रवीन्द्रनाथांच्या कवितांचे अनुवादक याबाबतीत अनेकदा गफलत करतात व ईश्वरनिदर्शक संबोधनांच्या जागी केशवा, माधवा, गोविंदा वगैरे विशेषनामांचा सर्रास वापर करतात. अशाने मूळ अनुभूतीतील गांभीर्य हरवून जाते. रवीन्द्रनाथांच्या मते अंतर्मनातील आत्मरूपी ईश्वर बहिर्विश्वातील ब्रह्मतत्त्वाशी संलग्न होतो तेव्हाच माणसाला संपूर्ण विश्वाशी एकरूप होण्याचा साक्षात्कारी अनुभव प्राप्त होतो. हा ईश्वर फार निष्ठुर, कठोर व कष्टसाध्य आहे. त्याची पूजा म्हणजे अहंकाराचे विसर्जन. हे साधले तरच या ईश्वराचे मंगलमय रूप जाणवू शकते. ईश्वराची ही संकल्पना नीट जाणून घेतल्यामुळे डॉ. राम म्हैसाळकर यांच्या 'गीतांजली'तील कविता आशयदृष्ट्या निकोप उतरल्या आहेत.

## (३)

Lover's Gift (ही भेट प्रेमिकाची) व Gardener (मालाकार) या संग्रहांमध्ये अंतर्भूत झालेल्या कविता रवीन्द्रनाथांनी 'गीतांजली' पर्वाच्या अगोदर लिहिलेल्या कविता आहेत. 'गीतांजली' मधील कविता गेय

स्वरूपाची गीते आहेत पण उपरोक्त संग्रहांमधील कविता या कवितारूपातच आहेत. गेय स्वरूपाच्या गीतांपेक्षा या कविता क्वचित जरा दीर्घ व वर्णनपर आहेत. प्रेमिकाच्या मनातील मीलनाची ओढ, विरह, आठवणी, ताटातूट, व्याकुळता वगैरे सर्व भाव या संग्रहातील कवितांमध्ये निसर्गातील प्रतिमांद्वारा व्यक्त झालेले आहेत. या कविता खऱ्या अर्थी रोमँटिक कविता आहेत, मधुर-हळुवार-तळमळत्या भाषेत लिहिलेल्या आहेत. प्रीतिसिक्त मनाचे सर्व आविर्भाव वाचकांना येथे बघावयास मिळतील.

डॉ. राम म्हैसाळकर यांनी या प्रेमकवितांमधील हळुवारपण उत्तम प्रकारे प्रस्तुत केले आहे. इतके की या कविता इंग्रजीतून भाषांतरित केलेल्या आहेत असे वाटत नाही. इंग्रजीचे आवरण बाजूला सारून हे अनुवाद मूळ बांगला भाषेतील अभिव्यक्तीच्या इतक्या जवळ जाऊन पोहोचतात की ही किमया कशी साधली असेल याचे नवल वाटावे. शेवटी भाषेचे अडसर मनाच्या आड येत नसावेत, हेच खरे.

*"हा शिशिर माझा आहे. कारण ती माझ्या हृदयात आहे. खळबळ माजवतेय् ! तिच्या पैंजणांची रुणझुण नसानसात भिनलीय्. तिच्या पदराची फडफड माझ्या श्वासात धडधडतेय्. माझी सारी स्वप्नं तिच्या काळ्या केशकलापांनी चितारलीयत ! माझ्या हृदयात स्पंदन करणारी पानझड ती भिंगरीसारखी फिरवतेय् ! माझ्या नेत्रातलं तेज पिणारे तिचे नेत्र आकाशातून हंसताहेत !"*

अथवा

*"मृत्यूमुळं बाह्य विश्वातून तू निघून गेलीस*
*आणि माझ्या दुःखात तुझा पुनर्जन्म झाला,*
*माझ्या आयुष्याला पूर्तता आली.*
*प्रकृती अन् पुरुष माझ्यात एकरूप झालेत !"*



अशा अनेक ठिकाणी रवीन्द्रनाथांच्या प्रेमाची जातकुळी नेमकी शब्दात पकडण्यात डॉ. म्हैसाळकर यशस्वी झाले आहेत.

'मालाकार' संग्रहातील कविता मूलतः वर्णनपद कविता आहेत. कवी एखादे नैसर्गिक चित्र रंगवायला घेतो, त्यातले सर्व बारकावे टिपतो, संवाद ऐकवतो व त्यातून या विश्वातील कालनाट्य सादर करतो. म्हैसाळकरांनी कवितांमधील हे नाट्यरूप साकार करण्याचा प्रांजळ प्रयत्न केलेला आहे.

'मालाकार' संग्रहातील अखेरची कविता रवीन्द्रनाथांनी एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस विसाव्या शतकाच्या वाचकाला उद्देशून लिहिली आहे. आज आपण विसाव्या शतकाच्या सीमेवर व एकविसाव्या शतकाच्या उंबरठ्यावर उभे आहोत, गेल्या शतकात एका बंगाली महाकवीने आपल्याकडून काय अपेक्षा केली होती ते म्हैसाळकरांच्या शब्दात पाहू या -

*"कोण आहेस तू ? पुढल्या शतकातील माझ्या वाचका-*
*वसंतातील बहरलेल्या ताटव्यातून एखादं फूलसुद्धा*
*मला पाठवता येत नाही ! प्रकाशाची सुवर्णशलाकासुद्धा*
*नाही ! कारण हा काळाचा मेघ आपल्यामध्ये वावरतो*
*आहे !*
*पण आपल्या घराचे दरवाजे उघड आणि क्षणभर बाहेर*
*बघ ! तुझ्या उद्यानात बहरलेला फुलांचा ताटवा सुगंधानं*
*भरला आहे !*
*मागल्या शतकातील आठवणींचा ताटवा आहे तो !*
*आणि आनंदानं दुथडी भरून तुझं हृदय एकाएकी गाऊ*
*लागेल -*
*- शंभर वर्षापूर्वी एका कवीनं अशाच एका वसंती केलेल्या*
*काव्याचे ते शब्द असतील.*
*त्या कवीचाच तो अनुभव असेल !*

रवीन्द्रनाथांचे अनुभवविश्व विशाल आहे. त्यातील काही भाग आज केलेल्या राम म्हैसाळकर यांच्या प्रयत्नांमुळे मराठी वाचकापुढे येत आहे. दुःखाने, शोकाने पोळणाऱ्या, बंधनांमध्ये जखडून पडणाऱ्या मानवी अस्तित्वाला मुक्तीचा मंत्र देऊन अर्थपूर्ण जीवन जगण्यास प्रवृत्त करणारे हे अनुभवविश्व आहे. इंग्रजीमधून हे विश्व पुन्हा एका भारतीय भाषेत पुनर्जीवित करण्याची कामगिरी म्हैसाळकरांनी केली आहे. 'गीतांजली' संग्रहातील काही कविता तीस वर्षांपूर्वी इंग्रजीतून व काही कविता याच वर्षी बांगला भाषेतून अनुवादित केलेल्या असल्या तरी कोणती कविता इंग्रजीतून व कोणती बांगला भाषेतून आली आहे हे ओळखणे कठीण जावे इतकी एकसंधता म्हैसाळकरांना साधली आहे.

अनुवादात काव्यरूप विस्कळीत होते, अर्थपूर्ण विचार व वर्णने शक्य तितक्या प्रमाणात मूळरूपाजवळ नेत जाणे हेच अनुवादकाचे कर्तव्य ठरते. म्हैसाळकरांनी ते केले व आपल्याला मराठी भाषेत रवीन्द्रनाथांच्या इतक्या कविता उपलब्ध करून दिल्या त्याबद्दल मी पुन्हा एकदा त्यांचे अभिनंदन करते. गद्य स्वरूपात अवतरलेले हे भावानुवाद वाचून मराठी वाचकाला मूळ कविता वाचण्याची अथवा गेय स्वरूपात उपलब्ध असलेले रवीन्द्रसंगीत ऐकून रवीन्द्रनाथांच्या काव्यप्रतिमेची अधिक ओळख करून घेण्याची प्रेरणा झाली तर या अनुवादाचे सार्थक होईल.

शांतिनिकेतन
दि. २०-९-९९

वीणा आलासे



रवीन्द्र गीतांजलीची दुसरी आवृत्ती इतक्या लवकर काढावी लागेल ह्याची कल्पना नव्हती. ह्या पुस्तकाचे स्वागत अपेक्षेपेक्षा जास्त झाले. त्याचं कारण म्हणजे गुरुवर्य रवीन्द्रनाथांवरचे प्रेम ह्याची मला जाणीव आहे.

गेल्या चार वर्षात रवीन्द्र गीतांजली : रवीन्द्र भावांजली आणि ह्या संग्रहाबरोबरच प्रसिद्ध होत असलेली रवीन्द्र काव्यांजली अशा तीन पुस्तकांच्या निमित्ताने रवीन्द्रनाथांचे एकंदर नऊ संग्रह मराठीत भावानुवादाच्या स्वरूपात उपलब्ध होत आहेत. ह्या संग्रहांबद्दल वाचकांचे विचार मला कळल्यास आनंद होईल.

२८ हिंदुस्थान कॉलनी
वर्धा रोड, नागपूर ४४० ०१५
दूरभाष - ०७१२-२२२६४३८

राम म्हैसाळकर
२५-१२-०३

There are two great maxims of translation either turn the foreign author in to a native author or induce the reader to go out to the foreignness

**- Gothe**



# ही भेट प्रेमिकाची...

Lover's Gift ह्या इंग्रजी काव्य संग्रहांचा मराठी भावानुवाद -



- राम म्हैसाळकर

## (ही भेट प्रेमिकाची)

रवीन्द्रनाथांनी अत्यंत संघर्षमय आणि दुःखव्याप्त काळात नाजुक अन् हळुवार प्रेमकाव्यं लिहिली. त्यातल्या काही कविता **Lover's Gift** ह्या संग्रहात आहेत. प्रेम करत असतांनाच प्रेम काव्य लिहिल्या जातं असं नाही. अनेक वर्षानंतर पूर्वस्मृति गुंजन करत करत त्या काव्यात उतरतात !

ह्या प्रेमकाव्यातल्या प्रियकर-प्रेयसींना वेगवेगळ्या मनोवृत्तींची झालर आहे.

त्यांच्या प्रियकर-प्रेयसीच्या कल्पनासुद्धा वेगवेगळी रूपं धारण करतात. त्या कधी त्यांच्या प्रतिभेसंबंधात असतात तर कधी आशा-आकांक्षांच्याः आणि अनेकदा परमेश्वराशी नातं जोडतात. हा प्रभू वेगवेगळ्या भूमिकेतून त्यांच्यासमोर अवतरतो. कधी प्रियकर होतो तर कधी प्रेयसीचे रूप धारण करतो.

त्याच्या विरहांचं दुःख सतत झिरपंत राहतं आणि त्याच्या मीलनाचं सौख्य रोमांचित करत असतं !

- राम म्हैसाळकर

"त्या" दिवसांना
सादर समर्पित

- राम म्हैसाळकर

## : १ :

आपल्या प्रेमाचा अश्रुबिंदू चिरकालीन करण्याच्या
आकांक्षेपुढं शहाजहान, तू आपल्या बादशाही सामर्थ्याची
देखील तमा बाळगली नाहीस !
कालपुरुषाला मानवी हृदयाबद्दल अनुकंपा नाही.
निसटलेले क्षण स्मृतीच्या चौकटीत पकडण्याच्या
त्याच्या धडपडीला तो निष्ठुरपणं हसतो !
- पण तू त्याला सौंदर्याचं आमिष दाखवलंस,
जाळ्यात पकडलंस आणि त्या निराकाराला
चिरकालीन साकारनं सजवलंस !
सरत्या शर्वरीत होणारं प्रीतीचं कूजन,
ह्या शिलाखंडातल्या शान्तीत सामावलंस !
बादशहाती ढासळतील : युगं मावळतील.
आणि तरीही त्या तारकांना
हा विशाल संगमरवर सांगेल -
"- मला आठवतय् !" मला आठवतय् !
- पण जीवन विसरतय्
कारण तिला अनंताचं बोलावणं आलं.
मोकळ्या मोकळ्या मनानं ती आपल्या शेवटच्या
प्रवासाला निघून गेली.
स्मृतीचं वैभव विस्मृतीच्या गर्तेत गाडून !

●

## : २ :

प्रिये, माझ्या बागेतल्या पाऊल वाटेनं ये !
वाटेत भावनाविवश झालेली फुलं तुला अभिवादन करतील !
....कदाचित् तिथं तू किंचित्‌काल थबकशील.
पण त्यांच्या मोहांत न पडता पुढं निघून जा.
अस्तास परतणाऱ्या सूर्यकिरणांसारखे आहेत ते
चमकता चमकता अंतर्धान पावणारे !
प्रेमाची भेट ही अशीच असते.
लाजरी, आपलं नाव देखील न सांगणारी,
आनंदाच्या लहरी निर्माण करून
त्यातच दडून बसणारी,
हुलकावणारी.
- कारण सुगंधाला पकडतांना हातात फूलच येतं
आणि ज्योती हृदयाशी धरावी तर हातात असते
लहानशी दिवलाणी.
तशीच ही प्रीतीची भेट....

●

## : ३ :

माझ्या मळ्यात फुलांची रेलचेल आहे.
दाटीदाटीनं ते एकमेकांना झोके देतात :
पहाटेच्या प्रकाशात मिष्किलपणानं हसतात.
तृप्तीनं भारावतात.

राणी, मळ्यातल्या छायेत अभिमानानं प्रवेश कर !
पिकलेली मधुर फळं मुळापासून तोड.
आपल्या माधुर्यानं ते तुला तृप्त करतील.
त्यांचं माधुर्य तुझ्या ओठांवर रेंगाळेल.
अलिगण आनंदानं अखंड गुजारव करतात माझ्या
मळ्यात
त्यांच्या सुरांवर पानं सळसळतात.
फळं ताल धरतात.
ताल धरता धरता परिपक्व होतात !

●

## : ४ :

हिरवळीची जमीनीशी असावी तितकी तिची माझी
जवळीक आहे.
थकल्या गात्रांना कुरवाळणाऱ्या निद्रेइतकी ती गोड आहे.
गर्द अन् शांत झाडीतून वाहणाऱ्या निर्झरासारखी
माझ्या प्रेमाला
तिची ओढ आहे.
जललहरी लाटांच्या तालावंर गात असतात
माझं संगीत
देखील तिच्या हृदयाच्या तालावर गुंजारव करतं !
अखंड !

●

## : ५ :

आपल्या ग्रहनक्षत्रांसकट हे आकाश
आणि हिरेमाणकांसकट ही वसुंधरा जरी माझ्या पायाशी
आली तरी माझी तृप्ती होणार नाही.
पण ह्या धरित्रीवर एका कोपऱ्यांत
इतर काहीही न मागता मी संतुष्ट राहीन
केवळ ती माझी झाली तर !

●

## : ६ :

कविराया, ही वसंताची सरती वेळ !
मागं घुटमळणाऱ्यांबद्दल बोलू नकोस.
मान ताठ करून पुढं जाणाऱ्याबद्दल सांग !
हसत खेळत, मागं न वळत
पुढंच पळणाऱ्यांचे गीत आळव !
क्षणकालांकरता बहरणाऱ्या पाकळ्याचं कवन कर !
पुढल्या क्षणांत निःसंकोचपणं कोमेजणाऱ्यांचं स्तवन कर !
असा अस्वस्थ कां ?
स्मृतीच्या धाग्यांना चिकटलेली हासू आंसूची गुंतावळ
उकलतो आहेस ?
कशाला ?
गळून पडलेल्या, मातीमोल
झालेल्या पाकळ्या गोळा करण्यात काय हशील ?
हुलकावण्या देणारे क्षण कशाला हुडकायचे ?
गूढत्वात गाडलेली गीतं कशाला गायची ?
त्यामुळं निर्माण झालेल्या तुझ्या हृदयाच्या पोकळीत
उद्याची गीतं उगवू देत !
कविराया, ही वसंताची सरती वेळ आहे !
●



## : ७ :

एका ग्रीष्मांत सारं काही हरलो.
फारच थोडं शिल्लक आहे.
त्यातून कदाचित् एखादं लहानसं भावगीत होईल.
ते मी तुला म्हणून दाखवीन
...एखादा लहानसा गजरा गुंफता येइल.
तुझ्या मनगटांत बांधायला !
...किंवा छोटीशी कुडी बनवता येइल. माझ्या प्रीतीची
कुजबूज तुझ्या कानांत करीत मी तुझ्या कानात
घालीन !
माझ्या जवळ लहानशी होडी शिल्लक आहे.
त्या होडीतून वादळयारात्री प्रवास करता येणार नाही.
हळुवारपणानं आपल्या नाजुक पावलांनी त्यात बसशील
तर किनाऱ्याकिनाऱ्यानं मी हलकेच माझी होडी हाकारीन.
कारण तिथं किनाऱ्याजवळ लाटा देखील झोपल्या
असतात. बदकं डोळे मिटून पडली असतात आणि
पानापानातून डोकावणारे कवडसे विश्रांती घेत असतात !
संध्याकाळी दिवसभराच्या श्रमांनी थकल्यावर
तू आळसावशील तेव्हा नाजुक रानफुलं मी माझ्या हातांनी
खुडून तुझ्या वेणीवर माळीन आणि तुझा निरोप घेईन !
- राणी गेल्या ग्रीष्मात सारं गेलं.
फक्त इतकंच शिल्लक आहे !
●

: ८ :

माझ्या नावेत तुला घेऊ शकेन. ती उतारूंनी शिगोशीग
भरली आहे. पण तुला नाही म्हणवत नाही. कारण
धानांच्या पेंड्या डोक्यावर घेऊन तू एकटी उभी आहेस.
सडसडीत बांध्याचं शरीर ऊरावरल्या बोझ्यानं थरथरतय् !
आणि तुझ्या डोळ्यांत मिष्किलतेची लहर दिसते आहे.
वाऱ्यानं फडफडणारा पदर धुळीनं माखला आहे.
श्रावण मेघासारखा !
तुला नाही कसं म्हणू ?

बोटीतले प्रवासी निरनिराळ्या ठिकाणी उतरतील आणि
आपआपल्या घरी जातील. सर्वात शेवटी तू उतरशील.
"तू कुठं जाणार आहेस....?"
"ही भातशेती कुणाची आहे....?"
...छे छे मी तुला काहीच विचारणार नाही.
पण प्रवासाच्या शेवटी तू उतरून निघून जाशील.
किनाऱ्याजवळच्या झाडाला माझी होडी बांधून ठेवीन...
वल्ह मिटवून !
पण मी बोटीतच बसून राहीन.
त्या संध्याकाळी मीच माझ्या मनाला विचारीन...
"ती शेती कुणाची आहे...?
डोक्यावरचा भारा घेवून ती कुठं गेली असेल ?"

●



: ९ :

तुझ्या डोक्यावरला हारा वजनदार फळांनी भरला आहे.
तू थकली थकली भासते आहेस. तरीही तुझ्या हृदयांतली
अभिलाषा तुझ्या डोळ्यांत तरंगते आहे. अजून किती
लांब जायचं आहे तुला ? वैशाखाच्या ह्या रणरणत्या
उन्हात तुझा रस्ता अधिकच लांब वाटेल तुला !
इकडं बघ ! हे जलाशय तुडुंब भरलं आहे.
त्यातलं काळंशार पाणी तुला उचंबळून जणू साद घालतय्
त्याच्या निळ्यानिळ्या काठावर देखील गवताचे रोमांच
उभे आहेत. क्षणभर त्या तळ्यांत पाय सोडून श्रमपरिहार
का करत नाहीत ?
- आणि मग हा मंदमंद वाहणारा वारा तुझ्या केसांतून
आपली बोटं फिरवील. कबूतरं सावलीत बसून
कुजबुजतील आणि झाडाची पानं देखील एकमेकांच्या
कानांत सांगतील. त्यानं त्याखालची सावली देखील
रोमांचित होइल !
आणि अशीच पाण्यात पाय सोडून बसशील तर काय
बिघडेल ? वेळ झरझर निघून जाईल. सूर्यास्त होइल.
तुझा एकाकी रस्ता सायंकालीन संधिप्रकाशांत अंतर्धान
पावेल... पण मग बिघडलं कुठं ?
पलीकडंच माझी झोपडी आहे. त्या तिथं... कुंपणाची मेंदी
खुणावतेय् तिथं ! तिथं मी तुला घेऊन जाईन. तुझ्यासाठी
शय्या अंथरीन. दीप प्रज्वलित करीन.
आणि पहाटे, क्षीरपात्रांत होणाऱ्या गायीच्या दुधाच्या
धारांच्या आवाजानं पक्षीगण उठून किल्‌बिल् करू लागतील
त्यावेळी मी तुला उठवीन !
चालेल ?

●

## : १० :

मधमाशा कुणाच्या बोलावण्यानं बाहेर पडतात...
आपल्या पोवळयातून ?
...कुठल्या अव्यक्त आठवणीनं ?
त्यांच्या पालवलेल्या पंखात कुठली अभिलाषा असते ?
कळीच्या अंतर्मनात रुणवणारं गोड गीत त्यांना कसं ऐकू येतं ?
आणि त्या गाभ्यात लपलेला अमृतकुंभ त्यांना कसा सापडतो ?...
तो लाजरा बुजरा मधु ?

●



## : ११ :

त्या सागरतीरावरून वसंत आला तेव्हा इवली पानं
अंकुरात दडली.
माझ्या बागेतली !
सागरतीरावरून समीर आला
त्यानं ती पालवी हलवून जागी केली.
त्यांची मधुर कुजबुज झाली.
अस्पष्टसं गीत गायल्या गेलं.
हळुवारपणं...
आणि पहाट उमलली.

त्या बागेत आता प्रीतीचा फुलोरा फुलू दे !
त्यात माझा आनंद धुंद होऊन स्वच्छ गान गाईल.
नृत्य करील
आणि पेंगुळलेल्या उषेचे नेत्र आश्चर्याच्या माधुर्यानं
विस्फारित करील !

●

# : १२ :

खूपखूप वर्षांपूर्वी नंदनवनाच्या दक्षिण दरवाजातून
तू पृथ्वीवर आलास -
अगदी पहिल्यांदा -
तेव्हा वसन्ता,
स्त्री-पुरुषांनी तुझं अत्यानंदानं स्वागत केलं !
नाचत गात एकमेकांवर पुष्पवर्षाव करत
ते आनंदानं बेहोष झालेत.
- आणि मग तू दरवर्षी आलास.
फुलांची परवरण करत गेलास.
तशीच !
त्यांच्या मागं रेंगाळणाऱ्या सुवासानं टाकलेले निश्वास
गतकाळातील स्वप्नमय दिवसांची आठवण करून देतात.
आणि पुन्हा न अनुभवणाऱ्या आठवणी
अंतर्मन उदास उदास करतात !
तुझ्या श्वासागणिक प्रीतीची कूजनं होतात.
ती मानवी शब्दभंडारा पल्याडली आहेत.

असाच एकच दिवस नव्यानं आलास
आणि मला चुम्बून गेलास..
माझं सारं शरीर रोमांचित करून.
आणि तेव्हापासून
वसन्ताच्या उमलत्या लाजऱ्या बुजऱ्या
त्या जुन्या आठवणी उमलतात !
तुझ्या उमलत्या लाल चुटुक गुलाबाबरोबर अव्यक्त प्रीती
हृदयात आग लावते.
तुझ्याबरोबर तालात नाचणाऱ्या गीताच्या ओळी
अजूनही पानांच्या सळसळीबरोबर ऐकू येतात.
नवनवीन पल्लव, तीचं गीतं
अखंड गातात.

●

## : १३ :

काल रात्री बागेत माझ्या यौवनानं फेसाळलेलं मद्य मी
तुला बहाल केलं.
पेला ओठांशी लावतांच तुझे नेत्र जडावले.
डोक्यावरचा पदर बाजूला सारून मी तुझी वेणी सोडली
आणि मुक्त केशसंभारानं मोहरलेला,
अबोलता,
माधुर्यानं हसणारा तुझा चेहरा,
माझ्या हृदयाशी धरला.
शुभ्र चांदण्याची बरसात
स्वप्नमंजुषेत गुंगलेल्या जगाला मनसोक्त भिजवत होती.
माझ्या बाहुपाशात काल रात्री मी तुला घेतलं तेव्हा ! -

आणि आज पहाट दवबिंदूनं शांत झाली आहे.
शुचिर्भूत होऊन
शुभ्र वसनं लेऊन
फुलांनी भरलेली परडी•हातांत घेऊन
तू देव दर्शनाला निघालीस.
ह्या वळणावर झाडाच्या सावलीत
मी उभा आहे.
खाली मान घालून.
दवबिंदूनं शांत झालेल्या प्रभाती -
मंदिराला जाणाऱ्या तुझ्या रस्त्याच्या कडेनं
एकलकोंडा !!

●



## : १४ :

आज मी अधीर झालोय् ! राणी,
मला क्षमा कर.
ग्रीष्मानंतरची पहिली सर आहे ही.
त्याच्या स्वागतासाठी नदीकाठच्या जंगलात धमाल गर्दी
उसळलीय्.
कदंब वृक्षानं आपला फुलोरा फुलवला आहे.
त्याच्या सुगंधानं स्वैरभैर पळणाऱ्या वाऱ्याला मोहांत
गुंतवलं आहे.
वर आकाशात बघ,
चहूबाजूंनी फेकलेल्या नेत्रकटाक्षात
वीज चमचमते आहे.
आणि हा हुंदडणारा वारा तुझ्या केसांशी दंगामस्ती करतो
आहे.
आणि हे जर विनम्र अभिवादन वाटत असेल
तर राणी
मला क्षमा कर.
अविरत वर्षणाऱ्या वर्षेत सारं विश्व विसावलं आहे.
सारी कामं थांबली आहेत.
कोसळणाऱ्या सरीचं नृत्य तुझ्या नयनात सामावलं आहे.
हा नीलमणी बघ !
आपल्या निळ्या निळ्या ओढणीसह तुझ्या केशसंभारांत
लपून बसण्यासाठी आसावलाय् !

●

## : १५ :

शेजारचे लोक तिला काळी म्हणतात.
पण मला नाही तसं वाटत.
सावळी असावी... गोरी नसेल
पण काळी निश्चितच नाही.
सावळ्या मेघांनी अंधारून आलं होतं तेव्हा मला ती
शेतात दिसली.
डोक्यावरचा पदर मागं घसरला होता.
लांबसडक केस पाठीवर रुळत होते...
...हं ! शेजारी म्हणतात तशी ती असेलही
पण तिचे हरिणीसारखे काळेभोर डोळे मात्र माझ्या
मनात ठसलेत !
हवेत, येणाऱ्या वादळाची नांदी होती.
गायीचा हंबरडा ऐकून ती झोपडी बाहेर आली.
आपल्या विशाल डोळ्यांनी तिनं एकदा वर आकाशाकडे
बघितलं.
आणि येणाऱ्या वादळाच्या भावनेनं ती शहारली.
शेताच्या बांधावर मी उभा होतो.
क्षणमात्र तिनं मला बघितलं -
(आणि ते फक्त आम्हालाच कळलं)
ग्रीष्मातल्या वळवाच्या वादळावत् ती सावळी आहे.
कदाचित् जाई जुईच्या ताटव्याइतकी गर्द असेल...
किंवा चैत्रयामिनीवत् - गडद सुद्धा असू शकेल...!
●



## : १६ :

ह्या शांत तळ्याशेजारी ती राहते.
त्या तळ्याचा हा भंगलेला घाट.
त्याच्या विस्कळित झालेल्या पायऱ्यांवर बसून
कित्येकवेळा तिनं चंद्राकडं बघितलं असेल !...
लांब लांब बांबूंनी पोखरल्या गेलेला हा चंद्र !
कित्येक पावसाळ्यातला या भातशेतीवरून वाहणारा
मृद्गंध तिनं आस्वादला असेल.
या घाटावर बसून कशिदा काढता काढता तिच्या मैत्रिणींनी
तिला तिच्या लाडक्या नावानं हाका मारल्या असतील.
त्या नावाच्या उच्चारानं आजूबाजूच्या पालवीनं आनंदानं
टाळ्या वाजवल्या असतील. आणि ह्या तळ्यातलं पाणी
तिच्या नितळतेची आठवण आपल्या हृदयाच्या गाभ्यात
खोल खोल दडवून ठेवत असेल. तिच्या ओलेत्या
पावलांच्या खुणा, ही गावांत जाणारी पाउलवाट रोजच्या
रोज जपून ठेवत असेल.
आणि आज आलेल्या त्या गावातल्या मृगनयना !
हिंदकळणाऱ्या घागरी कमरेवर ठेवतांना
उगीचच तिला हसतांना बघताहेत !
आपल्या बैलांना आंघोळ घालणारे हे शेतकरी
तिला लवून रामराम करताहेत.
प्रवाशांच्या रहदारीचा हा रस्ता.
तिच्या ह्या गावातूनच जातो.
कित्येक थकले भागले प्रवासी
या घाटाशेजारच्या वडाखाली विश्रांतीसाठी पथारी
पसरतात.

ह्या गावाला वळसा देऊन जाणाऱ्या नदीतून शेकडो
प्रवासी होड्या भरभरून यात्रेला जातात -
ह्याच गावावरून.
पण त्यांना कुणालाही ही जागा कधीच दिसली नाही...
दिसत नाही.
हा भंगलेला घाट,
त्याच्या ह्या विस्कळीत पायऱ्या...
या घाटाशेजारीच ती राहते.
तिच्यावर माझं प्रेम आहे !
●



## : १७ :

ऋतुचक्र चालूंच होतं !
मिलिंद कळीच्या मागं लागला होता.
रातराणीकडे पाहून चंद्रानं डोळे मिचकावले...
त्या अवखळ सावळ्या ढगानं
विजेच्या चपळाईनं
वर्षेचं चुंबन घेतलं
- आणि केवढ्यानं तरी खळखळून हसला !
...हे सगळं झाडाखाली उभं राहून
कवी निमूटपणं बघत होता.
फुलासारखं त्यानं आपलं अंतःकरण शांत केलं...
स्वप्नसृष्टीत रंगून गेला...
बिजेच्या चंद्रकोरीसारखा,
आणि विनाकारण हिंडायला लागला...
वसंतातल्या झुळकीसारखा...!
आणि अशाच एका चैत्रयामिनी
चंद्राचा बुडबुडा पूर्वेच्या
काठावर तरंगायला लागला...
त्या सगळ्या नवयौवना एकत्र आल्या.
कुणी किणकिणत्या हातांनी झाडावर पाणी शिंपडत होत्या.
कुणी राघूला दाणे चारीत...
तर कुणी मोराला पिसारा फुलवायला सांगत होत्या,
आणि कवी गाऊ लागला.
निसर्गाचं गुपित कुणी ऐकलंय् ?
ती पहा रातराणी चंद्रासाठी उसासे टाकतेय्...
उगवत्या भास्कराला बघून कमलिनी आपली ओढणी
बाजूला सारतेय्...

का ठाऊक आहे ?
कळीशी गुंजारव करणाऱ्या मधुसेवकाचं गुणगुणणं
शास्त्री पंडितांच्या डोक्यावरून गेलंय्...
पण ते गुपित मला कळलंय्...
आणि असंच कितीतरी तो गात होता.
आणि लाजेनं सूर्य निघून गेला.
झाडाच्या शेंड्याआड चंद्रानं आपलं तोंड लपवलं.
कमलिनीच्या कानांत पश्चिमवात कुजबुजला...
"हा कवी वाटतो तितका साधा नाही हं !"
मग कवीला घेऊन त्या नवयौवना फेर धरून नाचू
लागल्या -
गाऊ लागल्या -
"शेवटी निसर्गाचं गुपित फुटलं !
एकमेकांच्या डोळ्यात पहात त्या म्हणाल्या -
"मग आपण आपलं गुपित तरी कशाला ठेवायचं ?"
●



: १८ :

माझ्यावर खरोखरच प्रेम करतेयस् ?...
तर मग
तुला जन्मभर काळजीच करत बसावं लागेल.
कारण भर बाजारात असलेलं माझं घर म्हणजे एक
धर्मशाळाच आहे.
आणि संगीताच्या संगतीत स्वतःलाच हरवून बसणारा मी !
माझ्यावर प्रेम करतेयस् ?
पण मग मात्र मला त्याबद्दल काही विचारू नकोस.
कारण गीताच्या धुंदीत
तुला दिलेला शब्द मी पाळेनच असं नाही.
आज सांगितलेलं लगेच उद्या केलं
अशी माझी ख्याती नाही.

माझ्यावर प्रेम करणार आहेस नं ?
पण नंतर मात्र ते विसरून जा
प्रेमार्द्र लोचनांनी,
अन् स्मितानं गोंजारत विचारलेल्या तुझ्या प्रश्नांना;
मी मात्र कदाचित असंबद्ध, उर्मट उत्तरं देईन.

- आणि त्यावर चिरंतन विश्वास ठेऊन
नेहमीकरता तुला विसरून जावं लागेल !
●

## : १९ :

साठी उलटल्यावर हा जगाचा गलबला सोडून
वानप्रस्थाश्रमाला जायला हवं असं म्हणतात...
पण मला वाटतं हे वनवास्तव्य फक्त तरुणांकरताच
असावं.
कारण रानफुलांनी बहरलेल्या –
पक्षांच्या किलबिलाटानं, –
भृंग्यांच्या गुंजारवानं, खिदळणाऱ्या वनश्रीला -
प्रेमिकांच्या कुजबुजीनं अधिक रंगत येते.
तिथं मालती पुष्पांना चंद्रकिरणांची संगत मिळते
आणि... आणि...
हे सारं खूप काही सांगून जातं...
पण हे सगळं ऐकणारे साठीच्या पुष्कळच कमी वयाचे
असावेत.

पण काय दैवदुर्विलास बघा !
तारुण्य अननुभवी पण आशावादी... आणि म्हणूनं
वृद्धांनी गृहस्थाश्रमाचा ताबा घ्यायला हवा
आणि तरुणांनी आपआपल्या जोडीदाराबरोबर ही वनश्री
लुटावी...
एकांताचा अनुभव आनंदानं उपभोगावा !...
तुम्हाला नाही असं वाटतं ?
●



## : २० :

माझं हे गीत : त्याची कोण किंमत करणार आहे ?

त्या पंडितांच्या मेळाव्यात ?
आपल्या पांडित्यानं शब्दांचा आकांत मांडलाय् !...
तिथं, आधी बीज की वृक्ष, यावर वादंग माजलाय्...
तिथं पोथ्या पुराणं ओरडून सांगताहेत.
जीवित नश्वर आहे -
काळ सारखा पळतोय्... !!
तिथं तुझी किंमत होईल ?
माझ्या गीतांनी किंचाळून मला थांबवलं
आणि म्हटलं
'छे छे मुळीच नाही !'

मग कुठं तुझी प्रतिष्ठा समजेल ?
त्या लक्ष्मीपुत्रांच्या वैभवात ?
आपल्या संपत्तीच्या मदानं स्वतःला संगमरवरात
कोंडणाऱ्या महालात ?
त्या सुबक कल्पकतेनं रंगीबेरंगी वेष्टनांत सजवलेल्या
पुस्तकाच्या कपाटात ?
सोन्याच्या वर्खानं लिहिलेल्या पुस्तकांची पानं
सोवळी होऊन देवाला वाहिलीयेत् जणू !
माझ्या गीतांनी आवंढा गिळून म्हटलं
- 'छे :'

मग कुठं ?
हा विद्यार्थी मान मोडून पुस्तकांत डोकं खुपसून बसलाय्...

पण त्याच्या डोक्यांत तारुण्यसुलभ विचार चालले आहेत.
शब्द पुस्तकांत आणि काव्य हृदयांत...!
ह्या गोंधळलेल्या जंजाळात तुझी किंमत होईल ?
सांग ना ?
माझ्या गीतानं शरमेनं मान खाली घातली.

मग कुठं ?
त्या तिथं ?
ती नवोढा लगबगीनं आपली कामं कशीबशी उरकवून
शयनमंदिरात जाण्यासाठी आतूर झाली आहे.
घाईघाईनं उशाखालची रंगेल कादंबरी उघडते आहे.
तिच्या मुलानं चुरगळलेली,
तिच्या वेणीनं तेलकट झालेली
रंगेल कादंबरी !
माझ्या गीतानं एक दीर्घ निःश्वास टाकला !

मग कुठं ?
जिथं पक्षांची किलबिलं आतुरतेनं ऐकल्या जाते,
जिथं निर्झराचा अखंड सूर
कान देऊन गुणगुणायला लावतो -
जिथं विश्वसंगीत ऐकायला
एकांतात दोन हृदयं बिलगून बसली असतात....

माझ्या गीतानं आनंदानं आपला स्वर लावला -
●



## : २१ :

राणी,
मागच्या जन्मी तू एखाद्या सुखद, स्वप्निल प्रपातालगत
असली पाहिजेस
कारण
त्याची खळबळ तुझ्या हृदयात सामावली आहे.
किंवा स्वर्गाच्या नंदनवनातून तू इथं येण्यापूर्वी
विहार केला असला पाहिजे.
तिथल्या जाईजुईंनी आपली संपदा भरभरून तुझ्यावर
उधळली असली पाहिजे...
त्यांनी तुझ्या नकळत तुझ्या हृदयांत प्रवेश केलाय् !
नादमधुर संगीतानं सालंकृत भावगीतासारखं तुझं हास्य !
फुलानं पानाआड लपावं
आणि फक्त त्याचा सुगंधच तेवढा यावा तसं हास्य !
खिडकीतून डोकावणाऱ्या चंद्रासारखं तुझ्या अधरांच्या
गवाक्षातून
तुझ्या हृदयाची चंद्रिकाच साद घालतेय् असं वाटतं !
मग तूं कां हसलीस हे कोडं पडत नाही.
त्याबद्दल तुला काही विचारावंसं वाटत नाही !
फक्त तुझ्या हृदयाची खळखळ त्या हास्यातून
सतत ऐकत रहावी असं वाटतं !
नाही का ?
●
(देवेंद्रनाथ सेन)

## : २२ :

वृंदावनात विहार करणाऱ्या एखाद्या गुराख्याचा जन्म
सुदैवानं जर मला मिळाला
तर त्याच्या बदल्यात माझ्या
घराण्याच्या संस्कृतीची देखील पर्वा करणार नाही.
वडाच्या छायेत बसावं,
गायीगुरं वळवावीत
आणि उगाच काहीतरी चाळा म्हणून गुंज फुलांची माळ
गुंफावी.
मधूनच यमुनेच्या डोहांत उडी मारावी
त्यातल्या पाण्याशी अवखळपणा करावा...
पहाट उमलताच सवंगड्यांना साद घालावी,
आजूबाजूच्या घरातनं
ताक घुसळण्याचा आवाज घुमत असावा.
गुरांच्या खुरांची धूळ आसमंतात उधळली असावी
आणि अंगणा-अंगणातून चरवीत होणाऱ्या
दुधाच्या धारांच्या आवाजाचा गोड गोंधळ उडालेला
असावा....
आणि सायंकाळी
झाडांच्या सावल्या लांबलांब होत जाव्यात...
नदीकिनारी संध्याकाळ अवतरावी
आणि त्या खळखळत्या पाण्यात टाकलेल्या दगडांवरून
एकमेकांना धरत, किंचाळत,
गवळणी नदी पार करण्याच्या प्रयत्नांत असाव्यात...
तिथं पलिकडे मोर पिसारा उभारून आपल्याच नादात
दंग असावा



अन् एखाद्या झाडाखाली बसून आकाशातली उन्हाळी
ढगांची धावपळ बघत आपण बसावं !
एखाद्या चैत्रयामिनी
मोगऱ्याचा सुवास दरवळत असतांना,
डोक्यात मोराचं पीस अडकवून जंगलांत निघून जावं...
मोठमोठ्या वडाच्या फांद्यांवर, त्यांच्या पारंब्यांवर,
इतर गुराखी मित्रांबरोबर झोके घ्यावेत
मनसोक्त आरडा ओरडा करावा.
पश्चिमेचा गार वारा देखील मग
त्यात मनापासून भाग घेईल,
नदीवरच्या लाटांना गुदगुल्या करून त्यांना खिदळायला
लावील !
छे छे, मित्रहो, मला नेता व्हायचं नाही.
मोठमोठाले ग्रंथ लिहून ज्ञानमय प्रदीप प्रज्वलित
करायचा नाही.
पण एखाद्या वडाच्या वनात वसलेल्या खेड्यात...
वृंदवनांत, दही घुसळल्या जाणाऱ्या गवळ्याच्या घरात
मला जन्म हवा आहे !

●

## : २३ :

त्या एकलकोंड्या पुळणीवर बदकं एकमेकांचा पाठलाग
करतात आणि कासवं उन्हात अंग वाळवतात.
सायंकाळी एखाद दुसरी बोट मासे पकडायला रेंगाळत
असते : पुळणीपाशी निवाऱ्याला विसावते.
त्या वाळूबद्दल मला ओढ होती !
लांब लांब बांबूंच्या वनांत,
नदीकिनाऱ्याच्या उतारावर
नागमोडीपायवाटेनं घागरी भरायला तुझ्या खेड्यांतल्या
बायका येतात.
उंच उंच वेळूवरून हळूच सायंकाल अवतरते.
त्या नदीकिनाऱ्यावर तुझं प्रेम होतं !
ही एकच नदी आपल्या दोघांच्या मधून वाहते.

अखंड
आणि तीच ती गीतं ती सतत गात असते. एकलकोंडा,
वाळूवर पडल्या पडल्या आकाशांतले तारे मोजत
मी ते संगीत ऐकतो
आणि पहाटे पहाटे त्या पाऊलवाटेनं उतरत असता
पाण्यात पाय सोडून तू देखील तेच संगीत ऐकत होतीस.
पण त्या गीताचे मला ऐकू आलेले शब्द
तुला कळले नाहीत.
आणि तुझ्याशी त्यांचं चाललेलं हितगूज
शेवटपर्यंत मला गूढच राहिलं !

●



## : २४ :

घराची खिडकी किलकिली करून
डोइवरचा पदर बाजूला सारून
बांगडी विकणाऱ्या फेरीवाल्याची वाट पहात तूं केव्हाची
उभी आहेस ! तुझ्या आळसावलेल्या नजरे पुढून
खडखडात करीत कितीतरी बैलगाड्या धूळ उडवत
निघून गेल्या.
लांब किनाऱ्यावर बोट हाकणाऱ्याच्या गाण्यांची सुद्धा तू
दखल घेतली नाहीस.
आपल्या नातवाला खेळवतांना निरर्थक, निर्यमक
स्वप्नाळू गीतं गाणाऱ्या एखाद्या आजीबाईच्या
गाण्यासारखा या जगाचा कल्लोळ तुला भासतो आहे.
आपल्या हातगाडीवर अनेक प्रकारच्या वस्तू लादून
हिंडणारा तुझा अनोळखी फेरीवाला या आळसावलेल्या
दुपारी कुठं आहे कुणास ठाऊक ?
कदाचित् एखाद्या सायकाळी तुझ्या दाराशी येईल.
खणखणीत आवाजात साद घालील.
आणि आपल्या घराची दारं
सताड उघडून तू बाहेर येशील.
आपल्या स्वप्नांतून जागी होशील
आणि आपल्या भाग्य विधात्यात विलीन होशील !!

●

## : २५ :

तुझे हात हातात घ्यावेत,
आणि माझं हृदय तुझ्या काळ्याभोर डोळ्यात झोकावतं.
शब्दजंजाळाच्या नीरवतेत तूं हरवून बसली असतेस !
त्याचा शोध घेता घेता काळ्याशार डोळ्यात ते
तळापर्यंत डुंबून जातं !
पण तुझ्या याच प्रेमात मला समाधान मानलं पाहिजे !
ते क्षणिक आहे, चंचल आहे.
गजबजल्या चौरस्त्यावर आपण आलो होतो :
काही क्षणांकरता.
ह्या गर्दीतून
जगाच्या गलबल्यातून
गल्लीबोळातून तुला नीटपणे न्यायची शक्ती माझ्या बाहूत
आहे का ?
या भयाण अंधारात
मृत्यूच्या खाचा खळग्यांना
ओलांडणारी स्फूर्ती तुला देता येईल मला ?
●



## : २६ :

तुला माझी कधीकाळी आठवण झालीच तर मी तुला
माझ्या गीतांनी आळवीन.
ढगाळी सायंकाळ नदी किनाऱ्यावर अवतरेल.
तिचा एखादा प्रकाशकिरण मावळत्या सूर्याचा मार्ग काढीत
पश्चिमेत विलीन होईल.
अंधाराचा कवडसा किनाऱ्यावर पडला असेल.
आपल्या घराच्या सौधावर तू बसली असशील.
माझ्या अंधाऱ्या खोलीत मी प्रेमगीतं गाईन.
त्या अंधारत चाललेल्या सायंकाळी पानफुलांचा
ओला ओला वास माझ्या खोलीत येईल
आणि पलिकडल्या नारळीच्या बनांत
वादळी वारा थैमान घालत असेल.
सांजवात लावताच मी निघून गेलेला असेन
आणि त्या उर्वरित रात्री, एकांतात,
तू डोळे मिटून माझं शांत झालेलं
भावगीत ऐकत राहशील !
●

## : २७ :

माझ्या जवळ असेल नसेल तेवढं सारं मी तुला अर्पण
केलंय् ! उद्या तुला भेट म्हणून काय देईन ?
कुणास ठाऊक !
फुलांचा बहर ओसरल्यावर आपले ओकेबोके
हात पसरून आकाशाकडं नजर लावणाऱ्या वृक्षासारखी
माझी स्थिती झाली आहे !
आजपर्यंत तुला वाहिलेल्या फुलोऱ्यांत आसवांनी भिजून
चिरंजीव झालेलं एकही फूल नसेल का ?
मग त्याची आठवण ठेऊन या विझणाऱ्या वैशाखात तू
मला क्षमा करणार नाहीस का ?
तुझ्या नेत्रांत मला
त्याबद्दलची अनुकंपा दिसणारच नाही का ?

●



## : २८ :

ती माझ्या उशाशी बसली :
आपली लांब सडक बोटं माझ्या केसांतून फिरवीत.
तिचा स्पर्श माझ्या हृदयात निनादला.
मी तिच्याकडं बघितलं.
आणि शरीराचे बांध फोडून
माझी व्यथा आसूवाटे नेत्रांत दाटली
माझं स्वप्न भंगलं !
मी उठून बसलो.
खिडकीतून बाहेर बघितलं.
आकाशगंगा दिसली.
जणू सगळ्या शांततेला चिरत चिरत निघाली होती.
आणि मला उगीचच वाटलं.
तुला देखील असंच स्वप्न पडलं असेल का ?

●

## : २९ :

ती माझ्या दारावरनं गेली.
क्षणभर तिची आणि माझी दृष्टादृष्ट झाली.
मला तिच्याशी बोलायचं होतं.
शब्दांची जुळवाजुळव करीतपर्यंत ती निघून सुद्धा गेली.
शब्द अबोल राहिले.

आणि अवखळ लाटांवर हुंदडणाऱ्या होडीप्रमाणं
ते शब्द क्षणोक्षणी मनांत नाचतात.
आसमंत कशाच्या तरी शोधात हिंडणाऱ्या हेमंतातल्या
ढगांप्रमाणं ते कधी लांबलचक होतात
तर सायंकाळी उमलणाऱ्या फुलांप्रमाणं सुगंधी होतात.
काळयाकभिन्न अंधारात शोधत फिरणाऱ्या काजव्याप्रमाणं
ते हृदयात लुकलुकतात
ते शब्द.
अबोल राहिलेले ते शब्द !

●



## : 30 :

वसंतात फुलांना बहर येतो.
अव्यक्त अन् आवेगी प्रीतीच्या व्यथेसारखा !
त्या फुलांच्या गंधाबरोबर
मला जुन्या प्रेमगीताची आठवण झाली.
आणि एकदम माझ्या वृद्धत्वानं
हिरव्या पानांची,
आशा आकांक्षांची
शाल पांघरली.
माझी प्रेयसी आली नाही :
पण तिच्या स्पर्शाची भावना अंगातनं सळसळली.
लांबवरच्या मृद्‌गंधातून तिचा आवाज हुंकारला,
आभाळात तिची खिन्न नजर प्रगटली -
पण तिचे भावदर्शी डोळे ?
वातावरणांत तिच्या चुंबनाची गोडी शहारली
पण तिचे अधर ?

●

## : ३१ :

माझ्या बागेतली फुलं ! दुधाळ मधाळ अन् मादक !
सोनेरी धाग्यात गुंफून त्यांचा मी हार बनवला.
पण माझा पहारा चुकवून ती फुलं कोमेजून गेलीत
फक्त धागा शिल्लक आहे !

माझी प्रेमगीतं ! दुधाळ मधाळ अन् मादक !
माझ्या हृदयाच्या स्पंदनानं मी त्यांना झोका दिला...
पण पंख पालवून ती निघून गेलीत
माझा विरंगुळा नाहीसा झाला.
माझं हृदय संथपणानं स्पंदन करतय्...
रिकामा झोका हालवत !

त्या दुधाळ मधाळ शराबी सौंदर्यावर मी प्रेम केलं.
पहाटेच्या गुलाबी रंगाचे तिचे ओठ...
भृंगासारखे काळेशार अन् चंचल नेत्र....
ती दचकू नये, चमकू नये म्हणून मी माझ्या हृदयाची
स्पंदनं देखील शांत केली
पण...
माझ्या फुलाप्रमाणं... गीतांप्रमाणं
ती देखील निघून गेली...
मला एकटं टाकून

●

(सत्येन्द्रनाथ दत्त)




## : ३२ :

कैकवेळा वसंतानं आपल्या दरवाजावर टक्टक् केली.
मी माझ्या कामात गर्क,
अन् तू तिकडं दुर्लक्ष केलं होतंस.
आणि आज हा एकटेपणा मला जाळतोय् पोळतोय्...
पुन्हा एकदा वसंत आला आहे.
त्याला परत कसं पाठवू ?

आपल्या सुखसमृद्धीच्या बहरांत तो आला होता तेव्हा
आपल्या घरकुलाचे दरवाजे बंद होते.
पण आज मला व्यथेनं अलंकारायला आला आहे.
त्याला आत घेतलंच पाहिजे.
त्याला परत कसं पाठवू ?

●

## : ३३ :

एकदा वसंत माझ्या आयुष्यांत आला होता
आनंदातिशयानं खिदळणारा,
जुई मोगऱ्यांच्या भाराखाली लवणारा,
नवनवोन्मेषित अशोकाच्या लाल चुटुक ओठांनी संध्येला लाजवणारा.
आणि तोच वसंत आता किती वेगळ्या स्वरूपात मला भेटतोय् !
एखाद्या निर्जन, निष्कासित वाटेनं भयाण सावलीतून
वाट काढत माझ्या बरोबर माझ्या एकांतात
या खिडकीत बसून समोरच्या शेतात टक लावून बसलाय्.
तिथली हिरवळ शेवटचा निःश्वास टाकून
पांढऱ्या फटफटीत पडलेल्या आकाशाकडे निस्तेज नजर टाकून अचेतन पडली आहे !

●

## : ३४ :

आपल्या वियोगाचा क्षण आला.
शांत सजल श्रावण मेघाप्रमाणं अंधारल्यागत वाटलं.
त्या घाईगर्दीत फुलांची लहानशी मनगटी मी तुझ्या हातांत बांधली. माझे हात थरथरत होते,
तुझ्या स्नेहार्द्र दृष्टीनं ते शांत झाले.

या हिरवळीवर बसल्या बसल्या एकाकी मनात विचार येताहेत. तुझ्या हाताला बांधलेली मनगटी अजून असेल का ?
वातावरणांत मोहफुलाचा सुवास दरवळलाय् !

धानानं बहरलेल्या शेताला वळसा घालून जाणाऱ्या पायवाटेनं तू निघून गेलीस. काल रात्री माळलेला गजरा अजून तसाच होता. थोडा वेळ थांबली असतीस तर मी ताज्या फुलांचा गजरा करून तुझ्या वेणीवर बांधला असता ! माझ्या हातांनी.
कदाचित् घाईगर्दीत चालतांना तो विस्कटलेला गजरा गळून तर पडला नसेल ?

सकाळी संध्याकाळ, कितीतरी वेळा तुला माझी प्रेमगीतं म्हणून दाखवली आहेत. शेवटच्या गीताची ओळ गुणगुणतच तू निघून गेलीस. माझ्या मनात नवीन गीत स्फुरलं. तुला एकांतात ऐकवावं असं फार फार वाटलं. ते ऐकण्यासाठी तू मागं रेंगाळावंस... पण तू निघून गेलीस. माझ्या गीताचा तुला कंटाळा तर आला नव्हता ?
मग एकटी पाऊल वाटेनं जाताना माझं गीत गुणगुणतच गेली असशील का ?
त्याचा तर तुला कंटाळा येणार नाही ना ?
●



## : ३५ :

काळ्या कभिन्न मेघांनी काल रात्री आकाश भरून गेलं होतं. वादळ थैमान घालत होतं. वड-पिंपळ त्यांना मोठ्या धैर्यानं तोंड देत होते. रात्री झोपताना वाटलं स्वप्नं येणारच असतील तर माझ्या प्रेयसीच्या रूपानं यावीत
त्या ढगाळ काळोख्या वादळया रात्री.
पहाट उमलली.
समोरच्या शेतात वाऱ्याचा धिंगाणा चालूच होता. पहाटेच्या गालावरून पावसाचे अश्रू वहातच होते. ती कशी सुकल्या सुकल्यासारखी वाटत होती. छे ! स्वप्न शेवटी स्वप्नच. सत्य शेवटी कठोरच. स्वप्नाची नाजुकता त्याला कशी येणार ?
रात्री वादळ धांगडधिंगा घालत होतं. फडफडून चिंध्या झालेल्या वस्त्रासारख्या पाऊसधारा वाऱ्यानं चिरल्या जात होत्या आणि अशा अंधाऱ्या वादळया रात्री माझी प्रिया येऊन माझी स्वप्नं, माझी निद्रा, तिनं आपल्या हळूवार हातांनी कुरवाळली असती तर सत्याला खरंच हवा वाटला असता...
त्या ढगाळ काळोख्या रात्री !
●

## : ३६ :

शृंखलांनो, तुमच्या खळखळाटीचं तुम्ही संगीत केलं.
दिवस रात्री तुमच्याशी खेळता खेळता तुम्ही मला
अलंकार वाटू लागलात. माझे जिवलग मित्र झालात.
आधी मला तुमची खूप खूप भिती वाटायची पण नंतर,
कदाचित् या भीतीपायीच, मी तुमच्यावर प्रेम करू
लागलो. लांब लांब काळरात्री तुम्ही मला साथ दिलीत.
आणि आज तुमची संगत सोडताना तुम्हाला हे माझं
शेवटचं अभिवादन.

●



## : ३७ :

वल्हं मोडलीत. कितीतरी वेळा. शीडं छिन्नविछिन्न झालीत.
कशाचीही पर्वा न करता नांगर ओढीत ती भरकटलीय्.
आता ती दुभंगू पहातेय्. लाटांवरचं तिचं आसन
डळमळतय्. आता हा प्रवासाचा शेवट होणाराय्.
खडकावर आदळून ही नौका रसातळाला जाणाराय्.
लाटांच्या कुशीत शांतपणे झोपणाराय्.
- मग तिला इशारा देण्याची काय गरज ? आपल्या
झिरझिरीत ओढणी आडून रात्रीचा कृष्ण-चेहरा तिला
खुणावतोय्, मोह पाडतोय्. वादळाचा वेडाचार तिला
आनंदाच्या ऊर्मी आणतोय्. लाटांच्या सतारीचा झाला
सुरू झालाय् आणि त्याच्या तालावर तिला नाचावंसं
वाटतंय्.
मग ही बंधनं तोडून टाक.
अनिर्बंध अभयानं
अन् आवेगानं
आपल्या शेवटाला आलिंगन दे !

●

## : ३८ :

अनिर्बंध आणि खळाळत वावरणाऱ्या प्रवाहात मी ओढल्या जात होतो. तेव्हा मी तरूण होतो. फुलांची बरसात उधळीत वासंतिक लहर घोंघावत जात होती. फुलांनी बहरलेल्या ताटव्यावर पक्षीगण अव्याहत गात होते. कधीही ते विश्रांतीसाठी थांबले नाहीत.
पुरांच्या लाटांबरोबर मी उन्माद आल्यागत वाहवलो. मला इकडे तिकडे बघायला फुरसतच नव्हती. जणू मी या जगात नव्हतोच.

पण आता तारुण्य ओसरलय्. किनाऱ्याजवळ मी अडकून पडलोय्. लांबवरून कुठूनतरी संगीताच्या लहरी येताहेत. आकाशानं आपलं हृदय मोकळं केलय्. तारांच्या रूपानं मला ते खुणावतय्.

●

## : ३९ :

नजरेच्या क्षितिजांपलिकडं तो बसला आहे. स्मरणातीत गोष्टी त्यानं युगानुयुगं बघितल्या आहेत. आणि त्या विसरलेल्या गोष्टी तृणांकुरांवर चमकतात. पानापानांवर थरथरतात. तोच स्नेहार्द्र चेहरा युगानुयुगं वेगवेगळ्या पेहरावात त्यानं बघितला आहे. अनामिक तारांवर लुकलुकताना पहाटे पहाटे पाहिला आहे. म्हणून की काय त्याचं आभाळ मीलनाच्या आणि वियोगाच्या व्यथेनं वाकतं.
वसंताच्या वाऱ्यात अनादिकाळापासूनची व्याकुळता वावरते !

●

## : ४० :

"येत्या वसंतात मी तुझी वाट बघीन.
इथं हास्य अश्रूत परिपक्व होतं....
हृदयात गलबलणारी अगात गीतं काळ साकळून ठेवत
असतो."
"गलितगात्र झालेलं वय तुडवीत,
मृत्यूचा दरवाजा ओलांडून ये !
कारण स्वप्नं विरून जातात...
मनीषा मावळते...
संकलित फळं सडून जातात...
पण मी चिरकालीन सत्य आहे.
तुझी माझी भेट पुन्हा पुन्हा होत राहणार आहे.
जीवनाचं तारू किनाऱ्याकडं हेलकावत असतांना
माझी संगत तुला युगानुयुगं लाभणार आहे."

विरून गेलेल्या यौवनाचा मला संदेश आला.

●



## : ४१ :

पाणी आणायला त्या नदीवर निघाल्या आहेत.
समोरचं गर्द रान त्यांच्या हसण्यानं भरभरून आलं आहे.
छोटी छोटी जनावरं रेंगाळत रेंगाळत तिथं चरताहेत.
मधूनच एखादी खार ऊन सावलीशी खेळते.
पाचोळा तिचा पाठलाग करतोय्.
त्या पायवाटेनं त्यांच्या बरोबर जावं असं वाटतंय्.
माझी सगळी कामं संपली आहेत.
घट शिगोशिग भरले आहत.
मग दरवारजात उगीचच रेंगाळत राहून
त्या हिरव्या रानाकडे बघते आहे.
त्याचं मनसोक्त खिदळणं ऐकते आहे.
दवात भिजलेल्या पहाटे
किंवा थकल्या-भागल्या सायंकाळी
शिगोशिग भरलेले पाण्याचे घट घेऊन जाणं
मला नेहमीच आवडतं.
(माझा आवडता छंदच णालाय् तो)
त्यातलं पाणी
माझ्या आळसावलेल्या मनोबरोबर आळस देतं,
आनंदाच्या विचाराबरोबर आपणही मनांतल्या मनांत
हसतं,
किंवा दुःखाच्या वेळी हुंदके देत देत माझे अश्रू पुसतं.
आभाळातल्या वादळी दिवसांत कबुतरं शांत पडून
राहतात.
पण माझ्या घाटातल्या पाण्यानं तेव्हा सुद्धा नेहमीइतक्याच
उत्साहानं मला साथ दिली आहे.

दिवसभराची माझी कामं संपली आहेत.
घट शिगोशिग भरले आहेत.
पश्चिमेचा प्रकाश मंद झाला आहे.

झाडाखाली सावल्या जमू लागल्या आहेत :
रातराणीचे निश्वास ऐकू येऊ लागले आहेत
आणि गर्द झाडीतून सरसर पळणाऱ्या पाऊलवाटेवरून
माझे डोळे रेंगाळू लागले आहेत.
बघता बघता नदी-किनारी पोहोचले आहेत !

●



## : ४२ :

तूं फक्त चित्रच आहेस का ?
या धरित्रीइतकी किंवा त्या चमचमणाऱ्या तारकांइतकी
चैतन्यशील नाहीस ?
आसमंतात गुंतून ती आपली स्पंदनं चालू ठेवतात.
पण तू मात्र सगळयांपासून वेगळी होऊन,
चित्रित होऊन, अलिप्त बसतेस !
जीवनानं बहरलेले हात हातात घेऊन तू माझ्याबरोबर
चालत होतीस.
तुझे उष्ण श्वास अजून मला जाणवताहेत.
माझ्या शब्दांना तू स्वरांकित केलंस.
तुझ्या सुहास्य वदनाचं प्रतिबिंब माझ्या हृदयात पडत
होतं....
आणि बघता बघता तू थांबलीस !
चिरंतनाच्या आड लुप्त झालीस.

आणि माझा एकाकी प्रवास सुरू झाला !
एखाद्या अवखळ मुलासारखं आयुष्य खेळतय्.
मृत्यूचा पाचोळा उडवून मला खुणावतय्
मी खुळ्यासारखा त्या अदृश्यामागं धावतो.
पण तू मात्र तिथंच उभी आहेस.
मातीच्या आड लपून चांदण्यासारखी स्थिर आहेस.
मला चित्रासारखी दिसते आहेस.

नाही. पण तसं नाहीये !
तुझं चैतन्य नाहीसं झाल्याबरोबर

हा ओढा खळखळायचा थांबेल.
अरुणाची रंगांची उधळपट्टी बंद पडेल.
तुझ्या केशसंभाराचा तुकतुकीतपणा कमी होताच ह्या गर्द
झाडीतली सावली आपल्या स्वप्नांबरोबर विरून जाईल !

मी तुला विसरलो असेन का ?
आपल्या घाईगर्दीत चालतांना रस्त्याच्या काठची फुलं
नजरेतून सुटतात,
पण आपल्या सुगंधानं
ते सारं वातावरण भारून टाकतात,
सारं आसमंत त्यानं संगीतमय होतं !
तू या बाह्य जगांतून निघून गेलीस आणि माझ्या
जीवनाच्या गाभ्यातच विराजमान झाली आहेस.
त्यामुळे की काय
हा स्मृती विस्मृतीचा खेळ बंद पडलाय् !
माझ्या गीताची प्रेरणाच गीत होऊन बसली आहेस.
पहाटेच्या पहिल्या किरणांनी आलीस
आणि सायंकाळच्या शेवटच्या किरणांनी निघून गेलीस !
तेव्हापासून मी तुला काळोखात चाचपडतोय् !
छे ! तू नुसतं चित्रं नाहीसच !
●



## : ४३ :

तुझ्या मृत्यूनं, अनंताचं दुःख माझ्यासाठी मागं ठेवलं
आहेस !
सूर्यास्ताच्या सांध्य रंगानं माझ्या विचारांचं आभाळ तू
रंगवलंस !
त्यांच्याशी सांधणारा अश्रूंचा ओहळ मागं ठेवलास !
जन्ममृत्यूच्या मीलनाची मिठी तुझ्या बाजूनं माझ्या भोवती
मारली आहे.
आदि अनंत जिथं मिळतात त्या सौधावरून पदराआड
ज्योत स्थिरावत तूं माझ्याकडं बघत असशील.
तू मोकळ्या केलेल्या दरवाजातून माझं सर्वस्व निघून
गेलंय्...!
आता मृत्यूच्या ओंजळीत आपलं आयुष्य भरून मला
देण्यासाठी तू सज्ज झाली आहेस !
●

## : ४४ :

मृत्यूमुळं माझ्या बाह्य विश्वातून तू निघून गेलीस.
आणि माझ्या दुःखात
तुझा पुनर्जन्म झाला.
माझ्या आयुष्याला पूर्तता आली.
प्रकृती अन् पुरुष
माझ्यात एकरूप झालेत् !

●



## : ४५ :

अये स्त्रिये !
माझ्या विस्कटलेल्या घरकुलात
सौंदर्य आणि सुसूत्रता आणतेस.
सगळी घाण झाडून टाकतेस,
समृद्धता आणि नीटनेटकेपणानं सगळं सारवतेस,
देव्हारा स्वच्छ करतेस
अन् मग तेलवात लावतेस !

तसंच माझ्या भरकटणाऱ्या आयुष्याला
सन्मार्गावर आण,
काळाची घाण काढून टाक.
रिक्तता रिचव, मनाचं मखर स्वच्छ कर
आणि विचारांचा नंदादीप प्रज्वलित करून
परमेश्वराच्या सान्निध्यात
आपलं मूक मीलन होऊ दे !

●

## : ४६ :

आकाश स्वतःच्या अमर्याद निळाईकडं बघता बघता
स्वप्नांत विलीन होतं. पण आम्हा मेघांचं तसं नाही.
आम्ही बेघर अन् छंदीफंदी.
चांदण्या अनंताच्या शिरपेचांवर चमकतात.
अस्तित्वाच्या अढळ अन् चिरकालीन खुणा ठेवतात.
आमचा पुढच्या क्षणीसुद्धा मागमूसही रहात नाही.
या वातावरणाच्या रंगभूमीवर,
आम्ही आरडाओरड करून
सगळ्यांना हास्य कल्लोळात बुडवून टाकतो -
पण त्या हास्यातून पाऊस पडतो.
सौदामिनी अवतरते.
हेच आमचं खरं अस्तित्व....
पण नजरेत भरण्या अगोदरच
ज्या वादळानं आम्हाला जन्म दिला
तेच वादळ, पिटाळून नाहीसं करतं.

●



## : ४७ :

या पाऊलवाटेचं आणि माझं जन्मजन्मांतरीचं नातं आहे.
दिवसभर माझ्या पावलांशी बोलत असते.
आणि रात्री माझी स्वप्नं झंकारते.
तिचं माझं मीलन अनादी आहे.
पहाट उमलताच ती भेटते.
वसंतानं तिला बहरलेली फुलं वाहिली असतात.
गीतं गायली असतात
तिचं प्रत्येक चुंबन
पहिल्या चुंबनाइतकंच ओजस्वी असतं.
आम्ही प्रेमिक आहोत.
जुनी लक्तरं फेकून
तिच्यासाठी सतत नवीन प्रावरण मी वापरत असतो.

●

## : ४८ :

या नित्याच्या रस्त्यावरून मी जातो.
माझी फळफळावळं टोपलीत भरून बाजारांत जातो.
गुरंढोरं चारायला सुद्धा याच रस्त्यानं घेऊन जातो.
या शेजारच्या कालव्यातून माझी होडी हाकारतो.
या माझ्या नित्याच्याच गोष्टी झाल्या आहेत.
असाच एक दिवस नेहमीप्रमाणं फळांची टोपली
शिगोशिग भरून जात होतो.
आजूबाजूच्या शेतात कामकऱ्यांची वर्दळ चालू होती.
गायीगुरं मनसोक्त चरत होती.
भातशेती फुलून आली होती.
धरित्रीचं हृदय आनंदानं भरून आलं होतं.
आणि एकदम सारं वातावरण हादरलं.
आकाश जणू वाकून माझ्या कपाळाचं चुंबन घेतय् असं वाटलं.
धुक्यातून बाहेर पडलेल्या पहाटेसारखं
माझं मन टवटवीत झालं !
आणि मी माझा मार्ग विसरलो.
जणू त्यापासनं वेगळा झालो.
माझं नेहमीचं जग एकाएकी बदललं !
कळीचं फूल व्हावं तसं भासू लागलं !
नेहमीचा शहाणपणा जणू खाली मान घालून लाजून उभा राहिला.
एका स्वप्नील जगात मी जणू भरकटू लागलो.
माझ्या आयुष्यातला अतिशय दैवी दिवस वाटला तो मला.
कारण माझं चिरंजीव बालपण त्या दिवशी परत मिळालं !!

●



## : ४९ :

"स्वर्ग कुठं आहे हो बाबा ?"
'बेटा, हा प्रश्न तू मला वारंवार विचारतोस,
साधुसंत सांगतात तो जन्म-मृत्यूच्या पलीकडं आहे.
दिवसरात्रीच्या बंधनातून तो मुक्त आहे.
या धरणीवर तो नाही !'
पण तुझ्या कविपित्याला नाही तसं वाटतं.
त्या स्वर्गाला स्थलकालाची असीम ओढ आहे.
या वसुंधरेवर पुन्हा पुन्हा जन्म घेण्यासाठी तो आसुसला आहे.
तुझ्या नितळ शरीरावर त्यानं आपली पखरण केली आहे.
तुझ्या इवल्याशा हृदयात त्याची स्पंदनं चालू आहेत.
तुझ्या दर्शनासाठी हा सागर सतत गर्जना करीत असतो.
ही फुलं टाचा उंचावून उंचावून तुझं चुंबन घेण्यासाठी
आसुसलेली असतात. कारण या धरणीमातेच्या कुशीत
स्वर्ग तुझ्या रूपानं पुन्हा पुन्हा अवतार घेत असतो !

●

## : ५० :

“चांदोमामा येरे ! माझ्या छोनीचा पापा घेरे !”
आपल्या इवल्याशा मुलीला चंद्र दाखवत
तिची आई मोठ्या प्रेमानं म्हणते,
आणि आपल्या स्वप्नाळू डोळयांनी चंद्र मनोमनी हसतो.
वसंताची नाजुक सुगंधी झुळुक त्यांच्यात सामील होते.
लांबवरून आमराईत एखाद्या रातकिड्याची तान
एकांताचा भंग करते.
पलीकडून कुणा अनामिकाचे बासरीचे आर्त स्वर
वातावरण भारून टाकतात.
आणि ती आपल्या सौधावरून म्हणते -
“चांदोमामा ये रे ! माझ्या छकुलीचा पापा घे रे !”
आकाशातल्या प्रकाशाकडे एकदा बघते
आणि एकदा आपल्या मांडीवर असलेल्या वसुंधरेच्या
छायेकडे बघते -
आणि त्या चंद्राच्या शांतपणाचं मला आश्चर्य वाटतं !
आणि ती छकुली हसते.
आपल्या बोबड्या भाषेत आईचे शब्द घोळवते...
“येले चांदोमामा येले !...”
आई कौतुकानं हसते.
सारी यामिनी हसू लागते....
या साऱ्या चित्राकडे; छकुलीच्या आईकडे,
चंद्राकडे मी अनिमिष नेत्रांनी बघत बसतो.
एका कोपऱ्यातून... लपून...!

●

(दैव्द्रलाल राय यांच्या बंगाली कवितेवरून)



## : ५१ :

शिशिराचे सुरवाती सुरवातीचे दिवस :
निरभ्र आकाशाचे दिवस.
नदी दुथडीभरून तृप्तीनं वहात असते...
वाहता वाहता किल्ल्याच्या तटातून भेडसावणाऱ्या
झाडाच्या मुळ्या धुऊन जाते.
गावातून येणारी लांबच लांब पायवाट तहानलेल्या
जिभेसारखी नदीचं पाणी पीतच असते.
सभोवती बघतां बघतां माझं हृदय भरून आलं.
निरभ्र निःशब्द आकाश आणि अव्याहत वाहणारं पाणी !
गोजिरवाण्या बाळाच्या हास्यासारखा सगळीकडं आनंद
नुसता दुथडीभरून वाहात होता !

●

**: ५२ :**

हेमंत अजून जायचाच होता.
त्यापूर्वीच, वाट पाहून पाहून, शेवटी आपली बंधन तोडून
पुष्पांना तुम्ही उमलतात.
कारण कोपऱ्यावरून येणाऱ्या वाटसरूची
चाहूल तुम्हाला लागली.
धापा टाकत, धावत हा मोगरा अन् गुलाग मोकळा झाला.
आणि मृत्यूला कवटाळण्यात देखील
तुम्हीच प्रथम पुढं सरसावलांत !
आपल्या रंगाची उधळण, गंधाचा उन्माद, वातावरणांत
उधळून
आपल्या राशी मातीत मिसळवल्यात,
एकमेकांकडे हसत पहात
निर्भयपणानं मावळलात.
दक्षिण किनाऱ्यावरच्या लाटांवर बसून ग्रीष्म येईल.
नेहमीच्या वेळी !
पण त्याची वाट बघत बसण्याइतका तुम्हाला धीर कुठाय् ?
स्वतःवरच्या विश्वासानं, आनंदानं बेहोष होऊन आपलं
सर्वस्व उधळून टाकलंत्.
त्याच्या पावलांची चाहूल तुम्हाला लागली
आणि त्याच्यासाठी तुम्ही आपल्या जिवाच्या पायघड्या
पसरवल्या !
'बंधन' सोडवण्यापेक्षा ती तोडून टाकणं तुम्ही पत्करलं.
त्यानं हृदयाशी धरण्यापूर्वी
तुम्हीच त्याच्या हृदयात शिरलात !

●

**: ५३ :**

वसंतानं शेवटचा निश्वास टाकला
आणि माझी कळी उमलली.
ग्रीष्म आपल्या तापलेल्या ओठांनी धरतीची चुंबनं घेऊन
तिला हैराण करत होता.
मला भीती वाटली.
थोडसं कुतुहलही वाटलं...
एखाद्या वात्रट मुलानं आश्रमात डोकावून पहावं तसं माझं
झालं !
उन्हानं कावलेल्या वनराईचं कण्हणं ऐकू येत होतं.
वर्षेला टाहो फोडून हांक मारणाऱ्या कोकिळेत
साऱ्या आसमंतात होरपळणाऱ्यांची वेदना होती.
पानाआड लपून मी बाहेर बघितलं.
सारं रान एखाद्या आजोबासारखं गंभीर अन्
कंटाळल्यासारखं दिसत होतं...
खचल्यासारखं !
पण माझ्या यौवनानं मला धीर दिला.
आत्मविश्वासानं आणि धैर्यानं मी पुढं सरसावले.
आकाशाच्या तळपत्या पेल्यातून सूर्याचं तेज प्याले...
अभिमानानं अरुणाला वंदन केलं आणि आज त्या सूर्याचं
तेज आणि गंध ल्यालेली मी चंपाकली आत्मविश्वासानं
डोलते आहे !

●

(सत्येन्द्रनाथ दत्त यांच्या बंगाली कवितेवरून)

## : ५४ :

अनंतकाळापूर्वी परमेश्वराला स्वप्न पडलं.
त्यातून दोन स्त्रिया निर्माण झाल्या.

एक इंद्राच्या दरबारांत नर्तकी झाली.
पुरुषाला हवीहवीशी वाटणारी,
बुद्धीवंतांचा, मुनिवर्यांचा तपोभंग करणारी,
मूर्खांना खेळवणारी -
खेळवता खेळवता त्यांना उधळून टाकणारी
नर्तकी !

दुसरी स्वर्गाची महाराणी झाली.
आई झाली.
विपुलतेच्या सिंहासनावर विराजमान झाली.
सुगीच्या दिवसांत थकल्या जिवांना हसवणारी...
अश्रूंना रिचवणारी....
सागरासारखी गांभीर्यानं नटलेली....
आणि मनुष्य जातीला जन्ममृत्युच्या पावित्र्यानं
पुनीत करून त्या अनामिकेच्या सन्निध आणणारी
आई !

●



## : ५५ :

भुंग्यासारखी दुपारच्या वाऱ्यानं भुणभुण लावली आहे.
विशाल पक्षिराजाप्रमाणं झोपड्यांची छपरं दिसताहेत.
त्याखाली सगळं घरकुलं आळसावलं आहे
आणि दूर पानाआडून कोकिळ गातो आहे...
एकाकी,
माणसांच्या ह्या बेसूर गजबजाटावर स्वरांचा तवंग
पडला....
आणि त्याला सुरेलपणा आला.
प्रेमिकांची कुजबूज निनादू लागली...
आईनं बाळाची घेतलेली चुंबनं संगीतमय झाली...
मुलांच्या हसण्यात गोडवा आला...
शंख शिंपल्यावरून वाहणाऱ्या निर्झराप्रमाणं आपल्या
विचारांवर ते (स्वर) वाहतात...
त्याला गोलाई आणतात...
सौंदर्यानं भूषवतात !

●

## : ५६ :

त्या एकाकी सायंकाळी
मी पुस्तकावरून डोळे फिरवत होतो.
शेवटी कंटाळा अनावर झाला.
वाटलं, सौंदर्य ही केवळ कविकल्पना असली पाहिजे.
उबग येऊन मी पुस्तक मिटलं
आणि फुंकर मारून दिवा मालवला....

आणि बघता बघता खोली
चंद्र किरणांनी न्हाऊन निघाली...
खिडकीतून आलेल्या चोरट्या चंद्रकिरणांनी !

आकाश शिगोशिग भरून वाहणाऱ्या तेजोदेवते !
एरवाद्या लहानशा ज्योतीमागे तू कशी लपून बसू
शकतेस ?
अहो आश्चर्यम् !
मग पुस्तकातले निरर्थक शब्द
धुक्यासारखे पसरून
भूगर्भाच्या अव्यक्त शांतीला झाकळून टाकावेत
ह्यात काहीच आश्चर्य नाही.
नाही का ?
●



## : ५७ :

हा शिशिर माझा आहे.
कारण ती माझ्या हृदयात आहे.
खळबळ माजवतेय्..
तिच्या पैंजणाची रुणझुण नसानसात भिनलीय्.
तिच्या पदराची फडफड माझ्या श्वासांत धडधडतेय् !
माझी सारी स्वप्नं तिच्या काळ्या केशकलापांनी
चितारलीय्.
माझ्या हृदयांत स्पंदन करणारी पानझड
ती भिंगरीसारखी फिरवतेय्...
माझ्या नेत्रांतलं तेज पिणारे तिचे नयन
आकाशांतून हसताहेत !....
●

## : ५८ :

आकाशांत हास्याचा कल्लोळ उठतो...
धूळमातीचं वादळ होतं...
ते अवखळ मुलासारखं हास्य करत राहतं...
त्या कल्लोळातून माणसाचं मन जागून उठतं...
विचारांचे खेळ सुरू होतात.
अवकाशांतून स्वप्नं उमलतात...
आधारासाठी धरित्रीला धरतात...
स्थिरावतात...
दगड-विटा जमवतात आणि
त्यातून माणसाची शहरं उभी राहतात...

भूतकाळ आक्रोश करीत उभा ठाकतो...
वर्तमानाकडून प्रश्नांची उत्तरं मागतो....
अंधाराचे भयाण पंख पालवतो...
विचारांच्या आलोचन यामिनी
आपली घरकुलं सोडून अंधाऱ्या वाळवंटात लुप्त
होतात....
आसुसल्या नेत्रांनी आकाराचा शोध घेतात...
काजळल्या ज्योतीनं... प्रकाशाच्या शोधात निघतात...
वस्तूमात्रांसाठी केलेली केविलवाणी धडपड...
त्यांना कवीच्या काव्यांत स्थान मिळेल...
उद्याच्या वस्तीत एखाद्या दीपस्तंभात विराजमान होतील...
भविष्याच्या युद्धात शस्त्रास्त्रांनी लढतील...
येणाऱ्या शांततेचं स्वागत करायला....!
●



## : ५९ :

इथं गगनचुंबी इमारती नाहीत,
रस्त्याच्या काठाकाठानं हिरवळ धावते आहे...
पलिकडे त्या बाजूला मोहक पाण्यानं
दुथडी भरून निर्झर खळाळतो आहे...
झोपडीच्या सभोवात फुलांची गर्दी झाली आहे.
तिथं मिलिंदाचं अखंड गुंजन चालू आहे.
सस्मित निरोप येऊन इथली माणसं सकाळी कामावर
जातात...
आणि गाणी गुणगुणत सायंकाळी परत येतात.
दुपारच्या वेळी या हिरवळीवर बसूनच
आनंदाची जाती घरघरतात...
पिकांनी डवरलेल्या शेतावरून पश्चिमेकडच्या वाऱ्यात
गुराख्यांच्या पाव्यांचे स्वर नाचत बागडत येतात...
येणाऱ्या जाणाऱ्या वाटसरूंना ते स्वर आवाहन करतात.
त्यांचं हृदय हेलावत...
ते आपले स्वर त्यात अलगद सोडून देतात.
मोठमोठे व्यापारी त्या नदीतून आपला माल
वल्हवत वल्हवत नेतात...
पण इथं थांबत नाहीत...
विजयपताका फडफडवत सैनिक तालबद्ध पावलं टाकत
ह्या गावावरून जातात.
त्यांचा राजा त्यांच्या पाठोपाठ रथांतनू येतो...
इथं न थांबता पुढं निघून जातो...
दूरदूरचे प्रवासी जाता जाता थोडा वेळ इथं टेकतात...
पण ह्या गावासंबंधी त्यांना काहीच माहीत नसतं...

ते तसेच पुढं निघून जातात.
इथं रस्त्यारस्त्यावर माणसं चकाट्या पिटत
उभी रहात नाहीत.

कविराज,
आपण इथंच रहावं
देशोदेशीची धूळ पायावरून धुऊन टाका.
इथल्या स्वरांत आपले स्वर लावा
आणि दिवस अखेर या शांत हिरवळीवर ताणून द्या !
डोक्यावर फक्त सायंतारा लुकलुकत असेल !
हे पूर्ण समाधानी गाव आहे.
●



## : ६० :

सुमंत महोदय,
ही आपली संपदा परत घ्या.
वनांत शांतपणं तो तरूण तपश्चर्येला बसला होता...
त्यानं आजपर्यंत स्त्रीचं तोंडही बघितलं नव्हतं...
त्याचा तपोभंग करायला आपण आम्हाला पाठवलं होतं...
आणि त्याबद्दल आपण हे धन आम्हाला दिलं होतंत् !
पण ते काम माझ्या हातून झालं नाही.

नुकताच अरुणोदय झाला होता...
तो बालमुनी नदीवर स्नानासाठी आला होता.
पहाटेचे मेघ हलकेच खाली वाकावेत...
तसे त्याचे केशकलप त्याच्या खांद्यावर रुळत होते...
सूर्यकिरणांसारखे त्याचे लांब तेजस्वी हात
अर्घ्य घेवून उभे होते...
आमची होडी आम्ही वल्हवत वल्हवत त्याच्या जवळ
जाऊ लागलो...
नदीच्या खळखळाटाशी आमचा हास्यकल्लोळ
स्पर्धा करत होता.
वेडानं धुंद होऊन आम्ही पाण्यात उड्या टाकल्या.
त्याच्या भोवती फेर धरून नाचू,
गाऊ लागलो...
सूर्योदय झाला...
आमच्या त्या क्रीडेकडं रागानं लाल होऊन पाहू
लागला...
पाण्याच्या लहरीलहरीवर त्याच्या संतापाची दृष्टी थरथरू
लागली.

त्यानं आपले निरागस डोळे उघडले.
आमच्या हालचाली न्याहाळल्या...
त्याच्या डोळ्यांतलं कुतूहल वाढलं...
अन् पहाटवाऱ्यासारखं शांत झालं...
हात जोडून पक्षासारख्या गोड आवाजात
त्यानं स्तुतिस्तोत्र म्हटलं... त्यानं सारं रान शहारलं, रोमांचित
झालं !
मर्त्य स्त्रियांसमोर असं स्तोत्र ह्यापूर्वी कधीच गायल्या
गेलं नव्हतं...
पहाडामागून उमलणाऱ्या अरुणाच्या स्वागतासाठी
गायल्या जाणाऱ्या भूपाळीसारखे ते शब्द वाटले...
आपल्या तोंडावर हात ठेवून बाकीच्या साऱ्या हसू
लागल्या....
सगळं शरीर घुसळत घुसळत हसू लागल्या.
ते पाहून त्याचा चेहरा प्रश्नांकित झाला...
मला तो खुपला...
लगबगीनं त्याच्याकडे मी गेले.
चरणस्पर्श करत म्हणाले,
"प्रभो माझी सेवा स्वीकारावी !"
त्याला हाताला धरून हिरवळीवर नेलं...
माझ्या रेशमी पदरानं त्याचं सारं अंग पुसलं...
त्याच्या पायाशी बसून पावलं स्वच्छ केलीत.
माझ्या कुंतलांनी त्याच्या चरणांवर चवऱ्या ढाळल्या...
मान वर करून त्याच्या नजरेला नजर भिडवली.
तेव्हा जगांतल्या पहिल्या चुंबनाचा मला जणू साक्षात्कार
झाला...
खरंच, किती सुदैवी मी !



मी स्त्रीत्व देणाऱ्या परमेश्वराचे आभार कसे मानावेत
हेच मला कळेना....
तितक्यात तो म्हणाला, "खरंच, तू कुणी अनामिक देवता
आहेस...!
तुझा स्पर्श म्हणजे चिरंजीवि स्पर्श आहे.
तुझ्या नजरेत रात्रीच्या गर्भाची गूढता आहे..."

छे छे असं हसू नका.
आपल्या वृद्ध नेत्रांवरचं हे शब्द जंजाळाचं निरर्थक
शहाणपणाचं पटल जमलं आहे.
पण त्या बालयोग्याची निरागस दृष्टी
मला घायाळ करून गेली आहे...
त्या दृष्टीला स्त्रीचं दैवी स्वरूप दिसलं होतं...
जाणवलं होतं !
त्या पहिल्या पूजनानं माझ्यातली 'देवता' जागी झाली...
माझे डोळे भरून आले.
बहिणीच्या मायेनं माझ्या केसांवरून हात फिरवला...
पहाटवाऱ्यानं माझ्या कपाळाचं चुंबन घेतलं...
हळुवारपणानं
फुलांचं चुंबन घेणाऱ्या फुलपाखराइतक्या हळुवारपणानं !
माझ्या मैत्रिणींनी टाळ्या वाजवल्या.
कुत्सितपणानं हसल्या...
केश मोकळे सोडून, वस्त्रांची देखील शुद्ध न ठेवता
त्याच्यावर फुलं उधळली...
लाजेनं माझी मान खाली गेली.
पण तो एखाद्या सूर्यासारखा निष्कलंक होता.
वाटलं, माझ्या लज्जेचं आवरण त्याच्या भोवती वेढून
ह्या सगळ्यांपासून त्याला वेगळं करावं...

मला सहन झालं नाही.
घायाळ हरिणीवत् मला झालं.
त्याच्या चरणांवर कोसळत मी ओरडले -
'क्षमा करा महाराज क्षमा करा !'
त्या स्त्रियांचं खिदळणं मला जाळीत होतं...
पण माझ्या कानात त्याचे स्वर रुणझुणत होते -
तू कुणी अनामिक देवता आहेस का ?
तू कुणी अनामिक देवता आहेस का ?...
...अनामिक देवता......."

●



# मालाकार...

'Gardner' ह्या इंग्रजी काव्यसंग्रहाचा मराठी भावानुवाद



- राम म्हैसाळकर

---

"मूळ बंगालीत असलेल्या ह्या प्रेम आणि जीवन विषयक कविता "गीतांजली" ह्या काव्यसंग्रहातल्या आध्यात्मिक कवितांच्या बरेच आधी लिहिल्या होत्या.
मूळ बंगाली कवितांचे हे इंग्रजी भाषांतर शब्दशः नाही.
काही संस्कारित तर काही विस्तारित आहेत."
'Gardner' ह्या इंग्रजी काव्यसंग्रहाची प्रस्तावना.
त्या काव्यसंग्रहाचा हा भावानुवाद.

- राम म्हैसाळकर

---

सौ. कमा,
तुझ्या मनोमशागती किमयेला.

- राम म्हैसाळकर

## : १ :

"राणीसरकारांचा जयजयकार असो !
सेवकावर कृपादृष्टी व्हावी !"

"दरबार केव्हाच संपला. दरबारी मानकरी सगळे निघून
गेलेत. इतक्या उशिरा कां आलास ?"

"सगळ्या दरबारी मानकऱ्यांची कामं संपल्यावरच
माझं कार्य सुरू होतं.
आपल्या सेवेत आणखी काही न्यून राहिलं असल्यास
त्याची पूर्तता करण्यासाठी आलो आहे !"

"इतक्या उशिरा कसली सेवा करणार आहेस ?"

"राणीसाहेब,
आपण आपल्या बागेचा मला मालाकार नेमा !"

"छे, छे ! हा कसला मूर्खपणा ! हे असलं काम
तुझ्यासारख्या शूर सैनिकाला...."

"मी माझी इतर सगळी कामं आता सोडून देतो.
ही तलवार, भाला, बर्ची पार फेकून देतो. लांबलांबच्या
राजेरजवाड्यांकडे मला वकील म्हणून पाठवू नका !
नवीन स्वाऱ्या - मोहिमा अंगावर टाकू नका.
आपल्या फुलबागेचा मला मालाकार बनवा !"

"मालाकार बनून तू काय करशील ?"

"आपली राजकारणी मुत्सद्दीपणाची कामं संपल्यावर माझं
कार्य सुरू होईल.

"आपल्या आळसावलेल्या काळातली कामं मी करीन.
"आपल्या पहाटेच्या पाऊलवाटेवरली हिरवळ मी स्वच्छ ठेवीन.
"आपल्या चरणांचं चुंबन घेण्यासाठी आतुरलेल्या,
अभिवादन करता करता कोमेजण्यासाठी आसावलेल्या
कलिकांची जोपासना मी करीन.
सप्तपर्णीच्या विशाल फांदीवर हिंदोलणाऱ्या झोपाळयावर
आपल्याला मंद मंद झोके देईन.
पानापानांच्या झरोक्यांतून आपल्या मुखकमलाचं दर्शन
घेण्यासाठी धडपडणाऱ्या उगवतीच्या चंद्रकिरणांची
दोलायमान होणारी मनोवृत्ती अनुभवून स्वतःला धन्य
समजेन आणि उशाशी शांतपणे आपली सोबत करणाऱ्या
रत्नदीपांत आपल्या बागेत बनवलेलं तेल भरीन.
आपली पावलं चंदनाच्या उटण्यानं आणि सुगंधी
केशरानं चित्र विचित्र सजवीन...."

"...आणि त्याबद्दल तुझा मोबदला ?...."

"कमलकलिकेसारख्या आपल्या करात फुलांच्या मनगटी
सरकविण्याची माझी मनीषा मानावी, अशोकाच्या
लालचुटुक उटण्यानं आपली पावलं रंगवण्याची आज्ञा
व्हावी आणि त्या नाजूक पावलांवर उगाचच रेंगाळणारे
धूलिकण माझ्या ओठांनी पुसून टाकण्याची परवानगी
मिळावी !...
राणीसरकार,
सेवकाची एवढीच इच्छा आहे ! आपण नाही
म्हणू नये"

"तुझी विनंती आम्ही मान्य करीत आहोत. आजपासून
आमच्या बागेचा तू मालाकार आहेस !....."

●



## : २ :

"माझ्या कवी मित्रा,
"सायंकालीन सावल्या लांब लांब होत चालल्या आहेत.
"आणि तुझ्या केसांत पांढुरक्या छटा प्रवेश करू लागल्या आहेत.
"एकांतात बसून पैलतिरावरचे संदेश ऐकतोयस् ?"

"होय. सायंकाल आला आहे. मी एकांतात ऐकत बसलो आहे !
कदाचित् गावातून कुणीतरी मला साद घालील.
कदाचित्, इतक्या उशिरा सुद्धा !
"भटकणारी दोन तरूण हृदयं भेटतात की नाही
इकडं माझं लक्षं आहे !
"उत्कंठेनं शिगोशिग भरलेली लोचनं प्रितीचं कूजन करतील !
हृदयमीलनाच्या एकांतात त्याचं गायन करतील !
त्यांच्या भावना व्यक्त करतील !
"आणि मी जर इथे असा मृत्यूच्या आणि त्या अतीत
विचारात मश्गूल झालो तर त्यांची भावगीत कोण
गाणार ?
"....सायंतारा क्षीण होतो आहे.
शांत वाहणाऱ्या सरितेशेजारची चिता शांत होत चालली
आहे.
"फिकटलेल्या चंद्राच्या साक्षीनं एकाकीपणानं उभ्या
असलेल्या घरकुलाजवळून कोल्हे-कुई सुरू झाली आहे
"एखादा भटकणारा प्रवासी आपल्या घरापासून दूर, इथं

ह्या नीरव निशेची कुजबूज ऐकू लागला तर जीविताचं
रहस्य त्याच्या कानात कोण सांगणार ? त्यासाठी माझ्या
घराची दारं बंद करून ह्या नाशवंत बंधनातून मुक्ती
मिळविण्याचे विचार मला सोडून द्यायला नकोत का ?
"माझ्या पांढऱ्या केसाचं काय विशेष ?
"ह्या गावच्या वृद्धाहून मी वृद्ध आहे - तरुणाहून तरूण
आहे.
"काहींचं हास्य साधं आणि सरळ असतं
तर काहींचं हास्य लाजेनं लोचनांत जमा होतं !
"भर दिवसा काहींचे डोळे भरून येतात. तर काही आसवं
अंधारात ओघळतात !
"ह्या सर्वांना माझी आवश्यकता आहे !
"आणि मला मरणोत्तर कल्पना करण्यासाठी वेळ नाही !
"सर्वांच्या बरोबरीचा आहे मी ! मग माझे केस पांढरे झालेत
म्हणून काय बिघडलं ?"

●



## : ३ :

सकाळी मी माझं जाळं समुद्रात फेकलं !
त्या रहस्यमय खोलीतून चित्रविचित्र सौंदर्यानं खुलणाऱ्या
वस्तू मी बाहेर काढल्या ! काही हास्यासारखा मिष्किल
होत्या; काही आसवांसारख्या चमकदार होत्या ! - तर
काही नवोढेच्या गालांवरल्या रक्तिमेसारख्या लाजाळू
होत्या !
आणि दिवसभराच्या मेहनतीनंतर त्या घेऊन मी घरी
आलो !
माझी प्रिया बगीच्यांत फुलांच्या ताटव्यात बसली होती.
रिकामपणचा चाळा म्हणून फुलांच्या पाकळ्या खुडत
होती.
क्षणभर मी थबकलो आणि - आणि - सारी संपदा मी
तिच्या पायाशी ओतली ! शांतपणं मी उभा राहिलेलं
बघताच तिनं माझ्याकडं वळून पाहिलं आणि म्हणाली,
"काय चित्रविचित्र वस्तू ह्या ! पण मला ह्यांचा काय
उपयोग ?"
शरमेनं मी माझी मान खाली घातली
- खरंच, हे मी विकत घेतलेलं नाही. त्यासाठी मी
झगडलो सुद्धा नाही... छे, छे !... ह्या वस्तू भेट
देण्यासारख्या नाहीत !...

आणि रात्रभर बसून त्या मी एकामागून एक खिडकीतून
बाहेर फेकून दिल्या !
दुसऱ्या दिवशी देशोदेशीचे प्रवासी आले !
त्या वस्तू त्यांनी गोळा केल्या
आणि अभिमानानं जगाच्या कानाकोपऱ्यात निघून गेले !

●

**: ४ :**

नदीच्या शेजारी गजबजलेल्या रस्त्यावर त्यांनी माझं घर
कां बरं बांधलं ?
माझ्या झोपडीपाशीच ते आपल्या होड्या बांधतात....
ते येतात.... मनसोक्त भटकतात.... जातात...
माझ्या खिडकीत बसून मी त्यांना बघतो....
उसासे टाकीत वेळ निघून जातो !
त्यांच्याकडे दुर्लक्ष करीन म्हणावं तर ते जमत नाही !
असे दिवसच्या दिवस निघून जातात !
दिवसरात्र त्यांच्या पावलांची चाहूल येत असते....!
ते अनोळखी आहेत ह्याची जाणीव मला सारखी
टोचत असते !
पण प्रत्येकाला मी कुठंतरी बघितलय् असं उगीचच
वाटतं !
त्यांच्याकडं दुर्लक्ष करावं - तेही जमत नाही ! सारखं
वाटतं, त्यांना म्हणावं
"अनोळखी आहात, पण... माझ्या घरात या ना !
खरंच या ! आपण ओळख करून घेऊ !"
पण छे !

सकाळी काकड आरतीच्या वेळी देवळातली घंटा ते
वाजवतात !
फुलांच्या परड्या भरभरून फुलं नेतात !
आणि आपल्या देवाला वाहतात !
शुचिर्भूत होऊन, कपाळी गंधाचा टिळा लावून देवाला ते
प्रणाम करतात.... फुलं वाहतात !
अरुणोदयात त्यांचे चेहरे उजळतात ! वाटतं - ओरडून
ओरडून त्यांना सांगावं -

"माझ्या बागेत या ! इथं फुलांची रेलचेल आहे !
या माझ्या बागेत ! या ना !" पण छे !
समोरच्या देवडीवर मध्यान्हीचे ठोके पडतात !
आपली कामं सोडुन ते माझ्या कुंपणाशी कां बरं
घुटमळताहेत !
त्यांच्या हातातली फुलं कोमेजली असतात ! आणि त्यांच्या
पाव्यांतले सूर देखील थकले थकले वाटतात !
तिकडं दुर्लक्ष करावं तर ते देखील जमत नाही !
वाटतं सांगावं !
"माझ्या आमराईत या !
दाट छाया वितरते आहे इथं !'
पण छे !

रात्र अंधारली !
रातकिड्यांची किरकिर सुरू झाली आहे !
हा कोण माझ्या दाराशी टकटक करतो आहे ?
अगदी संथपणानं !
त्याचा चेहरा अस्पष्टसा दिसतोय्.
एक अक्षरही न बोलता आम्ही एकमेकासमोर उभे
आहोत !
सारं अवकाश अचेतन आहे !
त्या माझ्या शांत मित्राला परत पाठवू ?
छे, छे !
शक्य नाही !
त्या अंधारात माझ्या मित्राच्या नजरेला नजर भेटताच
सारा कालखंड एखाद्या स्वप्नासारखा विरल होतो...
स्वप्नासारखा विरल होतो...!
●

## : ५ :

मी अस्वस्थ झालो आहे !
क्षितिजातीत वस्तूंसाठी मी व्याकूळ झालो आहे.
माझा आत्मा त्याच्या स्पर्शसुखासाठी आसावला आहे !
हे अनंता ! मुरलीमनोहरा !
तुझ्या संगीतानं मला साद घातली आहे ! मला पंख नाहीत !
ह्या मोहजालात मी कायमचा गुरफटलो आहे ! ह्याचा मला विसर पडतो आणि मी अस्वस्थ होतोय् ! मी अधीर अंतःकरणानं, आसुसलेल्या नेत्रांनी बघतोय् !
परस्थासारखी कालक्रमणा करतोय् ! श्वासागणिक माझी आशा अंकुरते ! पण अशक्यतेच्या जाणिवेने विरामते !
माझी वाचाच माझ्या हृदयाला गोंजारते !
अव्यक्ता ! मुरलीमनोहरा ! तुझ्या संगीतानं मला साद घातली आहे.
पण मला मार्ग कुठं माहीत आहे ? भुर्रकन् तुझ्याजवळ उडून यायला पंख कुठं आहेत ?
माझी असमाधानी वृत्ती माझं हृदय पोखरते !

त्या अनंताच्या निळाईत मी डोकावतो.
त्यात मला तुझं विशाल स्वरूप दिसतं.
अमर्यादा ! मुरलीमनोहरा ! तुझ्या संगीतानं मला साद घातली आहे.
पण माझ्या एकाकी घरकुलाची दारं कायमची बंद झाली आहेत !
इथं मी एकटा टिपं गाळीत बसलोय् !
अगदी एकटा !

●



## : ६ :

पाळीव पक्षी पिंजऱ्यात होता !
अनिर्बंध विहरणारा विहंग वनांत होता !
नियतीनं नियोजिलेल्या वेळी त्यांची भेट झाली !
विहंग म्हणाला -
"चल आपण वनांत विहार करू या !"
पक्षी म्हणाला -
"छे, छे ! तूंच इथं ये. आपण दोघंही इथं पिंजऱ्यात राहू या !"

"पण गजांच्या चौकटीत आपले पंख पालवायला जागा कुठं आहे ?"

"मग त्या अनंताच्या निळाईत मी बसणार तरी कुठं ?"

विहंग म्हणाला -
"चल आपण भराऱ्या मारत रानगीतं आळवू -"
पक्षी म्हणाला -
"माझ्याजवळ ये, मी तुला माणसारखं बोलायला शिकवतो ! मला तू रानगीतं शिकव !

विहंग म्हणाला -
छे, दे ! गीतं शिकवून येत नाहीत. ती हृदयातून आपोआप बाहेर पडतात - निर्झरासारखी !"

त्यांचं एकमेकांवर मनापासून प्रेम आहे. पण पंखात पंख मिसळवून ते कधीच विहरू शकणार नाहीत !

त्यांना दुरावणाऱ्या गजांतून एकमेकांकडे ते एकटक पहात
असतात ! पण एकमेकांना कधीच समजू शकत नाहीत !
फडफडणाऱ्या पंखातून एकच आक्रंदन चालू असतं -
"ये ! माझ्या जिवलगा ! आणखी जवळ ये !!"
विहंग म्हणतो -
"ते शक्य नाही ! पिंजऱ्याच्या बंद दरवाजाची मला भिती
वाटतेय् !"
आणि पक्षी हुंदके देतो
"....अरेरे ! माझ्या पंखातली शक्तीच कुणी नेली आहे !
का मला असं क्षीण केलय् ?"

●



## : ७ :

**"अग आई घाई कर ना !**

"राजकुमार आज आपल्या घरावरून जाणार आहेत.
माझं कामात लक्षच लागत नाही !
माझी वेणी घालून दे ना !
माझा भांग पाडून दे !
आणि मी कोणकोणते दागिने घालू ते सांग ना !
"इश्श ! अशी बघतेस काय माझ्याकडं ?
"ते माझ्या खिडकीकडं बघणार नाहीत !
"खिडकीत मी उभी असलेली त्यांना दिसणार सुद्धा
नाही !
क्षणार्धात ते माझ्या नजरेपुढून अंतर्धान पावतील !
आणि ते नसल्याची जाणीव हुंदक्यांच्या रूपानं मला
बिलगेल.
"हे सगळं मला माहीत आहे, आई ! पण...
कुमार आज आपल्या घरावरून जाणार आहेत.
"आणि त्या एका क्षणाकरता मी स्वतःला जास्तीत जास्त
आकर्षक सजवीन."

"आई, राजकुमार आज आपल्या घरावरून गेलेत !
उदयोन्मुख सूर्यानं त्यांचा रथ चकाकत होता !
माझी ओढणी मी चेहऱ्यावरून दूर केली आणि
गळ्यातली लाल कंठी मी त्यांच्या मार्गावर फेकली !
"इश्श ! माझ्याकडं अशी बघतेस काय ?
"त्यांनी कंठी उचलली नाही !

तिकडं बघितलं सुद्धा नाही ! त्यांच्या रथाखाली ती
चिरडल्या गेली !....
त्या खालची माती त्यानं लाल लाल झाली !
ती कंठी कुणाची होती -
कुणासाठी होती...
कुणालाच कळलं नाही !
"हे सगळं मला माहीत आहे !
पण आई, कुमार आपल्या दारावरून गेले -
आणि माझ्या हृदयावर रुळणारी मौक्तिकमाला मी
त्यांच्या पायघड्यांसाठी पसरवली !"
●



**: ८ :**

पहाटेच्या प्रकाशांत माझ्या मंचकाजवळचा दिवा शांत
झाला !
पक्षांच्या किलबिलाटानं माझी झोप उघडली.
ताज्या फुलांची वेणी माळून, केस मोकळेच सोडून मी
खिडकीशी उभी होते !
सूर्योदयाच्या उधळलेल्या गुलालातून तो तरूण प्रवासी
आला !
टपोऱ्या मोत्यांची माळ त्यानं गळयात घातली होती. सूर्याचे
नाजुक किरण त्याच्या मुकुटाची शोभा वाढवत
होते !
आणि अचानक तो माझ्या दाराशी थांबला.
आतुरलेल्या नेत्रांनी त्यानं मला विचारलं -
"कुठं आहे ती ?"....
"ही मी इथं आहे...!"
पण माझी लज्जा अवखळ. तिनं मला काहीच बोलू दिलं
नाही !

सायंकालीन छाया पसरल्या.
अजून मी दिवा देखील लावला नव्हता....! आळसावलेल्या
हातानं केस बांधित होते.
तो राजकुमार - तरूण प्रवासी - आपला रथ वायुवेगानं
दौडवत आला. मावळत्या सूर्याच्या साक्षीनं त्याचा रथ
माझ्या घरासमोर थांबला.
घोड्यांच्या तोंडातून फेस गळत होता.
धुळीनं माखलेल्या पोशाखानंच त्यानं रथातून उडी मारली -
माझ्या दाराशी येऊन थकल्या थकल्या आवाजात म्हणाला

- "कुठं आहे ती ?"

"...ही मी तुझीच वाट पहात आहे...."
पण तीच अवखळ लज्जा माझं तोंड पुन्हा बंद करून
गेली !

शिशिराची रात्र आहे !
उशाशी दिवा मंदपणं जळतोय्.
पश्चिमेचा गार वारा अंगाला झोंबतोय्
आणि दिवसभर बडबड करणारा माझा मिठ्ठू शांत
झोपलाय्.
मी खिडकीशी उभी राहून विराण रस्त्याकडं पहात
बसलेय् !
आणि ह्या अंधारलेल्या रात्री माझ्या हृदयांतून पडसाद
येताहेत -
"ती मीच आहे ! मुशाफिरा ती मीच आहे !...
...निराश होऊ नकोस... ती मीच आहे..."
●



: ९ :

माझ्या प्रियतमाच्या मीलनासाठी मी एकाकी निघते
तेव्हा...
पक्षांची कुजबुज थांबली असते...
वारा स्थिरावला असतो
आणि दुतर्फा उभी असलेली घरकुलं झोपेच्या कुशीत
शांतपणं पहुडली असतात.
फक्त माझ्या नुपुरांचा आवाज होत असतो
पावलागणिक वाढत जातो -
मला लाजवतो.
त्यांना स्तब्ध कसं करावं हेच मला कळत नाही.

त्याच्या पावलांच्या आवाजाचा कानोसा घेत मी सज्जात
उभी असते -
तेव्हा -
झाडांची पालवी शांत असते -
समोरच्या तळ्यातलं पाणी अविचल असतं -
...स्थिरावलेल्या ज्योतीसारखं !
माझ्या हृदयाची धडधड मात्र चालू असते
- तिला स्तब्ध कसं करावं हेच मला समजत नाही !

आणि तो माझ्याशेजारी येऊन बसतो
तेव्हा -
माझं सारं शरीर वेलीवत् थरथरत असतं
पापण्या तृप्तीनं जडावतात !
रात्र अंधारते आणि वाऱ्याच्या झुळकीनं समोरच्या समईची
फडफडणारी ज्योत शांत होते !
आकाशात मेघ देखील चांदण्यावरून चादर ओढून घेतात !
माझ्या वक्षावरला मणी तेवढा चमकतो
त्यात त्याचा चेहरा उजळून निघतो !
त्याला कसं लपवावं हेच मला कळत नाही !
●



## : १० :

मुली,
तुझं काम राहू दे !
ते बघ !
कोण आलं आहे बघ !
कडीचा आवाज ऐकू आला तुला ?
- पण दार उघडतांना सांभाळून जा !
तुझ्या नुपुरांचा आवाज होऊ देऊ नकोस !
तुझ्या पावलात लगबग दिसता कामा नये !
तुझं काम राहू दे ! सायंकाली होत आला आहे.
आणि तो आला आहे !

छे, छे !
अग हा घोंघावणारा आवाज वाऱ्याचा नाही !
घाबरू नकोस !
शरदातलं पूर्णबिंब आहे ते !
अंगणातल्या सावल्या त्यामुळं पांढुरक्या झाल्या आहेत !
वर आकाश प्रसन्न, शांत आहे !
डोक्यावरून पदर नीट ओढून घे !
वाटलं तर चेहरा देखील झाकून घे !
भीती वाटत असली तर हा दिवसा घेऊन जा !
छे, छे ! हा आवाज वाऱ्याचा नाही !
तोच आला आहे
दरवाजा हळूच ढकलतो आहे !

तुला लाजच वाटत असली तर त्याच्याशी बोलू नकोस !
त्याला भेटताना,

वाटलं तर,
दाराच्या आडोशाला उभी रहा !...
त्यानं प्रश्न विचारला तर...
तर आपल्या पापण्या फक्त खाली ओढून घे !
तुझ्या पायाची बोटं तू नजरेनं मोजताच
त्याला त्याच्या प्रश्नांची उत्तरं सापडतील !
आणि थरथरणाऱ्या दिव्यांच्या प्रकाशात त्याला आत
घेताना तुझ्या बांगड्यांना शांत राहण्याची ताकीद दे !
तुला लाजच वाटत असेल तर त्याच्याशी बोलू नकोस !

मुली, तुझं काम अजून संपलं नाही ?
अग, तो आला आहे !
अजून तू समई लावली नाहीस ?
- संध्याकाळची पूजाअर्चा अजून केली नाहीस ?
अजून वेणी घातली नाहीस ! कुंकू देखील लावलं
नाहीस ?
अग, तो आला आहे !
त्याचा आवाज तुला ऐकू आला नाही ?
तो आलाय् बघ !
तुझं काम तसंच राहू दे !
●



## : ११ :

तू तशीच ये !
आरशाजवळ उगाच रेंगाळू नकोस !
तुझा केशसंभार मोकळा असला,
भांग पाडला नसला,
काचोळी मोकळी असली
म्हणून काय झालं ?
तू तशीच ये !
आरशाजवळ रेंगाळू नकोस !

अधीर पावलांनी उद्यान तुडवत ये !
त्या गवतावरल्या दवबिंदूंनी
तुझ्या पायांची मेंदी पुसल्या गेली.
तुझ्या नुपुरांचा झंकार झाला.
गळ्यातल्या मौक्तिकमालेतले मणी ओघळले
म्हणून काय झालं ?
तशीच अधीर पावलांनी उद्यान तुडवत ये !

ते बघ ! आकाश ढगाळलं आहे !
ती बघ बगळ्यांची माळ पैलतिरावरून निघाली आहे !
वावटळीनं त्यांच्याभोवती फेर धरला आहे !
आणि ह्या सर्वांना पाहून गुरं आतुरल्या पावलांनी घराकडं
निघाली आहेत.
बघितलंस ! आकाश ढगाळलं आहे.

कशाला लावतेस तो दिवा.
सारखा वाऱ्यानं फडफडतोय् नि शांत होतोय्.

आणि तूं काजळ घातलंस की नाही हे कुणाला कळणार आहे ?
कारण तुझे नेत्र श्रावणमेघांपेक्षाही काळे आहेत !
विनाकारण तो दीप प्रज्वलित करते आहेस !
- तो लगेच शांत होतोय् !
तू तशीच ये. आरशाजवळ रेंगाळू नकोस !

हार गुंफायचा आहे ?
- राहू दे.
कटीची मेखला सावरायची आहे ?
- राहू दे !
आकाश ढगाळलं आहे...
...उशीर झाला आहे !
तू तशीच ये.
विनाकारण आरशाजवळ रेंगाळू नकोस !...
विनाकारण...!
●



## : १२ :

तू जर आपला घट शिगोशिग भरायच्या घाईत असशील
- तर मग माझ्या तळ्यावर ये !
माझ्या तळ्यातल्या लाटा तुझ्या पावलांना घट्ट मिठी मारतील -
आणि आपलं रहस्य बुडबुडतील !

लांबवर निळ्या वृक्षराजीवर काळेशार मेघ वाकले आहेत ! धनुष्याकृती भुवयांवर वाकलेल्या तुझ्या केशसंभारासारखे !
तुझ्या पावलांचा ताल माझ्या ओळखीचा आहे !
त्यावरच तर माझं हृदय स्पंदन करत असतं !
तुला घट शिगोशिग भरायला असेल
तर माझ्या तळ्यावर ये !

- आणि तुला घट पाण्यावर तरंगत तरंगत ठेऊन रेंगाळायचं असेल -
तर माझ्या तळ्यावर ये !
सर्वदूर हिरवं हिरवं गवत पसरलंय् !
आणि बाजूची झाडी रानफुलांनी बहरली आहे !
किलबिल करणारे पक्षी इतस्ततः स्वैरपणानं भटकताहेत :
तुझे विचार देखील इथं स्वैरमैर भटकतील.
भान विसरून तुझी निळी निळी ओढणी तुझ्या पायाशी पडून राहील
तुला रेंगाळायचंच असेल -
तर माझ्या तळ्यावर ये !

तुला सूर मारायची इच्छा असेल -
तर माझ्या तळयावर ये !
तुझी निळी वस्त्रं काठावरच राहू देत !
माझ्या तळयातलं पाणी आपल्या निळाईनं तुला झाकून
टाकील !
त्यातल्या जललहरी आपल्या टाचा उंचावून उंचावून तुझ्या
कानाशी कुजबुजतील !
तुझ्या मानेला गुदगुल्या करतील.... तिचं चुंबन
घेतील !
तुला सूर मारायची इच्छा असेल तर माझ्या तळयावर
ये !

आणि वेडाच्या झटक्यात, दारूण निराशेत
जलसमाधी घ्यावीशी वाटली तर -
- तर माझ्या तळयावर ये !
ते शांत आहे, अथांग आहे !
गाढ झोपेइतकं निश्चल आहे !
त्यात दिवस रात्र एकच आहेत !
संगीत देखील शांतीत लीन झालं आहे !
तुला मृत्यूलाच कवटाळायचं असेल
- तर माझ्या तळयावर ये !
●



## : १३ :

छेः !
मी काहीच मागितलं नाही !
ह्या कुंपणाजवळ, झाडाच्या आडोशाला उभा होतो !

पहाटेचे नेत्र अजूनही पेंगुळले होते !
आणि आसमंत दवानं न्हाऊन निघाला होता !
मातीचा सुगंध चहूकडं पसरला होता !
त्या पिंपळाच्या झाडाखाली आपल्या सायीसारख्या मऊ
हातांनी तू गाईची धार काढत होतीस !
आणि मी निश्चल उभा होतो !

छे, छे !
मी काही सुद्धा गुणगुणलो नाही !
समोरच्या झाडीत चंडोल गात होता !
त्यापुढच्या रस्त्यावर आंब्याचा मोहोर पसरला होता !
त्याच्या गंधानं मधमाशा धावून आल्या !
एका पाठोपाठ एक !
त्यांची गुणगुण सुरू झाली.
तळयाजवळ शंकराचं मंदिर होतं.
त्याचा दरवाजा उघडला,
आणि गाभाऱ्यातून पुजाऱ्याचे मंत्र ऐकू येऊ लागले !
आपल्या गुडघ्यात धरलेल्या चरवीत तू गाईची धार
काढत होतीस !
- आणि रिकामं भांडं हातात धरून मी उभा होतो !
मी पावलं वाजवली नाहीत !

तुझ्याजवळ आलो नाही !
मंदिरातल्या घंटानादानं आकाश जागं झालं !
बाहेर पडलेल्या गुरांच्या खुरांनी
जमिनीवरची धूळ वर उडाली !
कमरेवर शिगोशिग भरलेले घट येऊन बायका नदीवरून
परत येत होत्या.
त्यातल्या पाण्याचा 'चुबुक' 'चुबुक' आवाज होत होता !
त्यातच धार काढतांना होणारी तुझ्या बांगड्यांची
किणकिण विलीन झाली !
चरवीच्या तोंडाशी फेस आला !
पहाट उमलली !
त्याचा हा सगळा आवाज होता !
मी माझी पावलं मुळीच वाजवली नाहीत !
●



## : १४ :

मी रस्त्यानं एकटाच चाललो होतो ! -
निर्हेतुकपणानं ! मध्यान्ह टळली होती.
पानांची सळसळ थोडावेळ शांत होती !
वृक्षाच्या पसरलेल्या छायांनी आता आपल्या शरीराचं
मुटकुळं करून धावत्या प्रकाशाला जणू धरून ठेवलं
होतं !
गाऊन गाऊन कोकीळ थकला होता !
आणि मी रस्त्यानं टंगळमंगळ करत उगाचच चाललो
होतो !
- कां कुणास ठाऊक ?

त्या नदीकिनारी असलेल्या झोपडीवर वटवृक्षानं छाया
धरली होती !
कुणीतरी आत आपल्या कामात व्यग्र होतं.
तिच्या बांगड्यांचा होणारा किणकिणाट सुखावणारा होता !
त्या झोपडीच्या दाराशी मी जाऊन उभा राहिलो !
उगीचच !
कां ? कुणास ठाऊक !

माझी पाऊलवाट पुढं निघून गेली.
शेतातून नागमोडी वळणांनी गेली !
आंब्याच्या गर्द छायेतून गेली !
गावाच्या मंदिराला वळसा घालून नदीच्या घाटावर
पायऱ्यांशी विसावली !

पण मी मात्र त्या झोपडीच्या दाराशीच थबकलो !
उगीचच ! कां कुणास ठाऊक !
- पुष्कळ वर्ष झाली त्याला !
आंब्याच्या वृक्षाला मोहोर आला होता !
ग्रीष्मातलं ऊन ऊन वारं वाहू लागलं होतं !
त्या नदीवर तरंगणारी घागर हेलकावत होती आणि
मिष्किल लाटा उगीचच आपल्या टाचा उंचावून उंचावून
त्यात वाकून बघत होत्या !
- त्या घागरीला गरागरा फिरवत होत्या !
त्या ग्रीष्माला तो दिवस मला एकदम आठवला !
कां कुणास ठाऊक !

आता अंधारून आलं आहे !
गुरांची पावलं घराकडं वळली आहेत !
त्यांच्या गळयातला घंटानाद मला भानावर आणतोय् !
सगळ्या खेड्यावर सायंकालीन धूसर छाया पसरली
आहे !
पलीकडल्या तीरावरली मंडळी घरी परतण्यासाठी
नावाड्याला साद घालताहेत !
आणि मी माझी पावलं वळवली !
कां, कुणास ठाऊक !
●



## : १५ :

स्वतःच्या सुवासानं धुंद झालेल्या कस्तुरीमृगाप्रमाणं मी
धुंदपणानं धावतो आहे !
शरदाची रात्र असते. शांत वारं वहात असतं ! आणि ह्या
ग्लानीत मी वाट चुकतो. इतस्ततः भटकतो !
मला जे कधीच मिळणार नसतं ते शोधतो !
जे सापडतं त्याचं मला कधीच आकर्षण नसतं.
माझी इच्छाशक्ती अभंग आहे !
त्याची प्रतिमा हृदयातून बाहेर पडते !...
माझ्यासमोर जणू नृत्य करते !
त्या सुखस्वप्नांनी मी भांबावतो.
त्या हलत्या प्रतिमेला मी घट्ट धरायचा प्रयत्न करतो !
पण छे....
मला ती भुलवून, फसवून दूर दूर पळते !
आणि असा मी माझा मार्ग मुकतो !
जे कधीच मिळणार नसतं त्याचा मी शोध घेतो आहे !
आणि जे मिळतं त्याचं मला कधीच आकर्षण नसतं !

कस्तुरीमृगाप्रमाणं बेहोषपणानं धावतोय् मी !
●

## : १६ :

बोटं बोटात गुंफतात; नजरं नजरेला कुरवाळते ! आपल्या
हृदयाच्या तारा अशा सुरात लागतात !
वैशाखाची शर्वरी ! हवेत मोगऱ्याचा सुवास सुखवीत
असतो ! माझा पावा माझ्या पायाशी पडला असतो -
निष्कासित फुलांप्रमाणं ! तुझा फुलांचा हार अर्धवट
गुंफला असतो - तो तसाच राहतो !
खरंच, तुझं माझं प्रेम आपल्या गीताइतकं सरळ आणि
साधं !
तुझ्या साडीची रेशमी किनार माझ्या डोळ्यांवर धुंदी
चढविते !
माझ्या गळ्यात घातलेला - अर्धवटच गुंफलेला हार
माझ्या हृदयाला गुदगुल्या करतो !
- एखाद्या स्तुतीसारखा !
देवाण घेवाण करायचा हा खेळ ! घोळून घोळून
सांगायचा... पुन्हा पुन्हा ऐकायचा हा खेळ !
- प्रीतीचा !
थोडसं हास्य... थोडंसं लास्य !
आणि काही गोड गुदगुल्या... कोपरखळ्या !
तुझं माझं प्रेम एखाद्या गीतासारखं सरळ अन् साधं !



भविष्याचं आश्चर्य नाही ! अशक्याची ओढ नाही !
सौख्याला छाया नाही ! गूढत्वाची माया नाही !
तुझं माझं प्रेम... एखाद्या गीतासारखं साधं !
शब्दांच्या वलयातून बाहेर पडून शांतीत शिरत नाही
आपण ! अशक्य गोष्टींची हाव धरून दुःखात विरत नाही
आपण !
आपण काय दिलं... काय मिळवलं यातच खूष !
आनंद पूर्णपणानं पिळवटून त्यातून सौख्याची मदिरा
चाखली नाही आपण ! - त्या आनंदातही थोडं सौख्य
शिल्लक ठेवलं. त्याच्यासाठी ! त्याला दुःखात ठेवलं नाही
आपण !
तुझं माझं प्रेम - गीतासारखं साधं गीतासारखं सरळ !

●

## : १७ :

समोर त्यांच्या आमराईत कोकीळ आनंदानं गात असतो !
आणि त्याची संवेदना मात्र माझ्या हृदयात उमटते ! आम्ही
दोघंहि एकाच गावचे ! शेजारी शेजारी !
ती अन् मी ! त्याचाही आनंद आगळाच !
तिची पाळीव जनावरं आमच्या कुंपणात हुंदडतात ! मी पण
त्यांचा लोभ करतो !
आमच्या गावाचं नाव आहे खंजना !
शेजारून नदी वाहते, तिचं नाव आहे अंजना.
माझं नाव तुम्हाला माहीतच आहे आणि ती आहे रंजना !
आमच्यामध्ये फक्त एक शेत आहे.
आमच्या अंगणात मधमाशींचं मोहोळ आहे.
त्या मधमाशा मात्र मध गोळा करतात तिच्या फुलांतून
तिच्या बगीच्यातील फुलं फुलतात.
त्यांचा सुवास दरवळतो आमच्या घरात !
त्यांच्या घराला वळसा घालून जाणारी गल्ली -
वसंतात आंब्याच्या मोहोरानं दरवळते - आमच्या झाडाच्या !
त्यांच्या घरावर चमकणारा तारा माझ्याकडे डोळे
मिचकावून बघतो !
तिच्या अंगणात पडणारा पाऊस आपला मृद्‌गंध आमच्या
घरात पसरवतो !
आमच्या गावाचं नाव आहे 'खंजना' !
शेजारून नदी वाहते, तिचं नाव आहे 'अंजना'.
माझं नाव तुम्हाला माहीतच आहे आणि ती आहे
'रंजना' !

●



## : १८ :

त्या दोघी बहिणी घागरी घेऊन नदीवर पाणी आणायला
जातात, तेव्हा ह्या ठिकाणी आल्या की थबकतात -
- क्षणभरच, आणि किंचित् हसतात !
ह्या झाडाआड लपून कुणीतरी त्यांना न्याहाळत असतं !
त्याची त्यांना कल्पना असावी !
आणि त्या एकमेकींच्या कानात काहीतरी कुजबुजतात !
क्षणभरच !
त्या झाडाआड लपून बसलेल्याचं गुपित कदाचित् त्यांना
माहीत असावं !
आणि परत येतांना ह्या जागेवर आल्याबरोबर त्यांच्या
घागरी त्या हिंदकळवतात ! मिष्किलपणानं गुदगुल्या
करत पाणी त्या घागरीतून सांडतं !
त्या झाडाआड लपलेल्याच्या हृदयातील खळबळ
कदाचित् त्यांना जाणवली असेल !
त्या दोघी त्या ठिकाणी आल्या की एकमेकींकडे बघतात
आणि गालातल्या गालात हसतात !
त्यांच्या अधीर पावलांवर बांधलेली पैजणं खळखळून
खिदळतात !
आणि त्यामुळं त्या झाडाआड लपलेलं मन गोंधळतं...
घुटमळतं...
ह्याच ठिकाणी -
त्या दोघी पाणी आणायला नदीवर जातात तेव्हा !

●

## : १९ :

पाण्यानं शिगोशीग भरलेला घट कमरेवर ठेऊन नदीच्या किनाऱ्यानं तू जात होतीस... डोक्यावर पदर घेऊन. क्षणभर थांबून वळून माझ्याकडं बघितलंस ! त्या फडफडत्या पडराआडून... आपल्या मिष्किल नेत्रांनी, कां ?

त्या काळाशार नेत्रांनी तुझं बघणं !

अल्लड वाऱ्यानं नदीच्या ह्या तीरावरून त्या तीरावर जातांना सहजपणानं पाण्याच्या लाटांना गुदगुल्या करीत निघून जावं आणि पैलतीरावरल्या झाडीनं लपून त्यांचं खिदळणं बघावं -

- तसं वाटलं तुझं बघणं मला !

एखाद्या अंधाऱ्या खोलीत विचारमग्न असतांना एखाद्या पक्षानं आपले पंख पालवीत खोलीतून निघून जावं आणि भानावर आणावं -

तसं वाटलं मला तुझं ते बघणं !

गिरीशिखरावर चमकणाऱ्या तारकेप्रमाणं तू आहेस !

आणि मी - साधा वाटसरू ! तुझ्या मानानं खूप खाली ! क्षुल्लक !

पण तू क्षणभर का होइना पण का थांबलीस ! हिंदकळून माझी थट्टा करणारा घट आपल्या कमरेवर ठेवून फडफडणाऱ्या पदराआडून आपली वेधक नजर माझ्यावर कां स्थिरावलीस ? कां मला घायाळ केलंस ?

●



## : २० :

तो रोज येतो - आणि निघून जातो !
जा, त्याला माझ्या वेणीतलं हे फूल नेऊन दे !
आणि त्यानं विचारलंच तर माझं नाव सांगू नकोस !
- माझी शपथ आहे - सांगू नकोस
कारण तो फक्त येतो - आणि निघून जातो !
त्या झाडाखाली तो रोज येतो आणि बसतो !
जा, तिथं ही फुलांची शेज पसर !
खिन्न नेत्रांनी तो रोज तिथं बसतो !
मला देखील खिन्न करतो !
त्याच्या मनांत काय आहे ते बोलत कां बरं नाही ?
तो फक्त येतो - आणि जातो !
रोज !

●

## : २१ :

तो माझ्याच दाराशी कां बरं आला ?
मनसोक्त भटकणारा मुशाफिर -
एका पहाटे पहाटे माझ्याच दाराशी कां बरं आला ?
घरातील कामं करताना, येता जाता तो माझ्या दृष्टीस
पडतो :
मी त्याच्याशी बोलू का ? - कि नकोच ?
...खरंच मला काहीच कळत नाही !
पण त्यानं माझंच घर कां बरं शोधलं ?
आषाढात वादळ वारा मेघांशी झगडतो ! हेमंतातील रात्री
शांत असतात, आणि ग्रीष्मात अनोळखी आर्ततेची ओढ
असते !
प्रत्येकवेळी आपल्या गीतात तो वेगवेगळे राग गुंफतो,
प्रत्येकवेळी मी माझ्या कामात गर्क असते आणि तो
माझ्या नजरेस पडतो !
त्यानं माझंच घर कां बरं शोधलं ?
त्या अनिर्बंध भटकणाऱ्या मुशाफिरानं !
●



## : २२ :

माझ्या जवळून झर्‌कन निघून जाताना तिच्या पदराचं टोक
मला चुंबून गेलं !
कुठल्यातरी अनामिक हृदयाचं वासंतिक कूजन वाटलं
मला ते !
गळून पडलेली फुलाची पाकळी वाऱ्यानं क्षणार्धात वाहून
न्यावी तशी ती संवेदना होती !
तो तिच्या शरीराच्या हुंकार वाटला मला. तिच्या हृदयाचं
गोड गुंजन वाटलं !
●

## : २३ :

नदीच्या पात्रात पाय सोडून आपली घागर तरंगत, तरंगत
ठेऊन आपल्या बांगड्यांशीच कां बरं खेळते आहेस ? -
"उगीचच" ?
आपली घागर भर ना, तुझी घरी जायची वेळ झाली
नाही ?
आपल्या हातांनी पाणी कां बरं उडवते आहेस ?
पलिकडल्या पायवाटेकडे मधूनच का बरं बघते आहेस ?
आणि आपल्याशीच कां बरं हसते आहेस ?
"उगीचच" ?
आपली घागर भर ना ! तुझी घरी जायची वेळ झाली
नाही ?
पहाट भर्रकन् उडून जातेय्. नदीचं पाणी संथ वाहतय् !
त्या लाटा बघ एकमेकींच्या गळयात गळा घालताहेत !
एकमेकींशी कुजबुजत आहेत !
तुझ्या "उगीचच"ची थट्टा करताहेत !
इतस्ततः भटकणारे ढग देखील पलीकडल्या क्षितिजापाशी
एकत्र झाले आहेत ! ते घुटमळताहेत. तुझ्याकडे
मिष्किलपणानं बघताहेत - तुझ्या "उगीचच"ची त्यांना
देखील गंमत वाटते आहे !
आपली घागर भर ना ! तुझी घरी जायची वेळ झाली
नाही का ?

●



## : २४ :

मित्रा, तुझं रहस्य फक्त तुझ्याजवळच कां ठेवतोस ?
मला सांग ना ! फक्त मलाच ! अगदी हळू सांग !
ती बघ, तुझ्या चेहऱ्यावर हास्याची लकेर उमटली !
अगदी गुपितपणानं मला सांग !
- फक्त माझ्या हृदयालाच कळेल असं !
माझ्या कानांना देखील ऐकू येणार नाही असं !
रात्र काजळली आहे !
घरकुल शांत झालंय् !
पक्षांची किलबिल देखील शांत झालीय् !
सांग ना मला !
थरथरत्या अश्रूतून सांग !
गोड हळुवार लास्यातून सांग !
किंवा संकोचलेल्या शल्यातून सांग !
तुझ्या हृदयाचं गुपित....
फक्त मलाच !

●

## : २५ :

"मित्रा, तुझ्या डोळ्यात हे खुळेपण कसलं आहे ?"

"कुणास ठाऊक ! कुठल्या मोहाच्या रसपानानं हे
खुळेपण आलं आहे मला तरी कुठं ठाऊक आहे ?"
"....छे, छे ! तू माझ्यापासून लपवतो आहेस !"
-- "खरंच मला माहीत नाही
– आणि नेत्रांचे तरी अनंत प्रकार नाहीत का ?
काहींच्या डोळ्यात विद्वत्तेचं तेज असतं तर काही निर्बुद्ध
वाटतात - काही निरीक्षक असतात तर काही बेफिकीर !
काहींची लोचनं सारखी हसत असतात तर काहींची
नेहमीच पाणावलेली ! – आणि तशीच माझी खुळेपणानं
नाचताहेत !"

"पण तू असा निश्चल आणि एकाकी ह्या झाडाखाली कां
उभा आहेस ?"

"माझे पाय आता थकले आहेत ! ह्या हृदयाचं ओझं आता
त्यांना सहन होत नाही ! म्हणून ह्या वृक्षाच्या छायेत मी
विसावलो आहे !"

"छे, छे ! तू नक्कीच मला खोटं सांगतो आहेस !"

"–खरंच... नाहीतरी काहीजण आपल्या ध्येय मार्गावर
अविरत चालत असतात तर काही घुटमळतात !
काही अनिर्बंध हुंदडतात तर काही घोटाळतात -
तसाच मी माझ्या हृदयाला सावरत
इथं ह्या छायेत उभा आहे...!"
●



## : २६ :

"स्वखुषीनं दिल्या जाणाऱ्या देणग्याच फक्त मी
स्वीकारतो ! त्या व्यतिरिक्त मी काहीच मागत नाही !"
"तर तर ! मी तुला चांगलीच ओळखते ! शालीनतेच्या
बुरख्याआडून तू सर्वस्वच मागतोयस् !"
"एखादी फुलाची पाकळी जरी तू दिलीस तरी मी ती
आनंदाने हृदयाशी धरीन !"
"– पण त्यात नुसते काटेच असतील तर - ?"
"– ते सुद्धा सहन करीन !"
"तर तर, मी तुला चांगलीच ओळखते !
योगेश्वरा ! शालीनतेच्या बुरख्याआडून तू सर्वस्वच मागत
असतोस !"
"आपल्या स्निग्ध लोचनांनी तू माझा चेहरा एकदा जरी
कुरवाळला तरी मला मरणातीत आनंद होईल !"
"आणि माझी नजर क्रूर, फक्त विद्ध करणारीच असेल
तर ?"
"त्यानं मी माझं हृदय पिंजून काढीन !"
"तर तर योगीराजा मी तुला चांगली ओळखते !
शालीनतेच्या बुरख्याआडून तू सर्वस्वच मागत
असतोस !"
●

## : २७ :

"आपल्या प्रेमावर विश्वास ठेव ! मग त्यानं दुःख दिलं म्हणून काय झालं ? हृदयाची दालनं अशी बंद करू नकोस."

"छे, छे ! हे सारं अनाकलनीय आहे ! तुझे शब्द गूढ आहेत !"

"हृदयाला आसवांनी भिजवावं, संगीतानं सजवावं आणि ते देऊन टाकावं ! - त्यासाठीच ते आहे !"

"– छे, छे ! मित्रा तुझे शब्द गूढ आहेत. अनाकलनीय आहेत !"

"आनंद हा दवबिंदुप्रमाणं आहे ! स्मिताच्या लकेरीत अंतर्धान पावतो ! पण दुःख कणखर आहे, ताठर आहे ! तुझ्या नयनांत ही दुःखानं अलंकारलेली प्रीती मला दिसू दे !

"छे, छे ! मित्रा, तुझं बोलणं गूढ आहे ! अनाकलनीय आहे !"

"सूर्याच्या दर्शनानं कमलिनी उमलते ! आपले सर्वस्व त्याला अर्पण करून लीन होते. नष्ट होते. पण हेमंताच्या काळोखात ती कळीच्या रूपानं कधीच राहणार नाही !"

"छे, छे ! मित्रा तुझे शब्द फार गूढ आहेत ! तुझं बोलणं अनाकलनीय आहे ! मला कधीच समजणार नाही ते !"

●



## : २८ :

प्रश्नानं भंडावून सोडणारे तुझे नेत्र आज दुःखानं भिजलेले आहेत ! सागराचा तळ शोधणाऱ्या चंद्रकिरणांप्रमाणे ते माझ्या हृद्याचा ठाव घेऊ पहात आहेत !

माझं आयुष्य मी तुझ्यापुढं उलगडून ठेवलं आहे ! पूर्णपणे ! आणि म्हणूनच कदाचित् तू मला ओळखलं नाहीस !

तो एखादा हिरा असता तर त्याच्या शेकडो हिरकणी पाडून त्याची माळ मी तुझ्या गळयात घातली असती ! ते एखादं नाजूक, वेधक, मधुर पुष्प असतं तर माझ्या हातानं मुळापासून खुडून तुझ्या केसांवर माळलं असतं !

पण प्रिये, ते माझं हृदय आहे ! अथांग अमर्याद ! ह्या साम्राज्याच्या सीमा तुला ठाऊक नाहीत आणि तरीही तू त्याची सम्राज्ञी आहेस !

तो एखादा आनंदाचा क्षण असता तर माझ्या स्मितात बहरला असता ! सहजपणानं -

आणि तुला तो निःसंकोचपणानं एका क्षणात वाचता आला असता !

आणि दुःख असतं तर स्नेहार्द्र लोचनात आपल्या हृदयाचं गूढ गुपित, अश्रुपूर्ण दृष्टीक्षेपात एक अक्षर न बोलता जाणवलं असतं !

पण प्रिये ही प्रीती आहे ! त्याची सुखं आणि दुःखं अमर्याद आहेत ! त्याची संपत्ती अपार आहे ! तुझ्या जीविताइतकं ते जवळ आहे ! - पण तुला ते कधीच पूर्णपणे समजणार नाही ! कधीच नाही !

●

: २९ :

माझ्याशी बोल ना ! तुझ्या गीतांचा अर्थ मला सांग ना !
रात्र काजळली आहे ! चांदण्यासुद्धा ढगाआड लपल्या
आहेत ! जवळच्या पानांची सळसळ सोडली तर सारं
निःशब्द आहे !
माझा केशसंभार मी मोकळा सोडीन ! माझी निळी
ओढणी रात्रीसारखी मला वेढून घेईल ! माझ्या हृदयाशी
तुझं मस्तक धरून त्या सुमधुर एकांती माझं गुपित तुझ्या
हृदयाला ऐकवीन ! त्या आनंदानं माझ्या पापण्या
जडावतील. डोळे मिटून मी शांतपणानं बसेन ! तुझ्याकडं
बघणार सुद्धा नाही !
आणि तुझं बोलणं संपलं की त्या नीरव शांत रात्री
मुकाटपणानं बसून राहू ! आपल्या प्रेमाचं गुपित फक्त
आपले अश्रू एकमेकांच्या कानात, कुजबुजतील !
त्या शांत एकांती !
आणि रात्र कोमेजेल - पहाट उगवेल !
एकमेकांच्या नेत्रात शेवटचं बघून आपापल्या भिन्न मार्गांनी
निरोप न घेता निघून जाऊ !
माझ्याशी बोल ना ! प्रिया, आताच गायलेल्या गीताचा
अर्थ मला सांग ना !

●

: 30 :

माझ्या स्वप्नांच्या निळाईत विहरणारी तू सायंकालीन
मेघा आहेस !
प्रेमाच्या सदिच्छेने मी तुला मनाप्रमाणं सालंकारतो !
तू माझी आहेस ! - केवळ माझ्या स्वप्नांत विहरणारी
आहेस. माझ्या हृदयातील धगधगत्या आकांक्षेने तुझी
पावलं गुलाबी रंगविली आहेत !
- कारण तू माझ्या सायंकालीन संगीताची प्रेरणा आहेस !
तुझ्या ओठातील ही कडवट माधुरी माझ्या दुःखातून
पिळवटलेल्या मदिरेची आहे !
तू माझी आहेस, फक्त माझी - माझ्या एकलकोंड्या
स्वप्नाची राणी !
माझ्या हृदयवेगाच्या सावलीचं काजळ तुझ्या नेत्रात
पसरलं आहे ! माझ्या दृष्टीची शिकार आहेस तू !
मी तुला पकडलंय् ! माझ्या संगीताच्या मोहमयी जाळ्यात
घट्ट बांधून ठेवलंय् !
तू माझी आहेस ! फक्त माझी - माझ्या अमर स्वप्नांची
महाराणी !!

●

## : ३१ :

प्रिये तुझे नेत्र - !
...पक्षांच्या चंचलपणानं आपलं घरटं तिथं बांधलं आहे !
...पहाटेचा तो पाळणा आहे !
...खुणावणाऱ्या रात्रीची ती राजधानी आहे ! त्यांच्या
अथांग खोलीत माझी गीतं बुडून नाहीशी होतात !
...त्या विशालतेत मला एकदाच डोकावू दे ! त्यांच्या
अभ्रखंडांवर तरंगू दे !
त्यांच्या निळाईत पंख पालवून विहरू दे !
●



## : ३२ :

हे सगळं खरं आहे ? प्रिये, हे सारं सत्य आहे ?
माझ्या नेत्रकटाक्षात सौदामिनी साकारताच तुझ्या हृदयाची
धडधड गरजणाऱ्या वादळाच्या रूपानं
मला साद घालते – ?
माझे हे ओठ प्रीतीच्या उमलत्या कलिकेप्रमाणे मधुर
आहेत, हे खरं आहे ?
सरत्या वसंताच्या आठवणी माझ्या बाहूत सामावल्या
आहेत. माझ्या पावलाच्या स्पर्शानं वसुंधरेची वीणा
आनंदानं झंकारते ?
माझ्या दर्शनानं रजनीच्या नेत्रात दवबिंदूंचे आनंदाश्रू
अवतरतात ?
आणि पहाट मला आपल्या सान्निध्यात आनंदात
कुरवाळते ! — प्रकाशाच्या सहस्त्र भुजांनी !
हे सगळं खरं आहे ?
माझी थट्टा करू नकोस. खरं सांग.
हे सगळं सत्य आहे ?
तू अनंत काळापासून वाटचाल करीत होतीस ?
मला शोधण्यासाठी ? हे सगळं खरं आहे ?
— आणि सरतेशेवटी मी भेटताच अनंतकाळापासून शोध
घेत असलेली तुझी इच्छाशक्ती माझ्या सुमधुर वचनांनी,
ह्या नेत्रांनी, माझ्या ओठांनी आणि भिरभिरत्या केसांनी
शांत झाली. समाधान पावली ! हे सारं खरं आहे ?
अनंताचं गूढ ह्या चिंचोळ्या ललाटावर लिहिलं आहे
हे सुद्धा खरं आहे ?
प्रिये खरंच सांग - माझी थट्टा करू नकोस
– हे सारं सत्य आहे ?
●

## : ३३ :

मी तुझ्यावर मनापासून प्रेम करतो.
त्या प्रेमाला, प्रिये, क्षमा कर !
वाट चुकलेल्या पाखराप्रमाणं मी कोंडीत सापडलो आहे !
आणि हृदय हेलावल्यामुळं त्यावरचं वस्त्र गळून पडलं
आहे – विवस्त्र झालं आहे ! प्रिये, आपल्या दयेनं त्याला
झाकून घे ! आणि त्याला क्षमा कर !

माझ्यावर जर तू प्रेम करू शकत नसशील तर प्रिये, त्या
माझ्या दुःखाला क्षमा कर !
अशी डोळे विस्फारून, इतक्या लांबून माझ्याकडं बघू
नकोस !
मी माघारी जाईन. मुकाटपणानं अंधारात बसून राहीन !
लाजेनं काळवंडलेला माझा चेहरा माझ्या दोन्ही हातांनी
झाकून घेईन !
माझ्यावरील स्थिरावलेली दृष्टी वळव आणि माझ्या
आक्रोशाला क्षमा कर !

आणि माझ्यावर तू देखील प्रेम करत कसशील तर, प्रिये,
ह्या माझ्या दुथडी भरून वाहणाऱ्या आनंदाला क्षमा कर !
त्या आनंदाच्या प्रवाहात वाहून जाऊन वाताहात होणाऱ्या
हृदयाकडं पाहून अशी हसू नकोस !
ह्या माझ्या प्रीतीच्या सिंहासनावर विराजमान होऊन
प्रेमानं मी तुझ्यावर सत्ता गाजवू लागतो.
परमेश्वराप्रमाणं तुला वर देऊ लागतो ! – ह्या माझ्या
दुराभिमानाला थोडं सहन कर – ! आणि त्या माझ्या
आनंदाला क्षमा कर !

●



## : ३४ :

प्रिये, माझा निरोप घेतल्याशिवाय तू जाऊ नकोस !
सारी रात्र मी जागून काढली. आणि आता माझे नेत्र
झोपेने पेंगुळले आहेत !
मला झोप लागताच तू निघून जाशील अशी भीती वाटते
आहे.
मला भेटल्याशिवाय तू जाऊ नकोस !
मी मधेच दचकतो, माझे हात पसरतो - तुझा स्पर्श
होताच - सुखावतो - हे स्वप्न तर नाही ना ?
माझ्या हृदयबंधनात मला तुझी पावलं आवळता येतील ?
माझ्या हृदयाशी धरता येतील ?
- खरंच प्रिये
मला विचारल्याशिवाय तू जाऊ नकोस !

●

## : ३५ :

तुझी सहजासहजी ओळख पटू नये म्हणून तू माझ्याशी खेळतोस.
आपल्या स्मितानं माझे नेत्र मोहवतोस आणि मग आपले अश्रू लपवतोस !
ही तुझी कला मला ठाऊक आहे !
तुला सांगायचं आहे ते तू कधीच बोलणार नाहीस.

तुला पुरस्कृत करू नये म्हणून तू अनंत प्रकारांनी माझ्यापासून दूर राहतोस !
आजुबाजूच्या गर्दीतलाच तू एक असं मला भासू नये म्हणून तू वेगळा वेगळा राहतोस !
ही तुझी कला आता माझ्या चांगल्या ओळखीची झाली आहे.
अपेक्षित मार्गानं तू कधीच जाणार नाहीस !

इतरांच्यापेक्षा तुझा हक्क कितीतरी जास्त आहे !
आणि म्हणूनच तू शांत आहेस !
आपल्या खिलाडू निष्काळजीपणानं माझ्या भेटी तू नाकारतोस !
ही तुझी तऱ्हा नेहमीचीच आहे.
घेण्यासारखं तू काहीच स्वीकारत नाहीस !

●



## : ३६ :

तो हळूच माझ्या कानात कुजबुजला – "प्रिये - माझ्याकडे बघ ना !"
मी झिडकारत म्हणाले - "जा, निघ इथून"
पण तो हलला सुद्धा नाही !
माझे दोन्ही हात हातात घेऊन तो उभा राहिला -
- "सोड, सोड ना मला -" मी म्हणाले - पण छे !
माझ्या कानांना त्याच्या ओठांचा स्पर्श झाला. नजरेनंच त्याला रोखत मी म्हणाले - "काय हे !" पण... पण तो तसाच होता !
माझ्या गालावर त्याने आपले ओठ हळूच टेकले.
माझ्या सर्वांगाचा थरकाप झाला.
"– आता मात्र फार झालं हं "
पण छे ! त्याचं त्याला काहीच वाटलं नसावं !
माझ्या वेणीत त्यानं फुलं माळली !
मी म्हणाले - "आता काय उपयोग !"
पण तो स्तब्ध उभा होता ! - आणि -
- आणि माझ्या वेणीत माळलेली फुलं काढून तो निघून गेला.
आणि तेव्हापासून हुंदके देणाऱ्या माझ्या मनाला मी विचारतेय् - "तो आता परत येणारच नाही का ?"

●

## : ३७ :

"नाजुक फुलांनी गुंफलेली ही माला माझ्या कंठात घालशील ?" –

" – पण हा हार पुष्कळांकरिता आहे. कुणा एकाचीच मालमत्ता नाही ! अंधुकशा दिसणाऱ्या चेहऱ्यासाठी, क्षितिजापलिकडल्या रहिवाशांसाठी - किंवा कवीच्या काव्यातच जन्म घेणाऱ्या अनेक व्यक्तींसाठी आहे !

आपल्या हृदयाऐवजी माझं हृदय मागण्याची वेळ आता निघून गेली आहे.

एक वेळ अशी होती. माझं हृदय कळीच्या रूपात होतं. आपल्या गाभ्यातच त्यानं आपला सुगंध दडवून ठेवला होता !

पण आता ती कळी फुलली आहे. आतला सुगंध आसमंतात पसरला आहे !

तो सावरून पुन्हा फुलात दडवून ठेवण्याची किमया कुणाला साधली आहे ?

माझ्या हृदयाचे वाटेकरी अनंत आहेत ती कुणा एखाद्याचीच मालमत्ता कशी होणार ?"

●



## : ३८ :

प्रिये - !

कोणे एकेकाळी तुझ्या कवीच्या हृदयात महाकाव्याची कल्पना रुजत होती !

पण -

निष्काळजीपणानं ती कल्पना तुझ्या पायाशी फेकली ...तुझ्या रुमझुमत्या नुपुरांत ती अडकली आणि तिची हजारो शकलं झालीत !

ती खंडकाव्याच्या रूपानं गुंफून तुला अर्पण केलीत !

जुन्या पुराण्या कहाण्याचं माझं गलबत निष्ठुर लाटांनी उलटवलं, अश्रूंनी भिजवलं आणि कायमचं रसातळाला नेलं !

ह्या नुकसानाची भरपाई, प्रिये तुला करावीच लागेल ! माझ्या मरणोत्तर कीर्तीचा चुराडा झाला आहे ! ह्या जन्मी तरी तू मला अमर केलं पाहिजे ! आणि मग त्याबद्दल मी तुला बोल लावणार नाही किंवा वाईटही वाटून घेणार नाही !

●

## : ३९ :

सकाळपासून ह्या फुलांचा हार गुंफण्याचा मी प्रयत्न करते आहे ! पण का कुणास ठाऊक फुलं हातातून निसटतात आणि खाली पडतात !
त्या कोपऱ्यात बसून माझी ही फजिती तू पाहतोय् ! – आपल्या मिष्किल डोळ्यांनी !
त्यांनाच विचार ना, फुलं का बरं पडताहेत ते !
मी गीत गायचा प्रयत्न करते ! पण छे ! जमतच नाही !
सूरच सापडत नाहीत - आणि हास्याची एक मिष्किल रेषा उमटते तुझ्या ओठांवर !
- त्यांनाच विचार ना, सूर कुठं गेलेत ते ? कमलकोषात अडकणाऱ्या भृंगाप्रमाणं माझे स्वर कुठं अडकून पडलेत ते त्यांनाच सांगू दे ना शपथेवर !
आता संध्याकाळ झाली आहे ! फुलानं आपल्या पाकळ्या मिटल्या आहेत. हळुवारपणानं !
वाटतं तुझ्याजवळ बसावं ! नीरव एकांती चांदण्याच्या प्रकाशातच होऊ शकेल असं काम माझ्या ओठांना करू द्यावं !!

●

## : ४० :

तुझा निरोप घेतो तेव्हा अविश्वासाचं हास्य तुझ्या डोळ्यात तरंगतं !
कारण मी इतक्या वेळा तुझा निरोप घेतला आहे की त्यावर तुझा विश्वासच बसत नाही !
मी लवकरच परत येईन ह्याची तुला खात्री वाटते.
पण तुला खरं सांगू ? मला देखील तसंच वाटतं !
कारण वसंत निरोप घेऊन परत येतो. पौर्णिमेचं चंद्रबिंब तेच करतं... आणि ही फुलं ? पुनःपुन्हा त्याच डालीवर बहर आला की हिंदोलतात ! वर्षानुवर्षे हे चाललं आहे -
मग मी सुद्धा पुन्हा येणार ! नाही का ?
– पण हे सगळं थोडा वेळ विसरू या आपण.
तुझा निरोप घेतो तेव्हा ते सत्य समज !
आणि क्षणभरच का होईना
तुझ्या डोळ्यांच्या कडा ओलसर होऊ दे !
आणि मग पुन्हा भेटेन तेव्हा तू मिष्किलपणानं हास ना !
मी काही सुद्धा म्हणणार नाही !

●

## : ४१ :

माझ्या हृदयातलं गुपित तुला सांगावं असं सारखं वाटतं !
पण मला धीर होत नाही ! वाटतं तू त्याची थट्टा करशील !
— आणि म्हणूनच मी सुद्धा सगळं थट्टेवारी नेतो ! त्यानं
माझं गुपित सारवून टाकतो !
माझी व्यथा हास्यानं सजवतो. – तू त्याला हसू नयेस
म्हणून !

तुला अगदी सत्य, निर्भेळ सत्य सांगावं असं फार फार
वाटतं मला ! पण मला धीरच होत नाही ! वाटतं तुझा
त्यावर विश्वास बसणार नाही !
आणि म्हणून त्यावर मी असत्याची आभरणं चढवतो ! -
मला जे सांगायचं त्या वेगळं मी बोलतो !
माझं शल्य क्षुद्र भासवतो - तू ते तसं समजू नयेस
म्हणून !

वाटतं तुझी स्तुती करावी ! शब्दांच्या फुलोऱ्यांनी तुला
फुलवावं ! पण मला धीर होत नाही.
तू कदाचित् त्याचं मूल्यमापन करशील आणि ते माझ्या
पदरात टाकशील अशी सारखी भीती वाटते !
आणि मग मी तुझी कठोर शब्दांनी निर्भत्सना करतो !
माझ्या शब्द भांडाराचं आगळं प्रदर्शन करतो !
तुला मी दुखवतो - तू मला दुखवू नयेस म्हणून ! माझं
शल्य तुला कधीच कळू नये म्हणून !



तुझ्याशेजारी शांतपणानं बसावं असं फार फार वाटतं !
पण मला धीर होत नाही ! वाटतं, माझी नजर चुकवून
माझं हृदय आपल्या संवेदना तुला कळवील !
आणि मी असंबद्ध बडबड करत बसतो ! त्या शब्द-
जंजाळात माझ्या हृदयातल्या भावना झाकळून टाकतो !
माझ्या दुःखाला धिःकारतो ! तू तसं करू नयेस म्हणून !

कधी कधी वाटतं तुझ्यापासून दूर दूर निघून जावं !
पण धीर होत नाही !
हा माझा भ्याडपणा तुला समजू नये म्हणून मी धडपडतो !
आणि मग उगीचच मान ताठ करतो.
– एखाद्या उद्धटासारखा पुनःपुन्हा तुझ्या सामोरी जातो
– पण तुझी ती नजर !
माझी जखम पुन्हा भळभळा वाहते -
एकसारखी पाझरते !

●

## : ४२ :

मंदिरेनं धुंद झालेल्या मुशाफिरा !
– आपल्या घराची दारं लाथेनं तोडून उघड्यावर वेडाचार करणार असशील -
- शराबीची बाटली एका घोटात संपवून सर्वांकडं कुत्सितपणानं बघणार असशील -
- वाटेल त्या आडमार्गानं जाणार असशील आणि निरर्थकाशी खेळणार असशील -
विचार विनिमयात गुरफटणार नसशील -
- समोरच्या वादळात देखील आपली नौका वल्हवणार असशील -
ती वल्हं बेदरकारपणानं तोडून मोडून फेकून देणार असशील -
तर मी देखील तुला साथ देईन. मदिरेनं धुंद होऊन तुझ्याबरोबर बरबाद होईन !
आजपर्यंतचा माझा सगळा वेळ विद्वान लोकांबरोबरच चर्चा करण्यात वाया घालवला आहे !
मी खूप शिकलो आहे, –अनुभवाने माझे केस पांढरे झाले आहेत ! डोळे अवलोकनानं आंधळे झाले आहेत !
वर्षानुवर्ष चिटोऱ्या गोळा करून त्याचा पर्वतप्राय ढीग झाला आहे !
- त्याच्या पुन्हा चिंध्या करू या ! त्या लाथेनं ठुकरावून त्या चिटोऱ्या आसमंतात उडवून लावू या !
कारण विद्वत्तेचं अंतिम टोक म्हणजेच तुझ्यासारखी ही धुंदी आणि बरबादी !
ही सगळी नीति अनीतिची बंधनं झुगारू दे !
मला इतस्ततः भटकू दे ! अनिर्बंध !



त्या अनिर्बंधतेच्या भयानक वादळात मला गुरफटून घेऊ दे !
हे जग लायक माणसांनी पुरेपूर भरलंय् !
उद्योगी... हुशार... कारागीर... कलावंत... सगळेच आहेत !
सहज प्रथम येणारे आहेत...
विनयशीलतेनं त्यांच्या मागोमाग जाणारे दुसरे देखील आहेत !
त्यांना सुखात राहू दे, भरभराट पाहू दे !
– पण मला मात्र तुझंच जिणं पसंत आहे !
कारण, मला आता पटलं आहे -
विद्वत्तेचं अंतिम टोक म्हणजेच ही धुंदी आहे !

त्या सर्व विद्वान मंडळीवर माझ्या उरलेल्या जबाबदाऱ्या मी सोपवतो !
माझ्या विद्वत्तेचा अभिमान - चांगल्या वाईटाची तमा - मला आता नाही !
हा आठवणीचा कलश खळबळून खळबळून रिकामा करू दे ! शेवटचा अश्रुबिंदू देखील निष्कासून टाकू दे !
फेसाळलेल्या मदिरेच्या पेल्यात माझं हास्य बुडवून टाकू दे !
त्याला नवा तजेला येऊ दे !
नीतिमत्तेच्या चिंध्या चिंध्या करून मी मदिरेच्या संगतीत बरबाद होणार आहे -
- हीच माझी प्रतिज्ञा !!

●

## : ४३ :

छे, छे ! मित्र हो, मी कधीच संन्यास घेणार नाही !
मला जर ती साथ देणार नसेल तर मी कधीच
सर्वसंगपरित्याग करणार नाही !
स्निग्ध छाया आणि तिचा सहवास.
तो मिळाल्याशिवाय मी केव्हाही तपश्चर्येला बसणार नाही.
ती बरोबर नसेल तर मी कधीच संन्यास घेणार नाही !

तिच्या खळखळून हसण्याचा प्रतिध्वनी येणार नसेल,
तिच्या पदरानं वारा फडफडणार नसेल,
तिच्या गुजगोष्टींनी एकांत गंभीर होणार नसेल -
तर घराचा निवारा व उबारा सोडून
एकांतात अरण्यात कधीच जाणार नाही !
छे, छे ! मित्र हो, मी कधीच संन्यास घेणार नाही !
●



## : ४४ :

आचार्य -
आम्हा पातक्यांना क्षमा करा ! चहूकडं वावटळ थैमान
घालते आहे. त्याबरोबर धूळ उडते आहे. पाचोळा उडून
जातोय् ! तुमच्या उपदेशाचे शब्द देखील त्याच्याबरोबर
कुठंतरी विरून गेले आहेत !
जीवन क्षणिक आहे, निरर्थक आहे असं म्हणू नका !
कारण आम्ही मृत्यूशी संगनमत केलं आहे, शेवटचं !
काही क्षणच आम्ही अमर झालो आहेत ! - फक्त काही
क्षण !
एखादं सैन्य, आमच्यावर तुटून पडलं तरी आम्ही म्हणू -
छे, छे ! तुम्ही उगाच इथं गोंधळ घालताहात. तिकडं कुठं
तरी जा आणि आपल्या तलवारीचा खणखणाट करा !
आम्हाला शांतपणानं बोलू द्या. कारण निसटत्या
कालातून काही क्षणच आम्हाला मिळाले आहेत ! काही
क्षणापुरतेच आम्ही 'चिरंजीव' आहोत !
आमचे मित्र जरी आम्हाभोवती एकत्र झाले. तरी आम्ही
त्यांना अभिवादन करून सांगू -
"--मित्रहो, तुमचा हा सगळा वेळ आम्हाला
अवघडल्यासारखा वाटतोय् ! ह्या अनंताच्या पोकळीत
आम्हाला मिळालेली जागा फारच अपुरी आहे !
वसंतात फुलांना बहर येतो आणि त्याच्या सुवासानं
मधमाशांची गर्दी होते ! पण आमच्या ह्या लहानशा
स्वर्गात, आम्हाला मिळालेल्या चिंचोळया जागेत फक्त
आम्ही दोघंच मावू शकू !
फक्त दोघंच !
●

## : ४५ :

प्रस्थान करणाऱ्या प्रवाशाला परमेश्वराच्या आशीर्वादाची
प्रेरणा दे ! त्याच्या चरणावरची धूळ झटकून टाक !
सरळ, सोपं आणि जवळीक असणारंच फक्त स्वीकार !
सुहास्य वदनानं ते आपल्या हृदयाशी धर !
आज त्यांचा उत्सव आहे. कुठल्याही क्षणी ते मरणाधीन
होतील !
हुंदडणाऱ्या लाटांवर क्षणकाल चमकणाऱ्या प्रकाशाप्रमाणं
तुझं हास्य निरर्थक असू दे !
पानांच्या कडेवर किंचितकाल स्थिरावणाऱ्या दवबिंदूप्रमाणं
तुझं जीवन 'कालाच्या विशाल पर्णावर नाचू दे !'
आणि आपल्या सारंगीवर देखील क्षणातच विरणारं
संगीतच रुजू दे !

●



## : ४६ :

मला पाठ दाखवून तू निघून गेलीस !
त्याचा शोक करावा, तुझी एकुलती एक प्रतिमा नाजुक
गीतात सजवून माझ्या हृदयात कायमची रेखावी असं
मला वाटलं !
पण छे ! माझ्यासारखा दुर्दैवी कोणी नसेल !
कारण वेळ फारच थोडा आहे !

आयुष्य क्षणाक्षणांनी दुबळं होत चाललं आहे. वसंत
क्षणकालीन आहे. सुंदर, सुवासिक सुमनं फुलता फुलता
कोमेजतात ! आणि जीवन हे विश्वाच्या कमलपत्रावरच्या
दवबिंदूप्रमाणे आहे असं सारीजण मला बजावताहेत !
ह्या सर्व गोष्टी मी विसरू ? आणि ते देखील
तुझ्यासाठी ? निष्ठुरपणानं मला झिडकारणाऱ्या प्रेमाखातर ?
छे, छे ! ती एक घोडचूकच होईल. माझा मूर्खपणा होईल
तो !
कारण –
– वेळ फारच थोडा आहे !

हो. वेळ फारच थोडा आहे. माझ्या स्निग्ध वर्षे ! आपली
नूपुरं झुणझुणत ये ! आणि तू हेमंता ! आपल्या गुलाबी
थंडीसकट ये.... आणि तू.... तू... तुम्ही सारेच या !
आपल्या स्पर्शानं मला पुलकित करा !
मित्र हो, आपण मरणाधीन आहोत -
हृदय तुडवून जाणाऱ्या प्रेयसीसाठी डोक्यात राख कां
म्हणून घालावी ?
कारण वेळ फारच थोडा आहे.

खरंच, एखाद्या कोपऱ्यात बसावं, गोड स्मृतीनं गुंगावं,
"तूच माझं सर्वस्व आहे" वगैरे म्हणावं
- ते काव्यात गुंफावं ! मनाला बरं वाटतं !
दुःखावर मात करावी ! सांत्वनातीत धैर्य दाखवावं -
अभिमान वाटतो !

पण थांबा !
एक नवीन चेहरा दाराआडून डोकावतो आहे !
माझ्या डोळ्यात खोल खोल पाहू जातोय्.
मला माझे अश्रू पुसलेच पाहिजेत !
माझ्या गीतांचे सूर बदललेच पाहिजेत !
कारण,
वेळ फारच थोडा आहे !
●



## : ४७ :

तशीच जर तुझी इच्छा असेल तर मी माझं गीत थांबवीन !
तुझ्या हृदयाची धडधड वाढत असेल
तर तुझ्यावर रोखलेली माझी नजर मी काढून घेईन !
चालतांना तुझी पावलं अडखळत असतील
तर मी दुसऱ्या मार्गानं जाईन !
हार गुंफताना जर तू बावरत असशील
तर तुझ्या बागेत मी येणार नाही !
तुझ्या तलावातल्या पाण्याची देखील चलबिचल होत
असेल -
तर तुझ्या तीरावर माझी बोट हाकणार नाही !
●

## : ४८ :

प्रिये, तुझ्या बंधनातून मला मुक्त कर !
ही मादक चुंबनं आता पुरे झालीत !
त्यांच्या मधुर सुवासानं देखील मला गुदमरल्यासारखं
होतंय् !
ही दारं उघड, पहाटेचा प्रकाश आत येऊ दे !
तू मला प्रेमानं कुरवाळतेस - मी तुझ्या हृदयाशी
बिलगतो, स्वतःला विसरतो !
पण ह्यातून मला आता मुक्त कर !
माझं मुक्त जीवन मला परत दे
आणि मगच माझं अनिर्बंध हृदय तुला वाहू दे !
●



## : ४९ :

तिचा हात हातात घेऊन मी माझ्या हृदयाशी धरतो !
तिची नितळता माझ्या बाहुपाशात बद्ध करायचा मी प्रयत्न
करतो ! तिच्या मधुर हास्याचं चुंबनांनी प्राशन करावं,
तिच्या काळ्याभोर नेत्रांना नयनांनी कुरवाळावं असं
वाटतं !
छे, छे !... पण कुठं आहे हे सारं ? छे ! ते सापडणंच
शक्य नाही ! - आकाशातून निळाई कधी आणता येईल
कुणाला ?
तिच्या सौंदर्याला बाहुपाशात कवटाळतो ! पण ती मला
हुलकावण्या देते ! माझ्या बाहुपाशात उरतं फक्त तिचं
शरीर !
गोंधळून, थकून मी परत फिरतो !
खरंच, स्पर्शातीत असलेला सुगंध फुलं पकडून
मिळेल ? त्या आत्म्याच्या आधीन असणाऱ्या गोष्टी !
●

## : ५० :

प्रिये,
रात्रंदिवस तुझ्या मीलनाची अपेक्षा आहे !
सर्वभक्षी मृत्यू भेटतो त्याप्रमाणं तुझं माझं मीलन व्हावं !
वादळाप्रमाणं मला उलथवून टाक !
माझं सर्वस्व हरण कर !
माझ्या निद्रेत शिरून माझी सारी स्वप्नं रसातळाला ने !
माझं सगळं विश्व - हिरावून घे !
आणि त्या सर्वस्व गमावलेल्या, शरीर गळून पडलेल्या
आत्म्याचं तुझ्या सौंदर्याशी मीलन होऊ दे !

पण छे ! ते कसं शक्य आहे ? अशक्य आहे ते !
असं मीलन परमेश्वरा,
फक्त तुझं आणि माझंच होऊ शकेल !
●

## : ५१ :

- तर मग संपव हे शेवटचं गीत !
आपण निरोप घेऊ या !
ही रात्र विसरून जा !
ह्या सरत्या शर्वरीचं स्मरण तरी कशाला ठेवायचं ?
माझ्या बाहुपाशात कुणाला कवटाळायचा प्रयत्न करतोय्
मी ?
स्वप्न ?
छे, दे ! ती तर बंधनातीत असतात !
आपल्या आतुरल्या हातांनी मी रितेपण कवटाळतोय् !
आणि ते माझ्या हृदयाला खोल खोल जखम करतंय् !!
●

## : ५२ :

हा नंदादीप कां शांत झाला ?
वाऱ्यानं त्याचं फडफडणं बंद व्हावं म्हणून मी त्याला
पदराआड केला -
आणि म्हणून तो शांत झाला !
आणि हे फूल ? ते कां कोमेजलं ?
प्रेमातिशयानं मी त्याला हृदयाशी आवळलं म्हणून
कोमेजलं !
आणि हा निर्झर ? तो कां आटला ?
माझ्या एकट्याच्या उपयोगी पडावा म्हणून मी
त्याच्याभोवती धरण बांधलं - म्हणून तो आटला !
ह्या सतारीची तार कां तुटली ?
तिच्या शक्तीबाहेरची तान काढायचा मी प्रयत्न केला
म्हणून !

●



## : ५३ :

माझ्याकडे बघून मला अशी लाजवतेस का ?
मी कुणी भिक्षेकरी म्हणून तुझ्या दाराशी आलो नाही !
तुझ्या कुंपणाजवळ ह्या कोपऱ्यात मी क्षणभराकरता उभा
आहे !
माझ्याकडं असं पाहून मला लाजवू नकोस !
ह्या कुंपणापल्याडल्या सावलीत एखाद्या वाटसरूसारखा
मी मुकाट्यानं उभा आहे !
तुझ्या फुलांना मी हातसुद्धा लावला नाही !
चालून चालून माझे पाय शिणलेत !
आणि दयार्द्र पावसाची एक शिडक आली !
शेजारच्या बांबूच्या वनातून आरडाओरड करत वारा वाहू
लागला आहे !
लढाई हरलेल्या पळपुट्या भ्याड शिपायाप्रमाणं
आकाशातले मेघ सैरभैर पळताहेत !
चालून चालून माझे पाय थकले होते !
तुला माझ्याबद्दल काय वाटलं कुणास ठाऊक
- किंवा आणखी कुणाची वाट पहात होतीस ?
कारण भिरभिरणारी तुझी नजर विजेच्या लखलखाटात
चमकून गेली !
त्या अंधारात सुद्धा मी तुला दिसू शकेन... मला तरी
कल्पना कुठं होती ?
तुला माझ्याबद्दल काय वाटलं कुणास ठाऊक !
आता दिवस मावळला आहे ! पावसाची रिपरिप थोडी
शांत झाली आहे !

तुझ्या बागेतल्या कोपऱ्यातील ह्या वृक्षाच्या छायेला आणि
ह्या निवाऱ्याला हा शेवटचा प्रमाण !
अंधारून आलं आहे....
आपल्या झोपडीचं दार बंद करून घे !
मी निघालो आहे !
कारण दिवस मावळलाय् !
●



## : ५४ :

आपली फुलांची परडी भरून घेऊन तू कुठं निघाली
आहेस ? इतक्या उशीरा !
बाजार तर केव्हाच संपलाय् !
आपापली गाठोडी घेऊन ती सारी केव्हाच परत आली !
त्या पलिकडच्या झाडाच्या शेंड्यावर चंद्रबिंबसुद्धा डोकावू
लागलं आहे !
आणि इकडल्या तीरावरल्या लोकांचा गलबलासुद्धा
दूर दूर विरत चाललाय् ! किनाऱ्यावरची बदकंसुद्धा
शांतपणे झोपली आहेत !
आणि आता फुलांची परडी भरून घेऊन तू कुठं निघाली
आहेस ?
साऱ्या वस्तीला झोपेनं कुरवाळायला सुरवात केली
आहे !
त्या झाडावरच्या पक्षांची किलबिल शांत झाली आहे !
पानांची सळसळ थांबली !
आपल्या कामावरून परत आलेले मजूर ह्या झाडाखाली
चटई पसरून शांतपणानं विसावले आहेत !
आणि अशा वेळी आपली परडी फुलांनी भरून तूं कुठं
निघाली आहेस ?
●

## : ५५ :

तू गेलास तेव्हा मध्यान्ह झाली होती !
सूर्य प्रखर तेजानं आकाशात तळपत होता !
माझं सकाळचं कामधाम आटोपून मी सज्जात उभी होते !
एकाकी !
आणि तू निघून गेलास !
लांबवरून मंद मंद वाहणारा वारा शेतातला तृप्तीचा
सुगंध आणत होता !
बदकं तळ्यात काठावरच्या सावलीत अव्याहतपणं
एकमेकांना साद घालत होती ! – आणि त्याचा प्रतिध्वनी
माझ्या खोलीत अखंड गुंजारवाच्या रूपानं होत होता !
दुपारच्या वेळी सारं खेडं शांत होतं !
रस्ता निर्मनुष्य होता. मध्येच एकदम वाऱ्याच्या चाहुलीनं
पानं सळसळत ! – आणि शांत होत !
मी वर आकाशाच्या निळाईत डोकावून पाहिलं.
त्यानं पांढुरक्या ढगांनी माझं आवडतं नाव गुंफलं होतं !
– आणि सारं गाव दुपारच्या शांत वेळी झोपलं होतं !



वेणी घालायला मोकळे सोडलेले केश तसेच मोकळे
होते !
आणि अवखळ वारा त्यांच्या बटा माझ्या गालांवरून
फिरवत होता !
शेजारून वाहणारी नदी निःसंकोचपणं वहात होती !
इतस्ततः हिंडणारे पांढरे ढग आता सुस्तावले होते !
आणि मी देखील केश न वळवता तशीच बसले होते !
भर दुपारी तू निघून गेलास !
रस्ता तापला होता.
पलिकडल्या शेतांना धाप लागली होती.
बदकं सावलीत हुंकारत होती आणि मी एकटीच सज्जात
उभी होते ! भर दुपारी तू निघून गेलास !!

## : ५६ :

आपल्या गृहकृत्यांत नेहमीप्रमाणे व्यग्र असणाऱ्या
अनेकजणींसारखी मी देखील एक होते !
त्या गर्दीतून मला एकटीला तू कां बरं निवडलंस ?
माझ्या नित्य जीवनातून बाहेर कां काढलंस ?
अव्यक्त प्रीती पवित्र असते ! अंतःकरणाच्या खोल अदृश्य
गाभ्यात ती माणकासारखी चमकते ! पण बाहेर
उघड्यावर आश्चर्यमुग्ध प्रकाशात मी फार भयानक भासते !
माझ्या अंतःकरणातून वेलीवत थरथरणारी माझी प्रीती तू
फरफटत बाहेर उघडण्यावर आणलीस ! आपल्या स्निग्ध
छायेतून ती कायमची उघडी पाडलीस !
असं कां केलंस ?
माझ्या बाकीच्या मैत्रिणी होत्या तशाच आहेत.
त्यांच्या अंतर्मनात कुणीच डोकावलं नाही अजून...!
कस्तुरीमृगाप्रमाणं त्यांचं रहस्य त्यांना सुद्धा माहीत नाही !
हसत, खेळत, बडबडत त्या आपल्या नेहमीच्या कामात
व्यग्र असतात. रोज नेमानं देवळांत जातात. तेलवात
करतात... नदीवर मनसोक्त डुंबतात ! –
पण मी ?
वाटलं, तुझ्या सहवासात तरी माझं प्रेम आपलं शल्य
विसरेल. त्याची भीड चेपेल.
पण तू माझ्याकडं पाठ फिरवून निघून गेलास !
खरंच, तुझा मार्ग तुला मोकळा आहे ! पण मला मात्र
परत जाण्याची मुभा तू ठेवली नाहीस ! आणि आपल्या
विस्फारलेल्या नेत्रांनी दिवसभर गिळू पाहणाऱ्या जगापुढं
तू मला उघडी करून ठेवली आहेस -
अगदी उघडी !

●



## : ५७ :

जगा,
तुझ्या बागेतलं फूल मी खुडलं ! माझ्या हृदयाशी धरलं
– आणि मला काटा बोचला !
दिवस मावळला. अंधार पसरला. ते फूल आता कोमेजून
गेलं आहे !
पण काट्याचं शल्य मात्र तसंच आहे !
सारखं मला खुपतंय् !

जगा,
तुझ्या बागेत विविध रंगानं नटलेली सुवासाची सुंदर
सुमनं फुलतील !
पण माझा पुष्पसंचयनाचा काळ आता संपला आहे !
ह्या भयाण अंधारात मी खुडलेलं ते पुष्प आता
माझ्याजवळ नाही !
– शिल्लक आहे फक्त त्याच्या काट्याचं ते शल्य !

●

## : ५८ :

एकदा सकाळी त्या बगीच्यात एका आंधळ्या छोट्या मुलीनं, कमलपत्रात गुंडाळलेली एक पुष्पमाला मला अर्पण केली !
माझ्या गळयात ती घालताच माझे डोळे एकदम भरून आले !
मी तिचं चुंबन घेतलं आणि म्हणालो -
"ही फुलं बघ, तुझ्यासारखीच नेत्रहीन आहेत !
कारण तू दिलेली ही भेट किती सुंदर आहे
हे त्या फुलांना तरी कुठं माहीत आहे !"
●

## : ५९ :

स्त्रिये !
तू केवळ परमेश्वराचीच कलाकृती नाहीस, माणसाची सुद्धा आहेस ! आपल्या हृदयातल्या सौंदर्यानं ते तुला सातत्यानं अलंकारत असतात !
रुपेरी कल्पनाशक्तीनं कवी तुझी आभरणं आकारतात !
चित्रकार मोहमयी वळणदार रेखांनी तुला अमरत्व बहाल करतात !
सागर आपली रत्नं उधळतो,
वसुंधरा आपली हिरे माणकं !
वसंत फुलांची पखरण तुझ्यावर करतो !
तुला अलंकारण्यात हे सारे स्वतःला धन्य मानतात !
तुझं सौंदर्य वाढवतात !
माणसानं आपल्या इच्छाशक्तीचं सारं वैभव तुझ्या यौवनावर उधळलं !
तूं केवळ स्त्रीच नाहीस,
मनुष्याचं स्वप्नवैभव देखील आहेस !
●

## : ६० :

शिल्पातील सौंदर्यदेवते -
ह्या जीवनाच्या कल्लोळांत तू निश्चल, नीरव एकाकी तिष्ठत
उभी आहेस !
आणि हा कालपुरुष तुझ्या पायाशी बसून
अनंत कालापासून तुला विनवतो आहे –
"प्रिये बोल ! प्रेमाचा एखादा हुंकार तरी दे !"
पण तुझी वाणी शिल्पातच लुप्त झाली आहे !
सुंदरते, तू निश्चल उभी आहेस !
●



## : ६१ :

मना ! धीर धर !
हा वियोगाचा क्षण सुगंधित असू दे !
तो मृत्यू नसू दे - शेवट असू दे !
प्रीतीची स्मृती होऊ दे ! दुःखाला संगीतात स्रवू दे !
आकाशात भरारी मारणारे पंख,
घरकुल आल्याच्या आनंदात मिटू दे !
तुझा हा शेवटचा स्पर्श, पारिजातकाच्या फुलाइतका हळवा
असू दे !
चिर निरंतरा ! शांत रहा ! फक्त एकच क्षण तुझे ते
शेवटचे शब्द कुजबुजू देत !
तुला शेवटचा प्रणाम करून माझ्या नंदादीपानं तुला मी
मार्ग दाखवीन !
●

## : ६२ :

स्वप्नात धूसर झालेल्या मार्गानं मी माझ्या गेल्या
जन्मीच्या प्रेयसीला भेटायला गेलो !
त्या एकाकी रस्त्याच्या शेवटी तिचं घर होतं ! पश्चिमेकडून
मंद मंद वारा वहात होता, आणि त्यामुळं तिनं पाळलेला
पोपट शांतपणानं पहुडला होता !
कोपऱ्यातली कबुतरं देखील शांत होती !
त्या छाया प्रकाशित सायंकाळी दरवाजातला कंदील तिनं
मोठा केला आणि माझ्यासमोर उभी राहिली !
आपले विशाल नेत्र माझ्यावर स्थिरावत विचारलं -
"कसा आहेस ? ठीक आहेस ना ?"
मी उत्तर द्यायचा प्रयत्न केला. पण जणू मला भाषाच
आठवली नाही ! शब्दच सुचले नाहीत ! खूपखूप
आठवायचा प्रयत्न केला ! आमची नावं देखील मी
विसरलो होतो !
आणि तिचे डोळे एकदम भरून आले ! माझा हात तिनं
हातात घेतला. आणि तिचा हात माझ्या हातात धरून मी
कितीतरी वेळ स्तब्ध होतो !
अचानक वाऱ्याचा झोत आला; तिनं मोठा केलेला कंदील
क्षणभरच फडफडला.
— आणि शांत झाला !

●

## : ६३ :

— तुला जायलाच हवं का ?
रात्र शांत आहे आणि अरण्यात तर काळोख पसरला
आहे !
आमच्या घरातल्या प्रकाशज्योती तेजाळल्या आहेत
फुलं उमलली आहेत आणि नेत्रात यौवन उफाळलं
आहे !
आपल्या वियोगाची वेळ झाली ?
मुशाफिरा, तुला गेलंच पाहिजे का ?

आमच्या अभिलाषी हातांनी आम्ही तुझं पाऊल अडवलं
नाही.
तुझा मार्ग मोकळा आहे ! तुझ्या प्रयाणाची सिद्धता
असलेला घोडा खुरांनी जमीन उकरत फुरफुरतो आहे !
तुझ्या मार्गात कदाचित् आमचं संगीत येत असेल.
तुला मागं फिरविण्याचा प्रयत्न फक्त आमच्या नेत्रातल्या
अश्रूंनीच केला असेल.
त्याशिवाय तुला अडवण्याचं कोणतं साधन आहे ?
आमचे अश्रू हेच आमचं शस्त्र !

पण तुझ्या नेत्रात ही कसली ज्वलंत आकांक्षा निर्माण
झाली आहे ?
ही तुझी चलबिचल कुठल्या ओढीचं द्योतक आहे ?
अनंतातून तुला कुणी साद घातली आहे का ?
अंतरिक्षातले हे ग्रहतारे कुठल्या गूढ गीतानं तुला आपला
संदेश ह्या भयाण रात्री सांगताहेत ?
ह्या आनंदोत्सवाबद्दल तुला जर काहीच वाटत नसेल,
अंधारात एखाद्या कोपऱ्यात शांतपणे बसून रहायची इच्छा
असेल तर हे दीप आम्ही मालवून
आमचं संगीत देखील थांबवतो !
आम्ही सुद्धा ह्या अंधारात बसून राहू. पानांची सळसळ
तेवढी येईल आणि क्षीण झालेली चंद्रकिरणं गवाक्षातून
तुला हुडकू पाहतील.
खरंच मुशाफिरा, ह्या अंधाऱ्या रात्री कुठल्या चिरजागृतीनं
तुला झपाटलं आहे ?
●



## : ६४ :

धुळीनं माखलेला आणि उन्हानं करपलेला मार्ग मी
दिवसभर तुडवला !
आणि ह्या शांत सायंकाळी ह्या आश्रमाची दाराशी
ठेठावतोय् !
पण हा भयाण दिसतोय्. एकाकी वाटतोय् !
शेजारचा वटवृक्ष गंभीरपणानं एकटक पहात उभा आहे.
त्याच्या पारंब्या आसुसलेल्या आणि वखवखलेल्या
बोटांनी ह्या आश्रमाच्या भिंती पोखरून आत शिरल्या
आहेत !
– आणि मला पूर्वीचे दिवस आठवले !

थकलेले प्रवासी ह्या आश्रमापाशी येत, शेजारून
वाहणाऱ्या झऱ्यात पाय धूत ! त्यांना पाहून तो झरा
अखंडपणं खळखळून हसे !
ह्याच वडाखाली ते आपली पथारी पसरत आणि
उगवतीच्या चंद्रप्रकाशात त्यांच्या गप्पांना भरती येई !
पहाट होताच त्यांच्या उठण्याची पक्षीगण वाट पहात ह्या
वडाच्या झाडावर बसत आणि ते उठताच किलबिलाटाच्या
रूपानं त्यांना अभिवादन करीत ! शेजारच्या कुंपणावरची
रानटी फुलं सुद्धा आनंदानं नतमस्तक होत !

पण आज भयाण काळोख सर्वत्र पसरला आहे !
कोनाड्यातली पणती शांत झाली आहे ! आणि तो
काळवंडलेला कोनाडा एखाद्या आंधळ्याच्या
डोळ्याप्रमाणं रोखून पहातोय् असं वाटतं ! केविलवाणा !
शेजारचा झरा कोरडा पडला आहे !
बाजूच्या झुडपात रातकिड्यांचं कर्कश
केकाटणं चालू आहे !
बांबूच्या झाडांच्या लांब लांब सावल्या ह्या सायंकाळी
आणखीनच लांब वाटताहेत -
भुतानं पसरलेल्या हातासारख्या !
– त्या हिरवळीवर !
खरंच इथं कुणीच नाही !
आयुष्याच्या सायंकाळी ह्या माझ्या
आश्रमात मी कुणाचाच पाहुणा नाही.
माझी गात्रं अन् गात्रं थकली आहेत !
आणि ही उर्वरित रात्र 'आ' वासून
माझ्या पुढ्यात उभी आहे !
माझ्या आयुष्याच्या सायंकाळी !
●



## : ६५ :

तू पुन्हा साद घातलीस ?
संध्याकाळ झाली आहे
प्रेयसीच्या मिठीप्रमाणं थकवा मला आवळतोय् !
तरी तू मला साद घातलीस ?
सारा दिवस मी तुझ्या संगतीत घालवला !
ही रात्र तरी माझी मला लाभू दे !
कुठल्याहि गोष्टीला शेवट असतोच !
हा रात्रीचा एकांत हा माझा एकट्याचा आहे.
ह्या एकांताला चिरत तुझी
साद माझ्या कानावर येतेय् का ?
सायंकालीन अंगाई तुला माहीत नाही ?
तुझी निर्दयता शांतीत लीन होत नाही ? कधीच ?
तुझ्या उद्यानातली फुलं नाजुकपणं पाकळ्या मिटून
मृत्यूला शरण जाऊन मातीत मिसळत नाहीत ?
निर्दयते, तू मला साद घालायलाच हवी ?
– तर मग प्रीतीनं कुरवाळलेल्या नेत्रांना वाट पहात
दुःखानं पाझरू दे !
ह्या एकाकी खोलीत हा नंदादीप असाच जळत जळत
शांत होऊ दे !
थकले, भागले प्रवासी परत आपल्या मार्गानं जाऊ देत !
माझी सारी स्वप्नं तुडवीत हाकेला साद देत मी
तुझ्याकडे निघालो आहे !
●

## : ६६ :

इतस्ततः भटकणारा वेडा, परीस शोधत हिंडत होता. त्याचं सर्वांग धुळीनं माखलं होतं, डोक्यावर केसांचा गुंता झाला होता आणि त्याचं शरीर थकून भागून एखाद्या सावलीसारखं विराण झालं होतं ! आपले ओठ निश्चयानं घट्ट दाबून धरले होते आणि काजव्यासारख्या निस्तेज डोळ्यानं तो परीस शोधत होता !

समोर विशाल सागर गर्जना करून त्याची थट्टा करत होता ! त्याच्या त्या निर्दय लाटा आपल्यात दडवलेलं रत्नभांडार उन्हात चमकवून दाखवत होत्या ! त्या वेड्याच्या निर्बुद्धपणाची खिल्ली उडवत खिदळत होत्या !
कदाचित् त्याला परीस सापडणं शक्य नव्हतं
– पण तो स्वस्थ बसणार नृव्हता. कारण परीसाचा शोध हेच त्याचं जीवनसर्वस्व होऊन बसलं होतं !
– समुद्राच्या लाटांनी आकाशाला गवसणी घालायला आपले हात उंच उंच उभारावेत !
किंवा ग्रहताऱ्यांनी आपल्या असाध्य ध्येय प्राप्तीसाठी त्या ध्येयाभोवतीच फेर धरावा.
– तसंच त्या एकाकी सागरतीरी, धुळीत माखलेल्या कपड्यांच्या चिंध्या झालेल्या, केस पिंजारलेल्या अवस्थेत तो वेडा, परीस शोधत हिंडत होता !

आणि एक दिवस एक लहान मुलगा त्याला म्हणाला -
"ही सोन्याची साखळी तुला कुठं सापडली ?"
तो वेडा थबकला !



त्याची लोखंडी साखळी केव्हातरी सोन्याची झाली होती
- ते स्वप्नं नव्हतं - सत्य होतं !
पण घडलं केव्हा ? त्याला काहीच आठवेना. त्यानं खूप आठवायचा प्रयत्न केला. नकळत त्याला केव्हा परीस सापडला होता - त्याला काहीच स्मरेना !
कारण किनाऱ्यावरचा दगड उचलायचा, कमरेला बांधलेल्या साखळीला स्पर्शायचा आणि ती सोन्याची होत नाही हे पाहून फेकून द्यायचा ही त्याला जणू सवयच झाली होती !
त्याला परीस सापडला होता पण ते समजायच्या आतच त्यानं तो फेकून दिला होता !

मावळत्या सूर्याच्या स्पर्शानं पश्चिम सोनेरी झाली ! आणि त्या वेड्यानं परिसाचा शोध पुन्हा सुरू केला ! अशक्त, विरक्त, वार्धक्यानं वाकलेला आणि उन्मळून पडलेल्या वृक्षाप्रमाणं गलितगात्र झालेल्या हृदयानं, त्या वेड्यानं पुन्हा परिसाचा शोध सुरू केला !

●

## : ६७ :

मंदमंद पावलं टाकीत संध्याकाळ
सारं संगीत बंद करून अवतरते आहे !
तुझे सारे सहप्रवासी पुढं निघून गेले आहेत !
तू पूर्णपणे थकला आहेस - आकाश काळवंडलं आहे.
आणि वादळाची चाहूल लागली आहे !
तरीपण माझं गीत ऐक.
पाखरा,
तुझे पंख मिटू नकोस !

ती पलिकडे दिसते ती हिरवळ नाही.
त्या समुद्राच्या हिरव्या निळ्या झालेल्या क्रूर लाटा आहेत
एखाद्या कृष्णसर्पासारख्या फूत्कार टाकताहेत !
तो धवल पुष्पसंभार नाही - लाटांवरचा फेस आहे !
छे, छे !
तुझं घरकुल अजून खूप दूर आहे. दृष्टीपल्याड आहे
आणि समुद्राचा किनारा देखील क्षितिजापल्याड आहे !
तरी पण माझं गीत ऐक पाखरा,
तुझे पंख असे मिटू नकोस !

एकलकोंडी रात्र सीमातीत पसरली आहे.
पहाट क्षितिजाआड आहे.



तारकांनी आपले श्वास कोंडून धरले आहेत ! हा क्षीण
झालेला चंद ह्या अथांग रात्रीत बुडत चालला आहे !
तरीपण माझं गीत ऐक.
पाखरा, तुझे पंख असे मिटू नकोस !

आशा, आकांक्षा, भयभीती तुला कांही नाही !
शब्द नाही, कुजबुज नाही. किंचाळणं नाही.
काही काही नाही !
आणि घरटं तरी कुठं आहे ?
ह्या इवल्याशा दोन पंखांची फडफड आणि विशाल भयाण
आकाश,
ह्यांचीच तुला सोबत आहे
तरीपण माझं संगीत ऐक. पाखरा तुझे पंख असे मिटू
नकोस !

●

## : ६८ :

अमरत्व कुणालाही मिळालं नाही. कुठलीच गोष्ट
चिरंजीव नाही.
मित्रा, हे जरा आठव आणि आनंदी हो !

ह्या आयुष्याचं ओझं मानू नकोस. हा रस्ता कधीही
संपणार नाही असं समजू नकोस !
कवीला एकच कविता वारंवार रचायची नसते.
नित्य नवीन रचना करायच्या असतात.
फुलं उमलतात आणि कोमेजतात ! म्हणून फुलं
खुडणाऱ्यांनी त्याची खंत करायची नसते !
ह्याची आठवण ठेव आणि मित्रा, आनंदी हो !
संगीतात 'सम' दाखविण्यासाठी "काल" आलाच पाहिजे.
सायंकाळी मलूल झाल्यामुळंच पहाटे आयुष्य नवीन
तजेला दाखवू शकतं !
आपल्या आनंदोत्सवात गर्क झालेल्या प्रेमाला देखील
दुःख पचवून अमर आसू जगाला दाखवावे लागतात !
मित्रा, हे सारं आठव आणि आनंदी हो !

वावटळीनं उडून जाण्यापूर्वी आपण फुलं खुडतो.
क्षणभराकरताच मोहरणारी मोहमयी चुंबनं घेताच आपण
देखील आनंदानं शहारतो !
जीवन अस्थिर आहे. इच्छाशक्ती तीव्र आहे !
कारण वियोगाची वेला झपाट्यानं सामोरी येत असते !
ह्या साऱ्या गोष्टींचं स्मरण कर आणि मित्रा, आनंदी हो !
एखादी गोष्ट मिळवावी, मनसोक्त अनुभवावी आणि
कंटाळून फेकून द्यावी.



इतका वेळ आपल्याला कुठं आहे ?
काळ विलक्षण वेगानं सरकतोय् !
आपली सारं स्वप्नं पदराआड लपवून पळून जातोय् !
आयुष्य फार फार अपुरं आहे आणि त्यात प्रेमासाठी
मिळालेले क्षण फारच कमी आहेत !
परंतु हे प्रेमाचे क्षण नसते तर हे आयुष्य चिघळत
चिघळत संपलं असतं !
ह्या साऱ्या गोष्टी आठव आणि आनंदी हो !

आयुष्याच्या थरथरत्या क्षणांवर नाचतं
म्हणून सौंदर्य मधुर आहे !
पूर्णपणं मिळवणं कधीही शक्य नाही
म्हणून ज्ञान अमूल्य आहे !
ह्या साऱ्यांची सांगता फक्त स्वर्गात प्रभूचरणी होत असते !
पण इथं पृथ्वीवर आपल्या माणसात हे सारे आभास
मृत्यूमुळेच टवटवीत राहतात !
ह्या साऱ्यांची आठवण ठेव आणि मित्रा आनंदी हो !

●

: ६९ :

मी सुवर्णमृगाचा पाठलाग करतोय् ! तुम्हाला गंमत
वाटेल, पण मित्रहो, मला संमोहात पाडणाऱ्या प्रतिबिंबाची
मी शिकार करतोय् !
दऱ्याखोऱ्यातून मी हिंडतोय् ! अपरिचित प्रदेशातून
फिरतोय् ! कारण मला त्या सुवर्णमृगाची शिकार
करायची आहे !
आपला नेहमीचा व्यवसाय तुम्ही पार पाडताहात.
त्याची सुख दुःख, त्यातला आनंद - त्यात तुम्ही दंग
आहात ! पण दिशादिशात मोकळेपणानं हिंडणारं वारं
माझ्या कानात शिरलंय् ! केव्हा; कुठं, कुणास ठाऊक ?
त्याची मला कशाला चिंता ?
माझं घर दार मागंच राहिलं आहे ! केव्हाच,
दऱ्याखोऱ्यातून मी भटकतोय् ! अपरिचित प्रदेशांतून
हिंडतोय् !
कारण मी सुवर्णमृगाच्या मागं लागलो आहे !
त्याची शिकार करायला !

●



: ७० :

मला लहानपणचा एक दिवस आठवतो !
त्या दिवशी मी एक कागदाची नाव केली आणि समोरच्या
डबक्यात सोडून दिली !
आषाढातले ओले दिवस ते. मी एकटाच त्या नावेशी
खेळण्यात गर्क होतो !
एकाएकी आषाढ घनांच्या गर्जना सुरू झाल्या. जलद
भरून आले, वादळ झालं आणि जोराचा पाऊस आला !
अनिर्बंध पाणी वाहू लागलं !
गढूळ, फेसाळ !
आणि त्या पाण्यानं ते डबकं तुडुंब भरलं !
माझी ती नाव त्या ढवळलेल्या पाण्यात बुडून गेली !
मला त्या वादळाचा खूप संताप आला !
त्याला माझा खेळ बंद पाडायचा होता !
माझ्या आनंदावरच त्याचा राग होता !
आणि म्हणूनच त्यानं माझी बोट बुडवली !
माझ्या एकट्याशीच त्याचं शत्रुत्व होतं,
असं मला वाटलं.

आषाढातले ते ओले दिवस आता फार फार मागे
राहिलेत !
जीवनातल्या जुगारात मी हरलो. ते हरलेले दिवस
माझ्याभोवती गर्दी करू लागले आहेत !
माझ्याशी प्रतारणा करणाऱ्या दुर्दैवाला मी नावं ठेवायला
लागलो आहे !
आणि एकदम मला माझी नाव आठवली !
आषाढाच्या पावसाळ्यात डबक्यात बुडालेली माझी नाव
मला आठवली !

●

## : ७१ :

अजून दिवस मावळायचा आहे !
नदीकिनारी भरलेली जत्रा अजून संपायची आहे !
मला वाटलं माझा साराच वेळ फुकट गेलाय्.
माझा सारा पैसाअडका लुटल्या गेलाय् !
पण नाही !
अजून थोडी शिल्लक आहे !
माझ्या दुर्दैवानं मला पूर्णपणं लुटलं नाही !

खरेदी विक्री संपली !
सगळ्यांनी आपली रोकड जमा केली !
मला घरी गेलं पाहिजे.
पण... पण हा कोण ?
चौकीदार ? तू ?
तुला तुझी बक्षिशी हवी आहे ?
घाबरू नकोस, अजून थोडी शिल्लक आहे.
दुर्दैवानं मला अगदीच लुबाडलं नाही !

आभाळ निस्तब्ध आहे. वादळापूर्वीची शांतता आहे !
मला माहीत आहे.
कारण त्यातिथं ढग ओंठगून उभे आहेत !
ही पाण्याची सळसळ त्या वादळाचीच वाट पहातेय्.
आणि मी नदी ओलांडायला झपाट्यानं निघालो आहे !
कोण ? नावाडी ? तुला तुझी मजुरी हवी आहे ?
बरोबर आहे तुझं !
घाबरू नकोस अजून थोडी शिल्लक आहे !
दुर्दैवानं मला अगदीच लुबाडलं नाही !



ह्या रस्त्याच्या कडेला झाडाखाली हा भिकारी बसला आहे !
आशाळभूतपणं पण चाचरल्या नजरेनं तो मला निरखतो आहे !
... अरेरे ! त्याला वाटतं मी खूप मिळकत केली आहे !
बरोबर आहे तुझं - कारण अद्याप थोडी शिल्लक आहे !
दुर्दैवानं मला अगदीच लुबाडलं नाही !
रात्र काजळली !
रस्ता एकाकी आणि भयाण झाला !
काजवे देखील पानापानाआड दडून बसले !
पण चोरपावलांनी माझा पाठलाग कोण करतोय् ?
अच्छा तू ? तस्कर ? तुला मला लुबाडायचंय् !
ये तर मग !
मी तुझी अगदीच निराशा करणार नाही !
— कारण अद्याप थोडी शिल्लक आहे !
दुर्दैवानं मला अगदीच लुबाडलं नाही !

आणि मध्यरात्र झाली तेव्हा मी घरी पोहोचलो.
अगदी रिक्त हस्तांनी !
चिंताग्रस्त नेत्रांनी तू माझी वाट पहात जागत बसली आहेस !
शांतपणं !
मला पाहताच आनंदातिशयानं तू मला मिठी मारलीस !
एखाद्या भित्र्या पक्षाप्रमाणं !
ओहोहो !
अजून सगळंच शिल्लक आहे !
दुर्दैवानं मुळी मला लुटलंच नाही !!

●

## : ७२ :

कित्येक दिवस रात्री खपून मी एक मंदिर उभारलं !
चिरेबंद फत्तरानं त्याच्या भिंती आणि घुमट बनवला होता !
त्याला दारं खिडक्या काहीच नव्हत्या !

मग मला सगळ्या गोष्टींचा विसर पडला !
जणू सर्व जगापासून दूर त्या मंदिरात
मी स्वतःला कोंडून घेतलं !
आणि अत्यंत समाधानानं प्राणप्रतिष्ठा केलेल्या त्या
मूर्तीकडं कैक वेळ नंतर मी पहात असे !
मंदिरात अहोरात्र काळोख असे. कोपऱ्यात लावलेला
नंदादीप आत शांत प्रकाश पाडत असे !
त्या दीपातून निघालेल्या दाट धूम्रवलयांमध्ये
माझं हृदय गुंतून पडत असे !
आलोचन जाग्रण करून मंदिरातल्या भिंतीवर मी
चित्रविचित्र आकृती काढल्या.
पंख फुटलेले घोडे, मनुष्याचा चेहरा असलेली फुलं,
सर्पाकृती बाहू असलेल्या स्त्रिया !
बाहेरच्या जगातलं संगीत आत येण्याला जागाच नव्हती.
पक्षांचा किलबिलाट, पानांची सळसळ,
बाहेरील जगाचा गजबजाट,
– त्या चिरेबंदी भिंतीतून त्याचा लवलेश
सुद्धा आत येत नव्हता !
मी म्हणत असलेले मंत्र आणि त्यांचा प्रतिध्वनी



ह्याशिवाय दुसरा कुठलाच ध्वनी आत शिरत नव्हता !
माझं चित्त ज्योतीसारखं स्थिर आणि एकाग्र झालं,
भावना आनंदानं उद्दीपित झाल्या.
काळ कसा गेला मला कळलंच नाही !
आणि एक दिवस त्या मंदिरावर वीज कोसळली !
त्याचं शल्य माझ्या हृदयाला जाणवलं !
घुमट फोडून आत घुसलेल्या प्रकाशासमोर नंदादीप
शरमेने पांढरा फटफटीत पडला !
भिंतीवर चितारलेली चित्र
एखाद्या स्वप्नमालिकेप्रमाणे एकमेकांकडे आश्चर्यमुग्ध पाहू लागली,
कारण त्या प्रकाशात त्यांना लपणं शक्य नव्हतं !
आणि मी त्या प्राणप्रतिष्ठा केलेल्या मूर्तीकडं बघितलं !
तिच्या चेहऱ्यावर मधुर हास्य दिसलं !
परमेश्वराच्या स्पर्शानं तिला जिवंतपणा आला होता !
मी बंधनात जखडून ठेवलेली रात्र
पंख पालवून निघून गेली होती !

●

## : ७३ :

चिरशालीन वसुंधरे,
ही अमाप संपत्ती तुझी नाही !
अपरिमित श्रम करून आपल्या मुलांना
तू घास भरवण्याचा प्रयत्न करतेस,
पण धान्याची नुपूर अखेरपर्यंत जाणवते !
ह्या आनंदाच्या देणग्या तू आम्हाला देतेस.
– त्या कधीही परिपूर्ण असत नाहीत.
आपल्या लहानग्यांसाठी तू तयार केलेली खेळणी
तकलादू असतात !
आमच्या साऱ्याच आशाआकांक्षा
तू कधीच पूर्ण करू शकत नाहीस,
आणि म्हणून मी तुला झिडकारावं ?
- छे ! तुझ्या नेत्रातलं हास्य पाणावलेलं असलं तरी
मला मधुरच वाटतं.
नेहमीच अपुरं वाटणारं तुझं प्रेम
माझं हृदय हेलावून जातं !
आपल्या स्तनांतून आम्हाला तू जीवन दिलंस -
अमृत नाही - आणि म्हणूनच



तू नेहमी जागरूक असतेस !
अनंत कालापासून तू संगीतानं स्वर्ग रंगवायचा प्रयत्न करतेस -
ते कार्य अजून तसंच आहे !
त्याबद्दलचा हव्यास फक्त भासतो प्रत्येक वेळी !
तुझ्या सौंदर्यनिर्मितीवर अश्रूंचं धुकं पसरलं आहे
तुझ्या क्षीण झालेल्या अंतःकरणात मी माझं संगीत
ओतीन, तुझ्या प्रेमात माझं प्रेम मिसळून टाकीन.
श्रम करून मी तुझी पूजा बांधीन.
तुझं नाजूक शालीन रूप मी बघितलं आहे.
– वसुंधरे... आणि हुंदके देणारी धरा पण पाहिली आहे.
माझी मृत्तिकाभूमी !

●

## : ७४ :

विश्वाच्या प्रेक्षागारात साधं गवताचं पातं सूर्यकिरणांच्या
आणि ग्रहताऱ्यांच्या तेजाशेजारी बसतं.
त्याचप्रमाणं माझं गीतदेखील जनता जनार्दनाच्या हृदयात
आषाढघनांच्या गडगडाटाबरोबर विराजतं !
पण सुवर्णपूजका, तुझ्या श्रीमंतीला भास्कराच्या
सुवर्णशलाकेबरोबर किंवा चंद्राच्या रुपेरी किरणांसमवेत
कधीही स्थान मिळणार नाही !
त्या अनंत निळाईचे आशीर्वाद तुला कधीही मिळणार नाहीत.
कारण त्यांना तुझ्या श्रीमंतीचं कधीहि दर्शन होत
नाही !
आणि म्हणून जेव्हा मृत्यू समोर उभा ठाकतो तेव्हा तुझी
श्रीमंती भीतीनं पांढरी-फटक पडते !
वृक्षाप्रमाणे उन्मळून मातीमोल होते !

●



## : ७५ :

संन्यास घेण्याचा निश्चय करून त्या रात्री तो म्हणाला -
"माझं घर, मुलंबाळं सोडून संन्यास घेण्याची हीच वेळ आहे !
मी परमेश्वराला शोधून काढीन !
इतके दिवस मायापाशात कुणी मला जखडून ठेवलं ?"
"मी" परमेश्वर हळूच पुटपुटला
- पण तोवर त्याचे कान बंद झाले होते !

आईचे स्तनपान करत लहान्याला झोप लागली होती !
त्याला त्रास होऊ नये म्हणून अंगाचं मुटकुळं करून
त्याची आई झोपली होती !
त्यांच्याकडे पहात तो म्हणाला -
"'मला मोहपाशात गुंतवणारे तुम्ही कोण ?"
"ती माझीच रूपं आहेत" तोच आवाज पुन्हा आला.
पण त्याला ऐकू आलं नाही !

आणि ते मूल स्वप्नात किंचाळून आईच्या हृदयाला बिलगलं -
अर्धवट झोपेत आईनं त्याच्या पाठीवर
अलगद हात ठेवला !
तिकडे लक्ष न देता तो भावी संन्याशी
उठून चालू लागला.
–परमेश्वर ओरडला – "मूर्खा थांब. आपलं घरदार
सोडून जाऊ नकोस !" पण त्यानं ऐकलं नाही.
खिन्नपणे सुस्कारा सोडून परमेश्वर म्हणाला -
– "माझ्यापासून दूर जात मला शोधायचा प्रयत्न कसा
यशस्वी होणार ?"

●

## : ७६ :

देवळासमोर जत्रेची गर्दी जमली होती !
- तोबा गर्दी. दिवसभर पावसाची रिप्‌रिप्‌ चालूच होती !
आता आता संध्याकाळी पाऊस थोडा थांबला होता !
गर्दीला अगदी उधाण आलं होतं !
नुसता निर्भेळ आनंद त्या गर्दीत मिसळला होता !
प्रसन्नता विराजत होती !
- पण ह्यापेक्षाही जास्त आनंद झाला होता
त्या छोट्या मुलीला !
कारण एका पैशाची पानाची पिपाणी
तिनं जत्रेत घेतली होती !
त्या आनंदाच्या भरात ती सारखी पिपाणी वाजवत होती !
त्याचा कर्कश आवाज आनंदानं दुथडी भरून
जत्रेतल्या कल्लोळावर ताण करत होता !

जत्रेतली गर्दी वाढतच होती. त्यांची बडबड...
आरडाओरड.... सगळाचं कल्ला ! रस्त्यानं चिखल...
समोरच्या शेतात पाणी साचलं होतं !
आणि शेजारची नदी पुराचं लाल गढूळ पाणी
आरडाओरड करत वाहून नेत होती !
- कारण त्या पाण्याला देखील जत्रेत भाग घ्यायचा होता
- म्हणून ते ओरडत आपलं दुःख व्यक्त करीत होतं ! पण
ह्या सर्वांपेक्षा त्या छोट्या मुलाचं दुःख फार मोठं होतं !
रंगीत चक्री घ्यायला त्याच्याजवळ पैसा नव्हता !
आपल्या आसुसल्या नजरेनं तो वळून वळून, पुन्हा पुन्हा
पहात होता !
त्यापुढं ही जत्रेतली गर्दी किती केविलवाणी दिसत होती !!

●



## : ७७ :

आमच्या वस्तीतला एक मजूर आणि त्याची बायको
विटांसाठी माती गोळा करायला नदीवर रोज जात असत.
त्यांच्याबरोबर त्यांची लहान मुलगी पण जायची.
वस्तीतली भांडी घासण्याचं तिचं काम
अव्याहत चालू असायचं.
डोक्याचा गोटा केलेला, उन्हात काळवंडलेला आणि
सदैव मातीनं बरबटलेला तिचा दोन वर्षांचा छोटा भाऊ
तिच्या आसपास घुटमळायचा !
काम झालं की ती मुलगी डोक्यावर पाण्याचा माठ ठेवायची,
एका बाजूला कमरेवर टोपलीत घातलेली;
लख्ख घासलेली पितळेची भांडी घ्यायची आणि दुसऱ्या
हातानं धरून आपल्या लहान भावाला घेऊन यायची.
इतक्या लहान वयात सुद्धा जबाबदारी ओळखून घरातली
सगळी लहान मोठी कामं ती लहानगीच बघायची.
तिचे आईवडील आपल्या कामात गर्क असायचे.
घराचा सगळा बोजा त्या लहान मुलीवर सोपवून !

एक दिवस नेहमीप्रमाणं काम करत असतांना मी सहज
तिच्याजवळ जाऊन आडोशाला उभा राहिलो. तो छोटा
मुलगा पाय लांब करून उघडा नागडा मातीत खेळत
बसला होता.
त्याची बहीण एक तांब्या हातात फिरवून फिरवून घासत
होती.
त्या तांब्याचा, तिच्या बांगड्यांचा आणि हालचालीचा एक
मोहक आवाज येत होता !
शेजारी नदीकिनाऱ्यावर त्यांच्या पाळलेल्या बकरीचं एक
छोटं गुबगुबीत पिल्लू चरत होतं !
त्या छोट्या मुलाजवळ ते पिल्लू आलं
आणि त्याला काय वाटलं कुणास ठाऊक.
त्याच्या कानाजवळ एकदम ओरडलं !
मुलगा दचकला आणि मोठमोठ्यांदा रडायला लागला.
हाताला तांब्या तसाच टाकून ती मुलगी धावली !
कडेवर एकीकडे आपल्या भावाला घेतलं
आणि दुसरीकडे त्या कोकराला बसवलं.
त्या पिल्लाची आणि आपल्या भावाची बोबड्या बोबड्या
भाषेत समजूत घालू लागली.
आपल्या स्नेहाची भाषा त्या जनावराच्या आणि माणसाच्या
पिल्लावर सारख्याच मायेने धरू लागली !

मला उगीचच ओशाळल्यागत झालं !

●



## : ७८ :

उन्हाळ्याचे दिवस होते. रखरखलेली दुपार लांबण
लावल्यासारखी भासत होती. तहानलेल्या जमिनीला
मोठमोठ्या भेगा पडल्या होत्या. माझ्या खोलीत मी
पुस्तक वाचत बसलो होतो !
आणि नदीकिनारी घातलेली साद मला ऐकू आली -
" ये राणी ! इकडं ये !"

हातातलं पुस्तक मिटून मी खिडकीतून पाहिलं.
चिखलाने बरबटलेली एक अवाढव्य म्हैस मला दिसली.
शांत, भावनारहित डोळ्यांनी ती बघत होती आणि दहा
बारा फुटांवर गुडघाभर पाण्यात उभं राहून तरुण गुराखी
त्या म्हशीला स्नानासाठी साद घालत होता -
- "राणी इकडे, माझ्याजवळ ये !"
मला थोडी गंमत वाटली,
हृदयाला गोड गुदगुल्या झाल्या !

●

## : ७९ :

पुष्कळदा आश्चर्य वाटतं की माणसाच्या आणि मूक प्राण्याच्या हृदयाला विभागणाऱ्या रेषा कुठं दडल्या असतील बरं ?
स्वर्गात कुठल्यातरी अनामिक ठिकाणी त्या रेषा पुन्हा एकमेकात विलीन होऊन जात असतील का ?
वेगवेगळी रूपं धारण करून जरी ही हृदयं पृथ्वीतलावर वावरत असतील तरी त्यातली एकतानता भंगेल असं वाटत नाही !
कदाचित्, म्हणूनच, कधीकाळी शांतवेळी त्यांच्या हृदयातली एकतानता जागी होते आणि तो मूक प्राणी प्रेमार्द्र लोचनांनी माणसाच्या डोळ्यात खोल खोल पाहतो. आपला त्याच्यावरला विश्वास प्रगट करतो, आणि भावनेनं भरलेल्या डोळ्यांनी माणूस त्याला कुरवाळतो.
आपापल्या बाह्य स्वरूपासकट दोघं एकमेकांजवळ येतात.
वरच्या वृथा आवरणासकट एकमेकांशी कुजबुजतात !

●



## : ८० :

कवीच्या काव्यसंभाराचा आपल्या एका दृष्टिपाताबरोबर तू
परामर्ष घेतेस,
पण स्त्रिये, त्यांनी केलेल्या स्तुतीकडं मात्र तू
जाणून बुजून पाठ फिरवतेस,
म्हणून मी तुझा भाट झालो आहे !

जगातल्या साऱ्या मग्रूर, ताठ शक्ती तू आपल्यासमोर
वाकवू शकतेस.
पण प्रसिद्धीपराङ्मुख असलेल्या आपल्या प्रियतमाबद्दल
तुझ्या मनात केवळ भक्तिभावच असतो -
आणि म्हणून मी तुझा पूजक बनलो !
आपल्या परिपूर्ण हस्तकौशल्यानं विश्वाच्या सौंदर्याला तू
झळाळी आणू शकली असतीस पण ते हात आपलं
घरकुल रमणीय ठेवण्यातच कार्यमग्न ठेऊन स्वतःला
धन्य मानतेस
आणि म्हणून मला आश्चर्यमुग्ध आनंद होतो.
तुझ्या मनाच्या मोठेपणाचा मी साक्षी होतो !

●

: ८९ :

मृत्यो !
तू असा हलक्या आवाजात माझ्या कानातच कां बरं
कुजबुजतो आहेस ?
सायंकाळी फुलं कोमेजून गळून पडतात.
पाखरं आपापल्या घरट्यात परततात
तेव्हा तू देखील हळूच माझ्याशेजारी येऊन बसतोस
आणि आपल्या गूढ भाषेत माझ्याशी बोलतोस !
मला ते समजत नाही !

तू असाच हळुवार बोलून, गुणगुणून, मोहमयी चुंबनात
फसवून मला जिंकणार आहेस ?
प्रियाराधन असंच कुजबुजत चालवणार आहेस ?
आपलं लग्न दुमदुमणार नाही ?
तू मला मुंडावळ्या बांधणार नाहीस ?



आपल्या लग्नात तुझ्याकडचे वऱ्हाडी येणार नाहीत ?
आपल्या लग्नोत्सवाबद्दल नृत्य, गायन,
दिव्यांची रोषणाई होणार नाही ?
तुझी वाट पहात मी जागरणं करत असतांना
तू वाजत गाजत मिरवणूक काढत यावंस असं मला वाटतं !
मला लग्नाचा पोशाख तू आपल्या हातानं चढवावास,
माझा हात तू सर्वांच्या समोर हातात घ्यावास !
आपल्या वरातीसाठी तुझा रथ माझ्या
घराशी सज्ज असावा !
त्याला जुंपलेले घोडे निघण्यासाठी चुळबुळ करीत
असावेत !
मोठ्या अभिमानानं माझ्या डोक्यावर ओढून धरलेला -
लाजेनं थरथरणारा पदर तू बाजूला सारावास
आणि अशा थाटामाटानं मृत्यो, तुझं आणि माझं मीलन
व्हावं असं मला वाटतं !

●

## : ८२ :

आम्ही आज मृत्यूचा खेळ खेळणार आहोत -
- मी आणि माझी प्रिया !

रात्र काजळली आहे.
आकाशातले मेघ अक्राळविक्राळ आकार घेत भयानकता
वाढवताहेत !
समुद्रावरच्या लाटा आक्रोश करताहेत !
स्वप्नाळलेली रात्र तुडवून घर सोडून
आम्ही दोघं बाहेर पडलो आहोत !
- मी आणि ती -

लाटांची गंमत पहात ह्या समुद्रकिनारी आम्ही बसलोय्.
समोर समुद्रावर विराट वादळ हेलकावतंय्.
आम्हाला साद घालतंय् !
तिला गंमत वाटते - भीती पण वाटते !
आणि मग दचकून माझ्या हृदयाला बिलगते !
एखाद्या भित्र्या पक्षाप्रमाणं !
आजपर्यंत मी तिला काळजीपूर्वक जपलं !
पुष्पशय्येवर निजवलं,
दरवाजे बंद करून डोळे दिपवणारा प्रकाश शांत केला !
चुंबनांचा वर्षाव केला
- प्रीतीचं गुंजन केलं. प्रेमातिशयानं ती बेहोष झाली !



त्या माधुर्याच्या अनंतात ती विलीन झाली !
पण आज ती शांती ढळली आहे !
ह्या वादळानं आम्हाला साद घातली आहे !
माझी प्रिया थरारली !
माझा हात हातात घेऊन ती बाहेर पडली,
ह्या वादळाची साद ऐकून !
तिचा केशसंभार वाऱ्याशी झपाटतोय् !
पदर फडफडतोय् !
माळलेली मोगऱ्याची वेणी अल्लडपणे नाचतेय् !
मृत्यूनं घातलेली साद तिला वास्तवात आणून सोडतेय् !
आम्ही एकमेकांसमोर उभे आहोत !
एकमेकांच्या हृदयाला आसरा देत !
मृत्यूचा खेळ खेळायला सज्ज आहोत
मी आणि माझी प्रिया !

●

## : ८३ :

त्या छोट्या छोट्या टेकड्यांच्या पायथ्याशी, खळखळून वाहणाऱ्या निर्झराशेजारी, भातशेतीच्या पलिकडे, आणि उंच उंच वाढलेल्या, देवदारानं वेढलेल्या झोपडीत ती रहात होती.
आजूबाजूच्या बायका झऱ्यावर येत, आपल्या घागरी भरत.
वाटेचे वाटसरू त्या झऱ्याच्या शेजारी बसून आपल्या प्रवासाचा शीण घालवत. ती दिवसभर शेतात काम करी आणि त्या झऱ्याच्या खळखळाटीच्या सुरात गोड गाणं गात स्वतःची करमणूक करी.

एक दिवस त्या टेकडीपलिकडच्या गावाचा एक प्रवासी आला. त्याच्या केसांच्या जटा होऊन त्याच्या गालावरल्या दाढीमिशात मिसळून गेल्या होत्या !
आश्चर्यानं आम्ही एकमेकांना विचारलं
पण कुणाला काहीच माहीत नव्हतं !
त्याला विचारलं तर तो न बोलता फक्त तिच्या झोपडीकडं पहात, झऱ्यात पाय सोडून बसला !
भीतीनं आमच्या हृदयाचा थरकाप झाला !
आणि दिवस बुडताच आम्ही घरी परतलो !

दुसऱ्या दिवशी पहाटे आजूबाजूच्या बायका पाणी भरायला झऱ्यापाशी आल्या.
तिच्या झोपडीची दारं उघडी दिसली ! तिचा आवाज आला नाही !
किंवा तिचा हसरा चेहरा कुणाला दिसला नाही !
तिची रिकामी घागर कलंडून पडली होती, आणि



कोपऱ्यातली पणती जळून जळून शांत झाली होती !
पहाट उमलण्यापूर्वीच ती कुठं निघून गेली होती कुणास ठाऊक ?
.... आणि कालचा तो प्रवासी पण कुठं दिसेना !

कालचक्र फिरत होतं.
वैशाखात ऊन तापू लागलं आणि पलीकडल्या
टेकडीवरचं बर्फ वितळून आलेल्या झऱ्याच्या थंडगार
पाण्यात पाय सोडून आम्ही बसलो होतो. एकाएकी
आम्हाला तिची आठवण झाली
आणि आमचे डोळे पाणावले !
"खरंच कुठं बरं गेली असेल ती ?
तिथं असा झरा असेल ?
असं आकाश असेल ?
- आणि ही अशी सुपीक जमीन ?
आणि आपण कधीही पार न केलेल्या टेकड्यापलीकडे
जमीन, असं पाणी असेल ?" अशा कितीतरी गोष्टी
आम्ही बोलत होतो !
त्या वैशाखीच्या रात्री पश्चिमेकडून गार वारा वहात होता.
तिच्या वैराण झालेल्या झोपडीत मी बसलो होतो !
कोपऱ्यातली विझलेली पणती पुन्हा कधीच लागली नव्हती

आणि एकाएकी नाटकातलं दृश्य बदलावं
तशा पलिकडल्या टेकड्या नाहीशा झाल्या
आणि त्या धुक्यातून ती मला येताना दिसली.
मला आनंद झाला -
"कशी आहेस बेटा तू ? सुखी आहेस ना ?....

पण खरंच तिथं हा झरा, ही शेतं, हे आकाश आहे का गं ?"
"आहे तर" ती उत्तरली
- "हेच आकाश तिथं अनिर्बंध झालंय्
आणि हाच झरा नदीच्या रूपानं विशाल झाला आहे !
ह्याच जमिनीची मोठमोठी मैदानं झाली आहेत !
इथलं सगळं तिथं आहे !"
आणि सुस्कारा टाकून मी म्हणालो
- "तिथं सगळं काही आहे - आम्ही सोडून !
हो ना ?"
करुणार्द्र लोचनांनी ती हसली अन् म्हणाली
- "तुम्ही पण आहात, पण माझ्या हृदयात !"
आणि एकदम मला जाग आली !
मध्यरात्र झाली होती !
बाजूचं रान सुस्कारे टाकत होतं
आणि झऱ्याची नेहमीची बडबड चालू होती !

●



## : ८४ :

आसमंत पसरलेल्या हिरवळीवर
पिवळसर ओंब्या विखुरल्या आहेत.
त्यांना डोलावत श्रावणमेघांची छाया धावते आहे
आणि ही प्रकाशशलाका
त्यांचा पाठलाग करते आहे !
ही गंमत बघून मधुप मध चारवायचं विसरून नुसतंच
गुंजारव करत इतस्ततः धावताहेत.
नदीच्या काठाजवळ थांबून
बदकं देखील उगाचच पंखांची फडफड करताहेत !
ही गंमत एकमेकांना कुजबुजून सांगताहेत !
मित्र हो,
आज कुणीही घरी जाऊ नका,
कुणीही कामावर जाऊ नका !
ह्या अनंताच्या निळाईचं आपण मनसोक्त
प्राशन करू या !
कानात वारंशिरल्यागत इतस्ततः धावू या !
पूर आलेल्या पाण्यावर खळखळणाऱ्या फेसाप्रमाणं
सारीजण खळखळून खिदळू या !
निरर्थकाशी खेळत, अनिर्बंध हसत
निरर्थक गीतं गाऊ या !
आज कुणीही घरी जाऊ नका.
मित्रहो,
कुणीही कामावर जाऊ नका !

●

## : ८५ :

कोण आहेस तूं ?
पुढल्या शतकातल्या माझ्या वाचका –
वसंतातल्या बहरलेल्या ताटव्यातून एखादं फूलसुद्धा
मला पाठवता येत नाही !
प्रकाशाची सुवर्णशलाका सुद्धा नाही !
कारण हा काळाचा प्रचंड मेघ
आपल्यामध्ये वावरतो आहे !

पण आपल्या घराचे दरवाजे उघड
आणि क्षणभर बाहेर बघ !
तुझ्या उद्यानात बहरलेला फुलांचा ताटवा
सुगंधानं भरला आहे !
मागल्या शतकातल्या आठवणींचा ताटवा आहे तो !
आणि आनंदानं दुथडी भरून तुझं हृदय एकाएकी गाऊ
लागेल -
- शंभर वर्षापूर्वी एका कवीनं
अशाच एका वसंती केलेल्या काव्याचे ते शब्द असतील.
त्या कवीचाच तो अनुभव असेल !

●



# गीतांजली–इंग्रजीवरून

Gitanjali ह्या इंग्रजी काव्यसंग्रहाचा मराठी भावानुवाद



– राम म्हैसाळकर

"नैवेद्य", "खेया" आणि "गीतांजली" ह्या तीन काव्यसंग्रहातल्या काही कवितांचे हे भाषांतर. अधुन मधुन मासिकांत प्रसिद्ध झालेल्या तुरळक कवितादेखील ह्यात अंतर्भूत केल्या आहेत.

(Gitanjali ह्या पुस्तकांत शेवटी स्वतः टागोरांनी दिलेली टीप)

श्री. अप्पासाहेब जहागीरदार
आणि
श्री. अण्णासाहेब काळवीट
ह्यांच्या
सर्वसमावेशक वृत्तीला

– राम म्हैसाळकर

## : १ :

प्रभो,
मला अनंतानं अलंकारण्यात तुला आनंद वाटतो.
ठेचाळलेला; चेपलेला हा घट रिकामा करून
त्यात तू नित्य नवजीवन ओततोस.
ही एकसुरी इवलीशी निर्जीव बांसरी,
मोठ्या आनंदात दऱ्याखोऱ्यांत नेऊन
त्यांतून नवनवीन सुरेल स्वर काढतोस;
तुझ्या अमर करस्पर्शानं माझं हे चिमुकलं
हृदय आनंदानं दुथडी भरून वाहू लागतं
आणि न कळत
त्यातून मूक संगीत स्रवू लागतं !
प्रभो, तू मला प्रेमानं देणग्या देतोस
त्यासाठी मी हे छोटे छोटे हात पसरतो.
तू देतोस आणि मी स्वीकारतो...
युगामागून युगं पाठलाग करत निघून जातात.
आणि तरीही तू पाठवलेल्या अनंत भेटी स्वीकारूनही
ह्या चिमुकल्या हातावर अजूनसुद्धा अमाप जागा आहे !!

●

: २ :

तूं मला गीत गायची आज्ञा करतोस !
माझं हृदय अभिमानानं दुथडी भरून वाहू लागतं.
गोंधळून जाऊन मी तुझ्या मुखकमलाकडे टकमक बघत बसतो.
आणि हृदयांतला आनंदाचा पूर
दुथडी भरून माझ्या डोळ्यांवाटे वाहू लागतो !
माझ्यांतला सारा कठोरपणा आणि दुष्टपणा वितळून जातो.
आणि त्यातून एक सुखद संवेदना निर्माण होते.
आनंदाच्या असीम आवेगांत माझी कल्पनाशक्ती बेहोषपणं
विहरणाऱ्या विहंगावत् आपले पंख पालवते !
माझं गाणं तुला आवडतं ह्याचा मला अभिमान वाटतो.
प्रभो, मला माहीत आहे, एक गायक म्हणूनच तुझ्या
पदारविंदाशी मी पोहचू शकतो. माझ्या गायनाशिवाय दुसरं
माझ्याजवळ काहीही नाही. मी गायक नसतो तर तुझ्या
सन्निध येण्याची माझी पात्रता तरी होती का ?
आणि गायनाच्या बेहोष धुंदीत, प्रभो -
- तू स्वामी असूनसुद्धा, सखा म्हणून तुला संबोधतो !

●



: ३ :

तुझं गायन म्हणजे कधी न उकलणारं गूढ वाटतं मला,
आणि मग विचार करायचा सोडून मी तासन् तास ते
आश्चर्यमुग्ध होऊन ऐकतच बसतो.
तुझ्या गीताच्या दीप्तीनं सारं विश्व उजळलंय्.
त्या संगीताची संजीवनी
साऱ्या संसाराला सामाऊन घेतेय्.
तुझ्या आलापाचा पवित्र ओघ वाटेतल्या पाषाणांना
चुकवत सारखा पुढे धाव घेतोय्.
आणि हे पाहून मला वाटतं आपण देखील त्यांत भाग
घ्यावा.
मुखावाटे शब्द फुटतात पण ते गानरहित असतात.
मी विनाकारणच धडपडतो.... अन् शेवटी निराश होऊन
एकांतात अश्रू ढाळत बसतो.
खरोखर मला कधीच नाही का जमणार ?
परमेश्वरा,
तू माझं हृदय जिंकलय्स्.
स्वत्व विसरायला लावलय्स्.
आपल्या संगीतानं मला आपलंसं करून घेतलय्स् !!
आपल्या संगीताच्या जाळयात मला पुरतं गुरफटून
टाकलंय्स्.

●

## : ४ :

माझ्या जिवलगा, तुझ्या पावन स्पर्शानं माझं शरीर
पुलकित झालं आहे.
ह्या एका भावनेनं मी ते शक्य तितकं पवित्र राखण्याचा
प्रयत्न करीन !

परमेश्वरा, माझ्या मानसमंदिरातला विचारांचा नंदादीप तू
आपल्या चिरकालीन सत्यानं प्रज्वलित केला आहेस.
ह्याच जाणिवेनं विश्वातल्या असत्याच्या झंझावातापासून
मी त्यांचं संरक्षण करण्याचा आटोकाट प्रयत्न करीन.

माझ्या हृदयाच्या गाभ्यांत तुझं आसन आहे.
त्या माझ्या प्रेमाला मी फुलाप्रमाणं जपेन !
आणि जगांतल्या साऱ्या दुर्गुणापासून तुझ्या आसनाचं
संरक्षण करीन !

प्रभो कर्तासवरता सर्वं काही तूच आहेस
ह्या एकाच कल्पनेनं माझ्या कृत्यात मी तुझं प्रतिबिंब
झेलीन.
तूंच माझा वाटाड्या आहेस !!

●



## : ५ :

तुझ्या संगतीत फक्त एक क्षण मला घालवू दे.
माझ्यापुढचा कामाचा डोंगर मी तेवढ्यापुरता बाजूला
सारीन.
परमेश्वरा, तुझं मुखकमल क्षणभर जरी दृष्टीआड झालं
तरी मला अस्वस्थ वाटतं आणि लांबलचक वाळवंटातून
प्रवास केल्यागत, किंवा किनारा नसलेल्या अथांग
दर्यातल्या होडीवत् मी कधी न संपणाऱ्या कामांत
धडपडतो.
बहरलेल्या फुलांवर बागडत मधुप वसंत आल्याचं
सांगतोय् !
अशावेळी शांतपणानं तुझ्या समोर बसावं आणि माझी
अपुरी गीतं तुला ऐकवत उरलेलं आयुष्य तुला अर्पण करावं,
असं मला वाटतं.

●

## : ६ :

तुझ्या हातानं हे चिमुकलं फूल तू खुडावंस,
उशीर करू नकोस नाहीतर कदाचित् हे कोमेजून गळून
पडेल नि मातीमोल होईल !
कदाचित् त्याला तुझ्या वक्षस्थलावर डौलानं रुळणाऱ्या
सुमनमालेत स्थान मिळणार नाही.
तरीपण प्रभो तुझ्या स्पर्शसुखांत खुडल्याजाण्याचं दुःख
त्याला विसरू दे.
प्रभो, त्वरा करा.
मला भीति वाटू लागली आहे.
कदाचित् सूर्यास्त होऊन जाईल....
तुझ्या पूजनाची वेळ संपून जाईल....
आणि हे पुष्प न खुडता तसंच राहील....
त्याचं आयुष्य मातीमोल होईल !!

होय ! ह्याचा रंग आकर्षक नाही.... गंध देखील मनोहारी
नाही. हे मला माहीत आहे. तरीपण प्रभो तुझ्या सेवेतच
त्याच्या जीविताची समाप्ती होऊ दे !

....अजून तुझ्या पूजनाला थोडा अवधी आहे. तेवढ्यातच हे
चिमुकलं पुष्प.... पतितपावना.... आपल्या करकमलानं
खुडावंस !

●



## : ७ :

माझ्या गीतांनी तिला निरलंकार केलं आहे !
आता तिला नटण्या मुरडण्याची हौस राहिलेली नाही.
तुझ्या नि माझ्या मीलनांत येणारा
हा दागिन्यांचा सोस काय कामाचा ?
त्याच्या आवाजांत तुझं मंजुळ कूजन
लोपून जातं, मग काय त्याची किंमत ?
प्रभो, तुझ्या ओझरत्या दृष्टीक्षेपाबरोबर
माझ्यातला 'मी'पणा जळून खाक होतो !
कवीन्द्रा ! मला तुझ्या चरणारविन्दापाशी बसू दे !
माझ्या आयुष्यातला साधेपणा दे.
एखाद्या साध्या पाव्यातून विश्व नाचायला लावणारं
अमर संगीत तू काढू शकतोस !
तसंच माझ्या ह्या साध्याभोळ्या शरीरातून देखील अमर
संगीत घुमव !
एवढंच माझं मागणं आहे !!

●

## : ८ :

उंची कपडे नि दागदागिने घातलेलं मूल !
प्रत्येक वेळी त्याला आपल्या जाम्यानिमाला जपावं लागतं !
प्रत्येक वेळी माती लागून कपडे नि दागिने
खराब होतील म्हणून खेळकर विश्वापासून ते अलिप्त
राहू इच्छितं !!
आई, हा जामानिमा त्याला आपल्या मातृभूमीच्या कुशीतून
बाहेर खेचत असेल....
सर्वसामान्य जीवितोत्सवातून जबरदस्तीने ओढून नेत असेल
तर तो काय कामाचा ?

●

## : ९ :

स्वतःच स्वतःच्या मार्गात अडथळे आणणं,
स्वतःच स्वतःकडं भीक मागायला जाणं,
ह्याशिवाय दुसरा मूर्खपणा कुठला ?
सारा भार त्या विश्वपालकावर सोपवावा...
त्याबद्दल कधीहि पश्चात्ताप करावयाचं कारण नाही.
इच्छा.... लोभ.... ह्यांच्या वावटळीत
नंदादीप कधीच प्रज्वलित राहणार नाही !
हा अपवित्रपणा आहे.
ह्या अपवित्र,
कलंकित झालेल्या हातावर
प्रभूचा प्रसाद कधीच घेतायावयाचा नाही....
लोभ धरू नकोस....
प्रेमाने मिळेल तेवढंच स्वीकार !
फक्त तेवढंच !!

●

## : १० :

ह्या हीन दीन अन् निराश्रितांच्या सहवासांतच प्रभो,
तू आपलं आसन मांडलं आहेस !
मी तुझी पूजा करतो.... प्रार्थना करण्यासाठी हात जोडतो.
पण ती प्रार्थना तुझ्या कानापर्यंत पोहोचू शकत नाही.
कारण
ह्या हीन दीन अन् निराश्रितांच्या सहवासातच तू तल्लीन
झाला आहेस.
आणि त्यांच्यात मिसळायला मला कमीपणा वाटतो !

अंगावरच्या चिंध्या धुळीनं माखलेल्या दरिद्री नारायणाच्या
समवेत तू आनंदानं बेहोष होऊन नाचत असतोस
आणि तिथं यायला निघालेलं माझं पाऊल
माझा अभिमान अडकवून ठेवतो.
पतितांच्या पावका, निराश्रितांच्या आधारा,
तुला प्रसन्न करण्यासाठी धडपडणारं अंतःकरण
तुला भेटायला त्या दीन दुबळ्यांच्या सहवासात मात्र येऊ
इच्छित नाही.
आणि अशामुळं आपली प्रार्थना ओंजळीत घेऊन नुसतंच
तिष्ठत उभं असतं !!
तुझं आसन मात्र हीन दीन आणि पतितांच्या सहवासांत
स्थिर झालं आहे !!

●



## : ११ :

हे काय आरंभलं आहेस तू ?
हे टाळ, हे मृदंग, गीत, संगीत ?
हे आहे काय ?
ही दारं कशासाठी बंद केली आहेस ?
आणि अशा अंधारात, कुणाचं स्मरण चालवलं आहेस ?
परमेश्वराचं ?
जरा डोळे उघडून बघ.... नीट पहा !
तुझा प्रभू आहे तरी कां तुझ्यासमोर ? मग ?

.... त्या तिकडं पहा.
सकाळपासून संध्याकाळपर्यंत आपल्या कामांत गढलेल्या
लाकूडफोड्याकडं पहा !
त्या पाथरवटाकडं बघ !
त्या लोकांच्या संगतीत तुझा प्रभू रमला आहे !
त्यांची आभरणं घामानं व धुळीनं माखली आहेत.
दिनरात ऊन पावसात तो हिंडतो आहे !
ह्या मंदिरांत तो शिल्लक तरी आहे का ?
इथं कुठं त्याला शोधतो आहेस ?
हा तुझा नंदादीप मालवून टाक.
तुला तुझा प्रभू हवा आहे नं ?
मग त्याच्यासारखा तू देखील बाहेर पड.
ऊन पावसांत त्याला शोधून काढ !!

– मोक्ष ? कुठला आला आहे मोक्ष ?
आपल्या प्रभूनं आपणहून ही उद्योगीवृत्ति स्वीकारली आहे.
तोच तर विश्वकर्मा आहे.
मग त्याला कुठली आली आहे मुक्तता ?
आपल्याप्रमाणे तो देखील बंधनांत जखडला आहे
नव्हे. त्यानं आपणहून स्वतःला जखडून घेतलेलं आहे.
आपल्याप्रमाणं त्याचं देखील बंधन चिरकालीन आहे !!

मग आता बाहेर ये.
ही ध्यानधारणा, पूजा, अर्चा, धूप दीप नैवेद्य....
सारं सारं सोडून दे !
अरे वेड्या, तुझे कपडे खराब होतील.
हीच तुला भीति आहे नं ?
प्रभूच्या भेटीपुढं ह्याची रे काय मातब्बरी ?
तुझा प्रभू तिथं मग्न आहे !
जा भेट त्याला !
त्याच्याजवळ जातांना प्रथम स्वतःला घर्मबिंदूत नाहवून
घे !!

●



## : १२ :

मला अजून पुष्कळ लांब जायचं आहे !
हा माझा प्रवास अनंत कालापासून सुरू आहे. आणि
असाच अनंत काळापर्यंत चालू राहणार आहे !
प्रकाशाच्या पहिल्या शलाकेवर रथारूढ होऊन माझा
प्रवास सुरू झाला ! साऱ्या अनंतात मी भ्रमण करतोय्.
हे ग्रह.... हे तारे.... माझ्याच पावलांचे ठसे आहेत !!
तुझ्या अगदी जवळ येण्यासाठी
खूपच लांब लांबची वळणं घ्यावी लागतात.
आणि अत्यंत शुद्ध स्वर आळवण्यासाठी
खूप कठीण मेहनत घ्यावी लागते.
स्वतःच्या झोपडीपाशी पोहचायला प्रवाशाला प्रत्येक
दाराशी ठोठवावं लागतं.... अगदी अंतर्गृहात प्रवेश
मिळवण्यासाठी बाहेरील सारं विश्वं तुडवावं लागतं.

सारं विश्व धुंडाळणारे नेत्र जेव्हा मिटावेत तेव्हाच
अंर्तमनाचं दर्शन होतं आणि मग आतापर्यंत 'अससि कुठे
तू ?' म्हणून किंचाळणाऱ्या माझ्या मनाला.... धीर गंभीर
साद मिळते "हा मी इथे आहे !!" आणि आतापर्यंतच्या
शंकेला माझ्या नेत्रावाटे वाहणारे अश्रु साफ धुवून
टाकतात !!

●

## : १३ :

मी जे गीत आळवण्यासाठी आज इथं आलो ते अजूनहि न आळवता तसंच राहिलं आहे.
इतके दिवस मी माझ्या तानपुऱ्याच्या तारा जुळवण्यातच गमावले.
आणि अजूनहि ते गीत गायल्या जाणार नाही. अजून ती सुवेला यायची आहे.... त्या गीताची रचना अजूनहि समाधानकारक झालेली नाही.... मला शब्दच सुचत नाहीत.... फक्त गीत गायची व्याकुलता हुंदके देतेय् बहर यावयाचाच आहे फक्त खोडकर वाराच हुंदडतोय्.
त्यांचं दर्शन अजून व्हायचंय्. त्याचा भरदार आवाज अजून ऐकायचाय्.... फक्त त्याच्या पावलांची चाहूल माझ्या दारावरून गेल्याची ऐकली आहे !
सारा दिवस त्याच्या आगमनाची तयारी करण्यात घालवला ! फक्त दिवा लावावयाचा राहिला आहे.
मग त्याला आंत तरी कसा बोलावू ?
माझी अन् त्याची भेट अंजून झाली नाही
पण माझी आशा मात्र बलवत्तर आहे.
एक दिवस खात्रीनं मी त्याला भेटेन.

●

## : १४ :

माझ्या आकांक्षा अनंत आहेत. आणि त्यासाठी मी
चालवलेला आक्रोश देखील हृदयद्रावक आहे
आणि तरीहि तू मला झिडकारतोस त्यातली ही कठोर
दयाच माझं जीवन साकार बनवतेय् !
दिन प्रतिदिन तू मला घडवतो आहेस. न मागतांच दिल्या
जाणाऱ्या साध्या भेटी स्वीकारण्याच्या लायकीचा बनवतो
आहेस !
आकाश, ....हे तेज ....ही काया.... हे जीवन....
नि हे मन....
ह्या साध्या भेटींनी माझ्या अंतःकरणातली फाजील
इच्छांची तू रवानगी करतो आहेस.
एकेकाळी मी माझ्या ध्येयाकडे कसातरी रखडत रेंगाळत
जात असे
नंतर अशी ही वेळ आली की अत्यंत आतुरतेने मी तिकडे
धाव घेतली.
पण दोन्ही वेळा तू मात्र मुद्दाम माझ्या दृष्टीआड होत
असे.
मला वाटायचं, काय कठोर आहेस तू.
पण दिवसेंदिवस तू मला घडवतो आहेस.
तुझ्याशी समरस व्हायला लागणारे गुण तू माझ्यांत
रुजवतो आहेस.
निर्बल नि क्षुद्र आकांक्षांचं निर्मूलन करून
तुझ्यात पूर्णपणे सामावून जाण्याच्या पातळीवर तू मला
नेतो आहेस !
आणि म्हणून तू मला झिडकारतो आहेस !!

●

## : १५ :

तुझ्या ह्या विशाल मंदिरांत ह्या एका कोपऱ्यांत बसून गीतं
गायची एवढंच माझं कार्य आहे !
माझं हे निरुपयोगी जिणं निष्काम गीतं गाण्यापेक्षा अधिक
काय करू शकणार आहे ?
मध्यरात्रीच्या शांत नि काजळी अंधारांत
मनोमंदिरांतील दीप प्रज्वलित होताना,
प्रभो, आपल्यापुढं उभं करून
मला अभंग आळवायची आज्ञा कर – !

आणि पहाटेच्या प्रशांत वेळी, आपल्या दिव्य वीणेच्या तारा
जुळवशील तेव्हा
तुझं अनुपम संगीत ऐकत रहावं असं वाटतं.
तेवढी माझी इच्छा पूर्ण कर
एवढंच माझं मागणं आहे.

●



## : १६ :

ह्या विशाल विश्वाच्या उत्सवाचं आमंत्रण मला आलं !
माझ्या आयुष्याचं सार्थक झालं !
डोळ्यांनी जेवढं पाहता येईल तेवढं मी पाहून घेतलं !
कानांनी ऐकता येईल तितकं ऐकलं....
माझ्या आयुष्याचं खरोखर सार्थक झालं !

ह्या उत्सवांत मला पावा वाजवायची सुसंधी मिळाली....
जसा वाजवतां येईल तसा मी वाजवला
मला शक्य तितकं मी केलं !
प्रभो, माझी एकच इच्छा शिल्लक राहिली आहे !
तुझ्या दर्शनाची सुवेला अजून आली नाही का ?
तुझ्या पुढे निःशब्द प्रणाम करावयाचा तो क्षण
अजून आला नाही का ?

●

: १७ :

माझं सर्वस्व अर्पण करण्याकरता मी फक्त माझ्या प्रियकराची वाट पाहतेय् आणि म्हणूनच मला इतका उशीर होतोय्.
माझ्या अनियमितपणाचं कारण देखील हेच आहे.

आपल्या नीतिनियमांनी घट्ट जखडून ठेवण्यासाठी बाकी सारे येतात.... पण मी त्यांना दादच देत नाही.
मी फक्त माझ्या प्रेमाची वाट बघतेय्.
माझं सर्वस्व शेवटी मी त्यालाच अर्पण करणार आहे !

ह्या माझ्या वागणुकीवर निर्बुद्धपणाचा आरोप ते करतात.
त्याचं म्हणणं निःसंशय खरं आहे; त्यांची निंदा वाजवी आहे. पण त्याची मला पर्वा नाही.

बाजाराचा गजबजाट संपलाय्. सगळी धामधूम शांत होऊन सारं विश्व निवांतपणं पहुडलंय्.
मला परत बोलावणारी सगळी जण निराश होऊन;
संतापून परत गेलीत
आणि ह्या पवित्र एकांतात....
माझं सर्वस्व अर्पण करण्यासाठी
मी माझ्या प्रेमाची वाट पाहते आहे....
माझ्या प्रियतमाची प्रतीक्षा करतेय् !!

●



: १८ :

ह्या ढगाळलेल्या काळोख्या रात्री मी एकटाच तुझ्या
दाराशी तुझी वाट पाहत उभा आहे.
त्यातच तुला समाधान वाटतं की काय कुणास ठाऊक !

सकाळपासून संध्याकाळपर्यंत
कामाच्या गर्दीत मी गढून जातो.
पण ह्या अंधाऱ्या एकांतात तुझ्यासाठी,
केवळ तुझ्यासाठीच मी तिष्ठत असतो !
आणि अशावेळी जर तू मला दर्शन दिलं नाहीस आणि
असंच वाळीत टाकल्यागत उभं केलंस, तर या पावसांत
मी काळ तरी कसा कंठायचा ?
ह्या प्रतीक्षेच्या कंटाळवाण्यावेळी वर आकाशांत माझंच
हुंदके देणारं हृदय बिंबित होतं
आणि माझं निराश मन
अस्वस्थपणे वाहणाऱ्या वाऱ्याबरोबर
रखडत रखडत हिंडत सुटतं....
रखडत रखडत हिंडत सुटतं....

●

## : १९ :

- आणि तू जर बोलणार नसशील
तर तुझं मौनच मी हृदयांत सामावून घेईन !
चिमुकल्या चांदण्यांनी नटलेल्या,
धीरतेने ओथंबलेल्या निशेसारखा,
मी स्तब्धपणं वाट पहात उभा राहीन !
मग पहाट होईल !
अंधाराला दूर पिटाळत प्रकाशशलाका प्रगटेल !
त्यातून तुझ्या संगीताचा सोनेरी कलश
तुडुंब भरून वाहू लागेल !
त्या संगीताचा प्रतिध्वनी घरट्याघरट्यातून
किलबिलाटाच्या रूपानं घुमेल !!
त्या संगीताची दीप्ति साऱ्या रानावनांत फुलझाडांवरून
बहरू लागेल !

तू जर बोलणारच नसशील
तर तुझं मौनच मी हृदयांत साठवून ठेवीन !!

●

## : २० :

त्या दिवशी ते कमल उमललं ! पण माझं मूढ मन मात्र
स्वैराचार करत होतं. माझ्या फुलांची परडी रिकामी
होती.... ते कमळ उमललेलं मला कळलं नाही....
ते तसंच न खुडता राहून गेलं !
औदासिन्य उगीचच ओठंगळून अवलोकू लागलं.
पश्चिमेकडच्या गार वाऱ्याची झुळूक आली.
आणि मनोहारी सुगंधानं
मी स्वप्नातून दचकून जागा झालो !
त्या सुवासानं मला धुंद केलं !
मला हवा हवासा वाटणारा तो सुगंध मला पोखरू
लागला.
ग्रीष्मानं परिपूर्णतेसाठी सोडलेल्या निश्वासासारखा मला
तो वाटला !
पण तो इतका जवळ होता हे मात्र मला तेव्हा कळलं
नाही.... तो सुगंध माझाच होता.... माझ्याच हृदयांत
बहरलेल्या ताटव्याचा होता ते मात्र मला शेवटपर्यंत
कळलं नाही !!

●

## : २१ :

आता मात्र प्रवासाला सुरवात केलीच पाहिजे !
उदास अंतःकरणानं कंटाळवाणा काळ कंठण्यात काय हंशील ?
सुगंधी सुमनांचा सडा शिंपीत वसंत आला !
- आणि गेला देखील !
आणि आता ह्या निर्माल्याचा भारा घेऊन मी उगीचच
बसलोय् !
उगीचच घुटमळतोय् !
निश्चल लाटांची देखील कुजबूज सुरू झाली आहे....
ती पलिकडे किनाऱ्याजवळच्या झाडांच्या गर्दीत
वाळलेली पानं देखील फेर धरून नाचू लागली
आहेत....
आपला मार्ग आक्रमायच्या तयारीत आहेत !
मग असं शून्य दृष्टीने काय पाहतोय् मी ? ....त्या पहा
पैलथडीच्या मंजूळ संगीताच्या लहरी
वाऱ्यावर बागडताहेत.
नाचत नाचत मला बोलवायला येताहेत....
माझं अंगअंग पुलकित करताहेत !
मला आता बोट हाकारलीच पाहिजे !!

●

## : २२ :

श्रावणातल्या ढगाळलेल्या रात्रीसुद्धा साऱ्या पहारेकऱ्यांचा
डोळा चुकवून चोर पावलांनी एखाद्या शांत निवांत निशेवत्
निघून जाण्याची तुझी खोड मला माहीत आहे !

आज पूर्वेच्या वाऱ्याचं खिदळणं चालू असून देखील
दिनमणीने आपले स्वप्नाळू डोळे मिटून घेतले आणि
आषाढ घनाच्या कृष्ण कांबळीखाली निळ्या निळ्या
आकाशानं देखील तोंड झाकून घेतलय्.

ही गंमत पाहून मोट हाकणाऱ्यांनी काय ओळखायचं ते ओळखलं !
आपलं गाणं थांबवून घाईघाईनं घरी परत
आलेत आणि झोपडीची दारं बंद करून पिसाटाप्रमाणं
कोसळणाऱ्या मुसळधारांची वाट पहात बसले आहेत !
रस्त्यावरची रहदारी थांबली आहे ! फक्त तू एकटाच
एखादा मुशाफिरासारखा संथपणं प्रवास करतोयस्

माझ्या एकुलता एक मित्रा माझ्या अत्यंत आवडत्या
सहकाऱ्या ! तुझ्यासाठी मी माझ्या झोपडीची दारं सताड
उघडली आहेत. आंत ये !
असा एखाद्या स्वप्नासारखा मुकाट्यानं निघून जाऊ
नकोस !!

●

## : २३ :

या भयाण वादळयारात्री तू प्रीतीच्या प्रवासासाठी निघाला आहेस का ? दुःखातिशयाने कण्हत आकाश रात्रीची भयानकता अधिकच वाढवतंय् !

रात्रभर मला झोप नाही. क्षणोक्षणी उठून मी माझ्या झोपडीचं दार उघडतो. आणि त्या दाट काळोखात नजर पोहचू शकेल इतक्या दूरवर बघतो.

पण मला काहीच दिसत नाही. कुठं असेल बरं तुझा मार्ग ?

काळयाभोर नदीच्या भंगलेल्या घाटावरून तू निघाला आहेस का ? रागाने गुरगुरणाऱ्या कुठल्याशा अरण्याला तू आक्रमित आहेस का ? कुठल्या चक्रव्यूहातून तू मला भेटावयाला येतो आहेस ?

●



## : २४ :

प्रभो,
जर दिवस संपला असेल,
पक्षांचं कूजन थांबलं असेल
वारा वाहून वाहून विसावला असेल
तर धरेनं धारण केलेल्या निद्रेच्या चादरीप्रमाणं
माझ्या अंगावर देखील ही अंधाराची कांबळ पसरून दे !

मलूल नि क्लांत कमलिनीच्या पाकळया
सायंकाल होताच तू हळुवार हातानं मिटून घेतोस
माझ्या पापण्या देखील तशाच मिटू देत.

शिदोरी प्रवास संपायच्या आधीच संपली-
कपड्याच्या चिंध्या धुळीने माखल्या-
शरीर श्रमानं श्रांत झालय्-
दम विरू लागलाय्-
अशा ह्या प्रवाशाच्या अंगावरून ही
अंधाराची कांबळ ओढून घे !
आणि दयार्द्र निशेच्या कुशीत
ताजंतवानं होणाऱ्या पुष्पाप्रमाणं
हे थकलेलं जीवन
तुझ्या कांबळीखाली स्वस्थ पडून
पुढल्या प्रवासासाठी
ताजंतवानं होवू दे !

●

## : २५ :

तुझ्यावर सारा भार सोपवून माझ्या
थकलेल्या जिवाला विश्रांतीसाठी पडू दे !
ह्या श्रांत शरिराला ओढून ताणून
उभं करण्यात काय हंशील ?

दिवसभराच्या श्रमानं थकलेल्या दिवसावर,
रात्रीची कांबळ टाकून तू झोपवतोस -
आणि त्यामुळं नव्या जोमानं दुसरे दिवशी तुझी पूजा होते.

तसंच माझंही होऊ दे !
नव्या जोमानं दुसऱ्या दिवशी मी सुद्धा तुझी पूजा करू
शकेन !

●



## : २६ :

तो आला माझ्या शेजारी बसला
पण मला जाग आली नाही !
छे : माझ्या झोपेचा मला अगदी तिटकारा येतोय्.
रात्रीच्या निःशब्द एकांतात तो आला
त्याच्या वीणेचे स्वर माझ्या स्वप्नांत निनादले.
माझं स्वप्नं संगीतमय झालं....
तो येतो.... माझ्या स्वप्नमंजुषेला फुंकर घालून जातो....
पण मी जागा होत नाही.
अरेरे, अशा रात्री कां बरं फुकट जात आहेत ?

●

## : २७ :

प्रकाश !... पण कुठे आहे प्रकाश ?

- तुझ्या ज्वलंत आकांक्षेने तो निर्माण कर !
ती तिथं पणती आहे....
पण त्यातली वात काजळली आहे !....
माझं नशीब देखील असंच आहे का ?
मग त्यापेक्षा मृत्यू काय वाईट ?
दुःख नित्य माझं दार ठोठावतं आणि सांगतं -
"ईश्वर जागा आहे. ह्या अंधाऱ्या वाटेवर तुझ्या
आगमनाची वाट पहातो आहे !"
आकाश ढगाळलं आहे. पावसाची सारखी झड लागली आहे.
आणि अंतःकरणांत अकारण खळबळ माजली आहे.
ह्या खळबळीचा मला अर्थच कळत नाही !
निमिषमात्र चमकणारी वीज....
ती चमकून गेल्यावर अंधारी मात्र येते डोळ्यांवर
आणि मग ते निशासंगीत कुठून येतंय,
ते देखील कळत नाही. त्याचा कानोसा घेत
अंधारी आलेल्या डोळ्यांनी
माझं शरीर चाचपडतं.... ठेचाळतं !

प्रकाश ! पण कुठे आहे प्रकाश ?

तू तुझ्या ज्वलंत आकांक्षेने तो निर्माण कर !
घनघोर मेघगर्जना वादळी वाऱ्याशी झगडताहेत.
काळ्याकभिन्न कातळाप्रमाणं अंधार माजला आहे !
पण त्या अंधारात क्षणाचाही विलंब करू नकोस
प्रेमाचा दीप तुझ्या जीवनांत प्रज्वलित कर !!

●



## : २८ :

हे मोहपाश म्हणजे मूर्खपणा आहे
तरीही ते तोडतांना माझं हृदय कळवळून उठतं !
माझ्या स्वातंत्र्याची मला मनापासून इच्छा आहे.
पण त्याची आशा धरतांना मला लाज वाटते !
मला माहीत आहे की तू माझा एक जिवलग मित्र आहेस
आणि तोच माझा एक अमूल्य ठेवा आहे.
आणि तरीहि माझ्या खोपट्यांतल्या क्षुल्लक वस्तू फेकून
देतांना सुद्धा मला कससंच वाटतं.
माझ्या अंगाखांद्यावर लोळणारी ही नाशवंत मृत्तिका
आहे.
त्याचा मला तिरस्कार वाटतो.
आणि तरीहि त्याबद्दल तितकीच प्रीति आहे, आणि
म्हणूनच जतन करावीशी वाटते !
मी कर्जबाजारी आहे. क्षणोक्षणी ठेचाळणारा आहे.
माझी लज्जा माझ्यांत दडून बसली आहे !
आणि तरीहि माझ्या चांगल्याची जेव्हा मी मागणी करतो
तेव्हा - मी चाचरतो.... मला भीती वाटते.
न जाणो, माझी प्रार्थना तू ऐकणार तर नाहीस
मला एखादा वर तर देणार नाहीस ?

●

## : २९ :

माझा आत्मा ह्या अंधार कोठडीत एकटाच
अश्रु ढाळतो आहे, आणि मी अव्याहत
त्याभोवती भिंती उभारण्यात गुंतलो आहे.
दिन प्रतिदिन त्या भिंतींची उंची वाढत वाढत
आकाशाला भिडू पहाते आहे. आणि त्याचबरोबर
मी मात्र स्वतःला दृष्टीआड करतो आहे !

●



## : ३० :

मी माझ्या उद्दिष्टाकडं एकटाच निघालो होतो.
... अरे ? पण हा कोण माझा पाठलाग करतोय् ?
ह्या अंधाऱ्या रात्री मुकाट्यानं माझ्या मागे येतोय्.
मी त्याला टाळण्याचा प्रयत्न करतो,
पण व्यर्थ !
उद्धटासारखा तो निष्कारण धूळ उडवतोय्
आणि मी उच्चारलेल्या
प्रत्येक शब्दांत आपला भसाडा आवाज
मिसळवण्याचा प्रयत्न करतोय् !
- प्रभो, ते माझं दुसरं रूप आहे.
निर्लज्ज आहे.
त्याला घेवून तुझ्या दाराशी यायची
मला लाज वाटते !

●

## : ३१ :

बंदीवान्, तुला ह्या बंधनात कुणी जखडून ठेवलं आहे ?

"माझ्या स्वामीनं. कारण-" बंदीवान म्हणाला- "मला वाटलं संपत्तीच्या नि सार्वभौमत्वाच्या जोरावर मी सर्वांना जिंकू शकेन, मला गर्व झाला होता. माझ्या स्वामीच्या वाटणीचा पैसा देखील मी मनसोक्त उधळला... निद्रेनं पछाडल्यावर माझ्या स्वामीसाठी तयार केलेल्या मंचकावर मी पहुडलो !.... आणि नंतर जागा झाल्यावर स्वतःच्या भांडारांतच मी बंदिस्त झाल्याचं माझ्या लक्षात आलं !"

"– पण बंदिवान तुला जखडून ठेवणारी ही अभेद्य श्रृंखला कोणी तयार केली ?"

बंदीवान म्हणाला, "स्वतः मीच !
अत्यंत काळजीपूर्वक मी स्वतःच ती तयार केली. मला वाटलं माझ्या संशोधक बुद्धीच्या जोरावर साऱ्या विश्वाला बंदिस्त करून मी स्वतः चिरकालीन स्वातंत्र्य उपभोगू शकेन. आणि मग दिवस रात्र खपून, अक्राळ विक्राळ ज्वालेत तापवून, घणांनी ठोकून ठोकून मजबूत दुवे मी तयार केलेत - आणि जेव्हा हे सर्व दुवे सांधले तेव्हा त्याच श्रृंखलेत मी बंदिस्त झाल्याचं मला आढळून आलं !!"

●



## : ३२ :

माझ्यावर प्रेम करणारी सारी जण मला
निरनिराळ्या प्रकाराने नित्य जखडून ठेवतात.
एक क्षण देखील मला मोकळा सोडत नाहीत.

पण तुझ्या प्रेमाची तऱ्हा काही विचित्रच आहे.
माझ्यावर त्यांच्यापेक्षा कितीतरीपट जास्त
प्रेम करूनहि तूं मला नेहमी मोकळा सोडतोस !

मी त्यांना विसरू नये म्हणून ते नेहमी
माझ्या भोवती भोवती वावरतात.

– पण दिवसामागून दिवस लोटतात,
तुझं मला दर्शन सुद्धा होत नाही.
कधी कधी तुझी मला आठवण देखील होत नाही
आणि तरीही -
तुझी प्रीति मात्र माझ्या प्रेमाची एकाग्र चित्ताने वाट पहात
असते.

प्रभो, तुझ्या प्रेमाची तऱ्हाच विचित्र आहे !!

●

## : ३३ :

एकदा सकाळी ते माझ्याकडं आले आणि म्हणाले -
"आम्हाला तुझ्या खोलीतली अगदी थोडीशी जागा
हवीय्"
आणि म्हणाले -
"तुझ्या प्रार्थनेत आम्ही तुला मदतचं करू
आणि त्याबद्दल फक्त आमच्या वाट्याला येइल
तेवढाच प्रसाद आम्ही शांतपणं स्वीकारू !"
नंतर त्या कोपऱ्यात ते शांतपणानं बसले
- पण रात्रीच्या काळोखात मात्र आपला
दिवसभराचा शांतपणा सोडून ते धांगडधिंगा
घालतात.
देवघरातल्या माझ्या पवित्र, शांत एकांताचा
भंग करून प्रभूचा नैवेद्य आधाशीपणानं
हिसकावून घेतात
आपल्या अपवित्र हातांनी !

●



## : ३४ :

प्रभो-
तेवढा एकच कण माझ्यात शिल्लक असूं दे
ज्यामुळं माझ्या सर्वस्वाला
तुझं नावरूप राहील !
तेवढी एकच इच्छा माझ्यात शिल्लक असू दे
ज्यानं तुझं अस्तित्व माझ्या सन्निध राहील....
कुठल्याहि क्षणी तुला
माझं हृदय अर्पण करीन !
तितकंच क्षुल्लक अस्तित्व माझ्यात असू दे
की ज्यामुळं मी तुला कधीही
दृष्टीआड करू शकणार नाही.
आणि प्रभो,
तेवढा एकच मोहपाश शिल्लक असू दे
की ज्या योगे मी तुझ्याशी बांधला जाईन...
आणि तूं माझ्या जीवनातून
आपला कार्यभाग साधून घेशील !
आणि तुझं निरपेक्ष प्रेम हाच तो मोहपाश !

●

## : ३५ :

जिथं मन निर्भय आहे आणि मस्तक उंचावलं आहे
जिथं ज्ञान मुक्त आहे
जिथं संकुचित वृत्तीनं विशाल विश्वाचे तुकडे पडले नाहीत
जिथं सत्याच्या गाभ्यांतून शब्दाचा जन्म झाला आहे
जिथं आकांक्षा परिपूर्णतेसाठी नेहमी पुढंपुढंच घाव घेत
असतात
जिथं विचारांचा शुद्ध ओघ अंधश्रद्धेच्या
नि रुढींच्या विराट वाळवंटात लुप्त होत नाही
जिथं तुझ्या मार्गदर्शनानं मन नेहमी प्रगल्भ विचारांकडं
नि कर्तव्यांकडं वाटचाल करीत असतं
त्या स्वातंत्र्याच्या नंदनवनात
प्रभो, माझा देश जागू दे !!

●



## : ३६ :

तुझ्या चरणापाशी हीच एक प्रार्थना आहे !

माझ्या हृदयातल्या कोतेपणाच्या मुळाशीच घाव घाल !
आनंद किंवा दुःख ह्यांना संयमितपणं सहन करण्याची
वीरता मला दे !
माझ्या प्रेमाला सेवेचं महात्म्य दे !
दलितांना दूर न लोटण्याची अन् प्रचंड नि मगरूर
शक्तीपुढं देखील मान न वाकवण्याची हिंमत मला दे !
रोजच्या व्यवहारातल्या क्षुल्लक भानगडींपासून मन
अलिप्त ठेवण्याची ताकद मला दे !
आणि
माझं सर्व सामर्थ्य, तू म्हणशील त्या क्षणी, तुझ्या चरणी
प्रेमानं अर्पण करण्याची शक्ती मला दे !

●

## : ३७ :

मला वाटलं
माझ्या सामर्थ्याबरोबरच माझ्या प्रवासाचा देखील शेवट
झाला आहे.
मी आक्रमित असलेला मार्ग खंडला आहे.
माझी शिदोरी संपली आहे
आणि निःशब्द असंदिग्धतेच्या बाहुपाशांत शिरावयाची
सुवेला आली आहे !
पण नाही
प्रभो, तुझी इच्छाशक्ति अमर्याद आहे
तुझ्या कुठल्याच गोष्टीला शेवट नाही
कारण जिभेवरले शेवटले शब्द विरत नाहीत तोच
नवीन स्फुल्लिंग हृदयांत फुलतात.
आणि जुनी मळलेली वाट संपण्यापूर्वीच
नाविन्याने भरलेला नवा प्रदेश माझ्या दृष्टीत भरतो !!

●



## : ३८ :

....मला तू हवा आहेस !....
माझं हृदय अनादिकालापासून हेंच म्हणतंय्
आणि अखेरपर्यंत हेच म्हणत राहील
....मला तू हवा आहेस....
....ह्या आक्रोशापुढं रात्रंदिवस मला ओढू पहाणाऱ्या
साऱ्या इच्छा फोल ठरतात !

गाढ अंधाराच्या हृदयांत सुद्धा प्रकाशाच्या हव्यासाची सुप्त
इच्छा असतेच
माझ्या बेभान अंतःकरणात एकच एक आक्रंदन चालू
आहे....
मला तू हवा आहेस. मला तू हवा आहेस !
आपली सर्वशक्ति पणाला लावून वादळ शांततेशी झगडतं
आणि अंती
त्या शांततेच्या कुशीतच शांतपणं झोपी जातं !
माझं बंडखोर मन देखील अंतःकरणातल्या तुझ्या प्रेमाशी
झगडतं
आणि झगडतांना देखील त्याचा हाच आक्रोश चालू
असतो....
मला तू हवा आहेस !....
मला तू हवा आहेस !....
मला तू हवा आहेस !!!...

●

## : ३९ :

जेव्हा अंतःकरण शुष्क नि कठोर होतं -
तेव्हा जवळ येऊन तुझ्या दयेचा वर्षाव कर !

जेव्हा जीवनातला जिवंतपणा नाहीसा होऊ पहातो -
तेव्हा तुझ्या गीतांनी मला जीवन दे.

जेव्हा कामाचे डोंगर मला आपल्या ओझ्याखाली दडपून
टाकतात -
तेव्हा आपल्या शांत नि गंभीर स्वरूपात मला दर्शन दे !

जेव्हा माझं भिकारडं हृदय ह्या अंधाऱ्या रात्री कोपऱ्यांत
एकटंच टिपं गाळीत बसतं -
तेव्हा उदारा,
तुझ्या साऱ्या राजेशाही वैभवांत
माझ्या झोपडीची दारं फोडून
माझ्या शेजारी येऊन बैस !

आणि जेव्हा वासना मनावर विजय मिळवून
त्याला भ्रमिष्ट करू पहाते -
तेव्हा प्रभो,
तुझ्या विराट वादळानिशी
आणि तळपत्या वज्रानिशी जवळ ये
आणि मला आपल्यात सामावून घे !!

●



## : ४० :

अवर्षणातल्या असहाय अवनीप्रमाणं माझं हृदय शुष्क
झालं आहे
आकाशात एकही ढग नाही -
सारं क्षितीज विराण वाळवंटावत् दिसतंय् !
मेघांचा लवलेश नाही....
सारीकडे विषण्णता...
सर्वदूर स्मशानशांतता पसरली आहे !!

प्रभो... वाटलं तर तुझं भयानक वादळ पाठव
प्रलयकाळात सारं विश्व बुडवून टाक
सौदामिनीच्या आसूडानं सारं आकाश बडवून काढ !
ह्या टोकापासून त्या टोकापर्यंत !
पण ही स्मशानशांतता नष्ट कर !
प्रभो, ही हृदय जाळणारी शांतता शमव !
स्तब्ध, गंभीर नि निखारे ओतणारी ही प्रेतकळा -
त्यावर संजीवनीचा वर्षाव होऊ दे !
बाबा संतापल्यावर अश्रुपूर्ण नेत्रांनी कुरवाळणाऱ्या
आईसारखी
प्रभो
जलबाष्पांनी भरलेली कोमल भेट मला पाठव !!

●

# : ४१ :

कुठं आहेस तूं ? सावल्यांच्या गुंतावळीत कुठं लपला आहेस ? तुला झिडकारून ही सावल्यांची माळ पुढं सरकते आहे. तुझ्या अस्तित्वाची किंचितही दखल न घेता हे सर्वजण रस्त्यानं धूळ उडवत चालले आहेत. आणि मी मात्र फुलांची परडी घेऊन तुझी वाट पाहात तिष्ठत बसले आहे. येणारे जाणारे त्यातून फुलं उचलतात नि निघून जातात. तुझ्यासाठी भरलेली परडी हळूहळू रिकामी होते आहे. पण तू मात्र अजून पुढे येत नाहीस !!

सूर्याकडं पाठ फिरवून मी सकाळपासून बसले आहे. समोरची माझी सावली सामोरी होऊन माझ्याबरोबर प्रतीक्षा करत उभी आहे.... क्षणामागून तास जाऊ लागलेत तरी तू आला नाहीस... शेवटी सांत्वन करायला ती माझ्या पायाशी आली... पण तुझी वाट पहात मी तशीच बसले, कंटाळून माझ्या सावलीनं देखील मला पाठ दाखवली. तरीहि तूं कुठं लपला आहेस ? ह्या संध्याकाळच्या विषण्ण वातावरणांत माझे डोळे जड झालेत.... घरी परतणारे लोक, मला पाहून चौकशी करतात, त्यांना काय सांगावं मला कळत नाही आणि मी माझ्या पायाची बोटं मोजूं लागते !!



तूं येणार आहेस आणि मी तुझी वाट पहात बसले आहे हे
त्यांना कसं सांगू ? तुझ्यासाठी नजराणा म्हणून मी माझं
दारिद्य पसरवलं आहे हे त्यांना कसं कळवू ?

रात्री गवतावर पडून मी आकाशातले तारे मोजत पडते !
सोनेरी पक्षी तुझ्या रथावर भिरभिरतात. ते सारे लोक
कुतुहलाने पहात उभे राहतात. तू आपल्या रथांतून खाली
उतरून ह्या भिकारड्या मुलीजवळ येतोस !
लज्जेने नि अभिमानानं वावटळीतल्या वेलीवत् मी थरथरत
असतांना तू मला हात धरून आपल्या शेजारी
सिंहासनावर बसवतोस !
आणि -

पण हे सगळं स्वप्न एकदम खळकन् फुटतं आणि मी
भानावर येते !
रात्र तशीच अंधारली असते
तारे तसेच लुकलुकत असतात.
सारं रान झोपलं असतं
आणि मी ?
त्या स्वप्नांची उजळणी करीत बसते !!

●

## : ४२ :

त्या पहाटे माझ्या कानात कुजबूत झाली की फक्त तू
आणि मी विश्वातल्या कुणालाही न कळवतां अविश्रांत नि
अनिर्बंध प्रवासाला निघणार आहोत !
आणि मग त्या अमर्याद सागरात माझ्या गीतांना भरतं
येईल. ती शब्दांची नि भाषांची बंधनं तोडून अविरत
खिदळणाऱ्या लहरीप्रमाणं अखंड ओसंडत राहतील.
आणि तू शांतपणानं हसत हसत माझं कौतुक करशील !

पण ती सुवेला कधी येणार आहे ?
अजूनहि तुला उसंत मिळाली नाही का ?
संध्याकाळचा पाठलाग करत ते पहा समुद्रावरले पक्षी
परत आपापल्या घरट्यात शिरताहेत
आपल्या बोटीची साखळी केव्हा सुटणार आहे कुणास
ठाऊक.
दिवाकराचा माग काढत संथावलेली संध्या निराशेनं
निशेच्या कुशीत हुंदके देत शिरली आहे !!

●



## : ४३ :

तुझ्या स्वागताची तयारी नसतांना मला न कळत
केव्हातरी तू आलास
मला न विचारता केव्हातरी चार चौघासारखा तू देखील
मनी मानसी शिरलास
आणि प्रभो,
मला न कळत केव्हातरी आपल्या चिरकालीनत्वाची
राजमुद्रा हृदयावर ठसवून निघून देखील गेलास !
केव्हा आलास आणि केव्हा गेलास मला कळलं देखील
नाही.

आणि आज आत्मनिरीक्षणाची ज्योत प्रज्वलित होताच
सुखदुःखाच्या स्मृतींत विरघळत असलेले
तुझ्या सान्निध्याचे क्षण दृष्टिपथात शिरले.
बालपणाच्या भातुकलीच्या यःकश्चित् खेळात सुद्धा तू
माझा सवंगडी झाला होतास !! त्यात तुला कसलाहि
कमीपणा वाटला नव्हता. आणि माझ्याबरोबर फेर धरून
नाचतांना होत असलेल्या नुपुरांचा आवाज -
आज देखील ग्रहताऱ्यांवरून त्यांचा प्रतिध्वनी
मला ऐकू येतोय !!

●

## : ४४ :

— होय ! हाच माझा आनंद आहे ! ह्या रस्त्याच्या कडेनं
छाया प्रकाशाचा पाठशिवणीचा खेळ चालला आहे.
उन्हांनं शिणलेल्या धरित्रीला मृगाच्या सरी आलिंगन
देताहेत - ह्यांच्या सान्निध्यांत तुझी वाट पहात बसावयाचं.
अनादिकालापासून हेच चालू आहे आणि ह्यांतच मला
आनंद वाटतो.
अनोळखी आकाशांतून मला प्रेमाचे संदेश पोहोचवून ते
अनामिक कुठं तरी अज्ञात स्थळी घाईघाईनं निघून
जातात. त्याबरोबर माझं हृदय आनंदानं भारावतं. मंद
सुगंधित समीर मला हळूच स्पर्श करून एखाद्या अल्लड
मुलाप्रमाणं निघून जातो.
मला उल्हसित करून निघून जातो.
सकाळपासून संध्याकाळपर्यंत मी इथं माझ्या दाराशी
बसतो. माझी आशा माझ्या कानांत गुणगुणते
"अकल्पितपणं प्रभूचं दर्शन होणार आहे !"
आणि मी वाट पहात सकाळपासून संध्याकाळपर्यंत दारात
घुटमळतो.
तुझी वाट पहात बसलो आहे. मधूनच एखाद्या गीताची
ओळ गुणगुणतो आहे.
आणि दूरवरून येणारा वारा तुझ्या आगमनाच्या आशेनं
नुसता ओथंबला आहे.
त्याच्याशीच मी खेळत बसलो आहे.

आणि म्हणूनच छायाप्रकाशांच्या पाठशिवणीचा खेळ पहात
तुझ्या आगमनाची वाट पहात बसणं –
हाच माझा छंद झाला आहे !

●



## : ४५ :

त्याच्या पावलांचा आवाज ऐकला नाही ?
ही सारखी त्याच्या आगमनाचीच चाहूल येत असते.

प्रत्येक क्षणी, प्रत्येक युगी, प्रत्येक दिनी प्रत्येक यामिनी
त्याच्या आगमनाची चाहूल येत असते.

निरनिराळ्या मनःस्थितीत मी वेगवेगळी गीतं गायिली
आहेत.
पण त्या सर्व गीतांतून त्याच्या आगमनाचीच चाहूल येत
असते.
सकाळच्या कोवळ्या उन्हात, चैत्रातल्या आमराईच्या
सुगंधात
त्याच्याच आगमनाची चाहूल येत असते.

श्रावणातल्या उदासीन झडीत
आषाढातल्या घनघोर वादळात, काळ्याकभिन्न मेघांच्या
गर्जनेत देखील -
त्याच्याच आगमनाची चाहूल येत असते.

दुःखातिशयानं टिपं गाळणाऱ्या माझ्या हृदयात सुद्धा त्या
चाहुलीचा पडसाद असतो
आणि आनंदाला देखील त्याच्या परिसस्पर्शानंच
झळाळी येते.

●

## : ४६ :

कितीतरी दिवसापासून तू मला भेटायला येतो आहेस.
सूर्य नि चंद्र तुला कधीच माझ्या दृष्टीआड होऊ देत
नाहीत.
कित्येकदा सकाळी वा संध्याकाळी तुझ्या पावलांची
चाहूल येते. कितीतरी वेळा. तुझ्या भालदार - चोपदारांनी
माझ्याशी हितगूज केलं आहे ! कितीतरी वेळा !

पण आज माझं जीवित इतकं अस्थिर कां झालं आहे.
कुणास माहीत.
अकारणच अननुभूत आनंदाच्या ऊर्मि माझ्या अणूरेणूतून
उसळताहेत.
जणू काही सारं आवरतं घ्यावयाची वेळ आली आहे.
आणि ह्या संध्याकाळच्या हवेत सगळीकडं जणू काही
तुझ्या सहवासाचा सुगंध दरवळतोय्.
असंच मला सारखं सारखं वाटतंय् !!

●

## : ४७ :

रात्रभर त्याची वाट बघत मी जागा होतो.
पण तो आला नाही.
आणि आता पहाटे पहाटे थकून भागून माझा डोळा
लागल्यावर तर तो येणार नाही ?....

मित्रहो तो आलाच तर त्याला अडवू नका.
येऊ द्या त्याला आंत !
त्याच्या पावलांच्या चाहूलीनं जर माझी झोप उघडली
नाही, तर मला उठवू नका. पक्षांच्या किलबिलाटानं माझी
झोप मोडू नये; पहाटेच्या गार वाऱ्यानं माझी निद्रा चळू
नये अशी माझी इच्छा आहे. माझा प्रभू जरी आला तरी
मला शांत झोपूं द्या !!

माझी निद्रा अमूल्य आहे.
ती चळायचीच असेल तर त्याच्या स्पर्शानंच चळू दे !
निद्रेच्या अंधःकारातल्या स्वप्नांच्या तेजोवलयाप्रमाणंच
त्याच्या स्मिताच्या दर्शनासाठीच माझे डोळे उघडू देत !
नेत्र उघडल्यावर प्रथम त्याचंच दर्शन होऊ दे !
पहिली साकार मूर्ति त्याचीच दिसू दे !
त्याच्या स्पर्शसुखानंच मला रोमांचित होऊ दे !

●

## : ४८ :

अवखळ लाटांनी समुद्राची शांतता भंग व्हावी तशी
पक्षांच्या कूजनानं पहाटेची शांतता शहारली. रस्त्याकाठची
फुलं आनंदानं उमलली. सुवर्णरसानं भरलेला कलश
सूर्यानं ढगांवर पालथा केला.

परंतु आमचं कशाकडंच लक्ष नव्हतं. लगबगीनं आम्ही
आमचा मार्ग आक्रमायला सुरवात केली. आमच्या
ओठांतून एकहि गीत स्फुरलं नाही.... रस्त्यानं आम्ही
रमलो नाही.... जवळच्या खेड्यांत गेलो नाही.... हसलो
नाही की एकमेकांशी बोललो नाही. आम्हाला सवड
होतीच कुठं ? जसजसा वेळ जाऊं लागला तसतसा
आम्ही आमचा वेग वाढविला !

पूर्वेच्या क्षितिजाआड लपलेला सूर्य दबकत दबकत
माथ्यावरआला ! ऊन भासू लागलं. आकाशांत
विहरणारे पक्षी झाडांच्या छायेत विसावले. वाळलेली पानं
फेर धरत, नाचत नाचत भिंगरीसारखी दूर पळून गेली.
गुरांच्या मागं वणवण फिरणारा गुराखी आंब्याच्या छायेत
आडवा झाला.... स्वप्नींच्या मनोरथांशी तद्रूप झाला
आणि मग बेहोषपणं धावणाऱ्या उत्शृंखलपणं पळणाऱ्या
ओढ्यामध्ये पाय टाकून मी देखील विसावा घेत बसलो !!

माझे सहप्रवासी माझ्याकडं तुच्छतेनं पाहून हसले.
आपली मान अधिकच ताठ करून वेगानं पुढे निघून गेले.



त्यांनी मागं वळून पाहिलं नाही की विश्रांती घेतली
नाही.... निळ्या निळ्या क्षितिजापलिकडे ते अदृश्य
झाले. अनेक दऱ्या, टेकड्या त्यांनी ओलांडल्या असतील.
चित्रविचित्र प्रदेशातून त्यांनी मार्गक्रमण केलं असेल !
गाढ आदरानं मी त्यांच्या पाठमोऱ्या आकृतींना अभिवादन
केलं - आणि त्याचक्षणी तिरस्कारानं मला चिमटा घेतला,
पण थकलेल्या शरीरानं त्याला दाद दिली नाही !
आणि निराश होऊन मी प्रवासाचा नाद सोडून दिला !

आणि मग सूर्यानं विणलेलं सुंदर, हिरवंगार जाळं मला
दिसलं....
मी कशासाठी प्रवास करत होतो याचा मला विसर पडला !
ऊनसावल्यांच्या खेळांत मी सारं विसरलो !!

- आणि मी जागा झालो तेव्हा माझ्या शेजारी तू उभा
होतास !
तुझं सुहास्य वदन पाहून माझ्या डोळयांचं पारणं फिटलं
आणि मग मला वाटलं की तुला भेटण्यासाठी
कंटाळवाणा प्रवास करावा लागतो....
हालअपेष्टा सहन कराव्या लागतात....
उपासतापास करावे लागतात....
आणि सजीव संसारापासून दूर.... दूर निघून जावं लागतं
ही माझी कल्पना किती चुकीची होती ?

●

## : ४९ :

आपल्या सिंहासनावरून उतरून ! राजेश्वरा, तू माझ्या
झोपडीच्या दाराशी आलास !
निवांत एकांतात मी तुझं भक्तिगान तल्लीन होऊन करत
होतो. ते स्वर न कळे कसे तुझ्या कानी पडले.
आणि आपल्या सिंहासनावरून उतरून तूं माझ्या
खोपट्याच्या दाराशी आलास !

तुझ्या दरबारांत एकापेक्षा एक सरस गायक आहेत आणि
अहोरात्र संगीताची आराधना तिथं होत असते.
तरीपण माझ्या साध्याभोळ्या अभंगांनी तुझं मन
आकर्षित केलं.
अथांग, अनंत, असीम गीत-सागरांत माझ्या गीताचे चार
तुषार मिसळले.
तरीपण त्यानं तुझं मन मोहून टाकलं. बक्षिसाचं पदक
घेऊन तू आलास !
आपल्या सिंहासनावरून उतरून स्वामिन्
तू माझ्या खोपटाशी आलास -
थबकलास !

●



## : ५० :

नेहमीप्रमाणं त्या दिवशी देखील मी भिक्षा मागायला
बाहेर पडलो. दारोदार आपली झोळी पसरत असतांनाच
लांबवरून स्वप्नासारखा सुवर्णशकट मला येतांना
दिसला. हा कोण राजाधिराज असावा ह्याचा विचार करत
मी तसाच उभा राहिलो !
आणि मग लगेच माझी आशा उफाळली ! न मागतांच
दिल्या जाणाऱ्या दानासाठी मी सरसावलो. इतस्ततः
फेकल्या जाणाऱ्या सुवर्णकणांसाठी आसावून उभा
राहिलो, भिकारीच मी !
शेवटी तो सुवर्णशकट जवळ आला. जिथं मी उभा होतो
तिथंच थांबला ! माझ्यावर एक हसरा दृष्टीक्षेप टाकून
उडी मारून उतरणारा राजाधिराज - होय - तूच होतास !
तुझ्या रूपानं माझं सुदैवच माझ्याकडं सस्मित पहातंय्.
असं मला वाटलं ! शेवटी माझी दया तुला आली तर !
ह्या विचारांत असतांनाच तू माझ्या समोर आपला विशाल
हात पसरवून म्हणालास - "ओम् भवति भिक्षां देही !!"
एका राजराजेश्वराने एका भिकाऱ्यासमोर हात पसरावेत !
किती दारूण थट्टा केलीस तूं ! मी गोंधळून तसाच उभा
राहिलो. आणि मग हळूच अभावितपणं माझ्या
झोळीमधून चिमूटभर दाणे काढून तुझ्या हातावर ठेवले !
....घरी आल्यावर मी माझी झोळी रिकामी केली आणि
आणि काय आश्चर्य ! त्या लहानशा ढिगाऱ्यांत चिमूटभर
सोन्याचे कण चमकत होते !!
आणि मग मला भयंकर पश्चात्ताप झाला ! अरेरे ! तू हात
पसरलास तेव्हा सगळी झोळी तुझ्या हातावर रिकामी
करावयाची बुद्धि मला कां बरं झाली नाही ?

●

## : ५१ :

रात्र बरीच झाली होती. दिवसभराचं काम संपवून आम्ही विश्रांती घेत पडलो होतो. सर्वांनी आपापल्या झोपडीची दारं लावली आणि आम्ही झोपण्याची तयारी करू लागलो....
तितक्यात कुणीतरी म्हणालं....
"अरे आज आपला परमेश्वर येणार आहे"
....आम्हाला ते खोटं वाटलं
ह्या भलत्या वेळेला ? छट् काहीतरीच....
कुणीतरी त्याची कुचेष्टा करीत पुटपुटलं !

धक्क्यांनी दार वाजत होतं. पण वारा असेल म्हणून तिकडं दुर्लक्ष करत दिवा मालवून आम्ही बिछान्यावर आडवे झालो.
पण कुणीतरी म्हणालं
"कुणीतरी दार ठोठावतं आहे नक्कीच प्रभूचा निरोप आला आहे !"
आणि पुन्हा हसत हसत आम्ही उद्गारलो -
"छे; काहीतरीच ! बाहेर वारा घोंघावतो आहे ! त्याचा आवाज होतोय् झालं !"

- आणि झोपेत असतांना कसलातरी आवाज झाला ! कुठं तरी वीज पडल्यागत् जमीन हादरल्यासारखी वाटली. भिंतीसुद्धा थोड्याशा थरथरल्या आणि त्यानं आमची झोप चळली !
तेव्हा कुणाचे तरी शब्द कानी पडले
"– रथांच्या चाकांचा आवाज होतो आहे."



....पण कूस बदलवत, अर्धवट झोपेत आम्ही बरळलो -
"काहीतरीच ! आकाशांत म्हातारी दळते आहे."

अजून उजाडायचंच होतं.... रात्र अंधारात तशीच बुडाली होती. पण नगाऱ्यांचा आवाज होत होता.
कुणीतरी ललकाऱ्या देत होतं....
"उठा जागे व्हा...."
आणि एकदम आम्ही भानावर आलो....
भांबावून छातीवर हात जुळवत किंचाळलो....
"अरे उठा, परमेश्वर आला आहे....आपला....आपला ईश्वर आपल्याकडे आला आहे !....
ताडकन् बिछान्यावरून उठून उभे रहात ओरडलो.
"....वेळ गमवू नका....प्रभू आला आहे."
हो, ज्याची आम्ही युगानुयुगं वाट पहात होतो तो आमचा प्रभू आला आहे !
पण हे काय....
सगळे दिवे आपण मालवले आहेत....
किती घाणेरडं आहे आपलं घर !
प्रभू आला आहे. पण त्याला आसन कोणतं देणार ?
चौरंग कुठं आहे ?
मृगाजिन कुठं आहे ?....
च् च् च् किती लाजिरवाणं दिसेल सगळं ?
त्याला का ह्या झोपडीत बसवायचं ?
त्याच्याकरता सिंहासन कुठं तयार आहे !
गुढ्या, तोरणं, पताका....छे छे काहीच तयार नाही.
प्रभू आला आहे आणि...."

पण कुणीतरी म्हणालं,
"कां निरर्थक गोंधळता ?
जवळ काही नसेल तर रिक्त हस्तांनी त्याचं स्वागत करा.
ह्या रिकाम्या झोपडीत तुमच्या श्रद्धेनं भरलेल्या
अंतःकरणानं त्याचं स्वागत करा !"

खरं आहे ! अरे, आपल्या झोपडीची दारं उघडा
त्याच्या स्वागतासाठी शंख फुंका.
ह्या अंधाऱ्या रात्री आपल्या दरिद्री झोपडीत आपला प्रभू
येतो आहे.
त्याच्या स्वागतासाठी ढगांचा गडगडाट होऊ दे.
विजेच्या लखलखाटांत अंधाराला थरथरू दे !
ठिगळ लावलेलं आपलं मृगाजिन इथं आपण पसरूं.
वादळाप्रमाणं अचानक आपला प्रभू ह्या अंधाऱ्या रात्री
आपल्याकडे आला आहे. त्या स्थितीत प्रेमार्द्र अंतःकरणानं
आपण त्याचं स्वागत करूं या ! युगानुयुगं वाट
पाहिल्यावर आपला प्रभू अचानक आला आहे !....
आपला प्रभू आला आहे !....

●



## : ५२ :

मोठ्या डौलात तुझ्या हृदयावर रूळून मला हिणवणारी
सुमनमाला तुझी आठवण म्हणून मागावी अशी तीव्र इच्छा
होती मला ! पण धीर झाला नाही. आणि सकाळी तूं
निघून गेल्यावर एखाद्या भिकारिणीप्रमाणं मी तुझ्या
मंचकापाशी शोधाशोध केली. कदाचित् तुझ्या मालेतलं
एखादं चुरगळलेलं फूल वा यत्किंचित पाकळी सापडेल
म्हणून शोधू लागले .
पण....पण हे काय ?
तुझ्या प्रेमाची कोणती खूण तू मागं ठेवलीस ?
हे फूल नाही, त्याची पाकळी पण नव्हे.
त्याचा मागं रेंगाळणारा सुवास देखील नाही.
हे खड्ग आहे. तुझं महान शक्तिशाली खड्ग.
विजेसारखं तळपणारं, वज्रासारखं कठोर !
मी विचारात असतांनाच पहाटेच्या प्रकाशाचा चोरटा किरण
आंत आला....
किल्‌बिलणाऱ्या पक्षांनी मला विचारलं
"मुली, काय सापडलं तुला ?" .... खरंच काय सांगू ?
हे फूल नाही, त्याची पाकळी नाही त्याचा मागं
रेंगाळणारा सुवास देखील नाही !
हे तुझं भयानक खड्ग आहे !

आणि मग मी विचार करू लागले. किती विचित्र भेट ही !
हे कुठं लपवू ? परिधान करूं ?
छे : छे : काहीतरीच ! माझ्यासारख्या नाजुक स्त्रीला
लाजवणारं नाही कां ? हृदयाशी कवटाळावं तर ते मला
सारखं खुपतंय् !

तरीही मी ते हृदयाशी कवटाळीन ! ही तुझी भेट आहे. त्याचं शल्य मोठ्या अभिमानानं सहन करीन. कारण तू पाठवलेली भेट आहे !

ह्या पुढं मला जगात कोणाचीही भीती राहिली नाही. सारी संकटं आता मला क्षुल्लक वाटतील ! मला सोबत म्हणून मृत्यू पाठवला आहेस ! माझ्या आयुष्याचं शिरस्त्राण त्याला अर्पण करीन. सारे मायापाश ह्या खड्गानं तोडून टाकीन आणि अनिर्बंध, निर्भय जीवन जगेन !

मग आता हे दागदागिने कशाला ? आता कुणाची वाट पहायची ? कुणासाठी आंसू ढाळायचे ? कशाचा आनंद मानायचा ? ना खेद ना खंत ! ना आंसू ना हासू ! प्रभो, तू मला तुझं खड्ग परिधान करायला दिलंस त्यापुढं हे दागिने म्हणजे बाहुलीने नटणं आहे. त्याची काय जरूर ?

●



## : ५३ :

हिरेमाणकांनी अलंकारलेलं, ग्रह ताऱ्यांसारखं
चमचमणारं तुझं कंकण मनाला भुरळ पाडतं !
पण त्यापेक्षा मला तुझं तळपतं खड्ग जास्त आवडतं.
रागानं लाल झालेल्या मावळत्या सूर्य किरणावर, मोठ्या
डौलानं विहरणाऱ्या गरुडाच्या पसरलेल्या विराट
पंखाप्रमाणं ते नजरेत भरतं !
मृत्यूनं मारलेल्या शेवटच्या तडाख्यांत दुःखातिशयानं
हादरणाऱ्या जीवाप्रमाणं ते थरथरतं !
नाशवंत शरीर जळता जळता शेवटी शांत ज्योतीत विलीन
होतं -
त्या ज्योती सारखं तुझं खड्ग तळपतं !
हिरे माणकांनी मढवलेलं तुझं कंकण सुंदर आहे !
पण वज्राधिपते, त्याच हातात धरलेलं तुझं खड्ग,
कल्पनेत सुद्धा भयंकर आहे !
मग हातात धरणं तर दूरच राहिलं
आणि तरीही ते मला अतिशय आवडतं !

●

## : ५४ :

आठवणीदाखल मी तुला काहीसुद्धा मागितलं नाही.
माझं नाव देखील तुला सांगितलं नाही.
तू निरोप घेऊन गेलास
तेव्हा मी पाषाणाप्रमाणं अगदी निश्चल उभी राहिले.
तुझ्याशी काहीच बोलले नाही !

झाडाच्या कलत्या छायेत विहिरीपाशी मी उभी होते.
आपल्याच तंद्रीत गुंग होऊन.
माझ्या मैत्रिणी आपल्या घागरी तुडुंब भरून निघून निघून गेल्या.
जाण्यापूर्वी त्यांनी मला बजावलं
- "लवकर लवकर आटप. सूर्य माथ्यावर येतोय्" पण
माझं तिकडं लक्षच नव्हतं. विचारांच्या तंद्रीत मी एकटीच
तिथं घुटमळत होते.... रेंगाळत होते !

तुझ्या पावलांचा आवाज मला कसा ऐकू आला नाही
कुणास ठाऊक ! एक करुण दृष्टीक्षेप टाकून, क्षीण
आवाजात तू मला म्हणालास -
"मी एक तहानेला प्रवासी आहे"
- आणि मी एकदम दचकून उठले. ओठांशी लावलेल्या
तुझ्या ओंजळीवर माझा घडा रिकामा केला !....
झाडांची पानं खुळखुळली
लांबवरून कोकिळेचा स्वर आला.
पलिकडच्या वळणावरून बकुळीचा सुगंध दरवळला....



आणि....
....आणि जेव्हा तू मला माझं नांव विचारलंस, तेव्हा मी
लाजेनं चूर झाले !
तू आपल्या स्मृतीच्या चौकटीत मला बसवावंस असं काय
विशेष मी केलं होतं ?

पण तुझी तृष्णा मी निवारू शकले ही आठवण मात्र
माझ्या हृदयाला बिलगेल,
त्याला उमलवील,
आणि त्या सुगंधात मी गढून जाईन !

सकाळ संध्याकाळचा पाठशिवणीचा खेळ सुरू झालाय्.
पक्षांची तीच किलबिल चालू आहे.
वर कडुनिंबाची पानं सळसळताहेत....
आणि मी ?
तशीच ह्या झाडाखाली बसले आहे....
तशीच विचार करते आहे....
तिथेच घुटमळते आहे.
रेंगाळते आहे !!

●

## : ५६ :

तूं असा खिन्न का ?
जड डोळयांनी, उदास अंतःकरणानी कां असा बसला आहेस ?
ते बघ, पलिकडे उमललेल्या फुलाकडे पहा !
काट्यांच्या जाळीत सुद्धा कसं हंसत हंसत त्या वाऱ्याशी खेळत बसलंय् ते, मग तूंच का अशी वृत्ति पत्करली आहेस ?
ऊठ, चल उभा रहा. काळ संथपणानं पुढं सरकतो आहे.
लवकर आटप, वेळ गमावू नकोस.
माझा मित्र तुझी वाट पहातो आहे.
ह्या खडकाळ नि निर्जन प्रदेशांत एकट्यानंच तुझी केव्हाची वाट पहातो आहे.
त्याची फसवणूक करणार का ?
आकाश अग्नीचा वर्षाव करतय् ना ? करू दे !
जमीन निखाऱ्यासारखी धगधगली आहे नि वारा अंगाची लाही करतोय् ?
करू दे.
तू त्याची पर्वा करू नकोस !
तुझ्या अंतःकरणातला आनंदाचा झरा जिवंत आहे ना ?
मग तुझ्या पावलागणिक रस्त्यातले निर्जीव दगड सुद्धा तुझ्या स्वरांत स्वर मिसळून गाऊ लागतील.
चल ऊठ.
उशीर करू नकोस.

●



## : ५६ :

प्रभो,
माझ्यामुळं तुझ्या प्रेमाला परिणिती प्राप्त झाली आहे !
माझ्यामुळंच तूं इथपर्यंत पायउतार झाला आहेस !
हे स्वर्गाधिपते, मीच जर नसतो
तर तुला प्रेम करायला जागाच उरली नसती !

आणि त्यामुळंच की काय, तुझ्या साऱ्या वैभवाचा तू मला वाटेकरी करून घेतलं आहेस....
माझ्या ह्या मृत्तिकामय जीवनांतून तू आपली मनीषा पुरी करून घेतो आहेस !
आणि तुझ्या आनंदाचा खेळ अखंड माझ्या हृदयांत चालू असतो !
राजाधिराज, माझं मन आकृष्ट करण्यासाठीच तू स्वतःला विविध रंगात नटवतोस ! तुझं प्रेम आणि माझी प्रीति ! ह्या दोघांच्या प्रीतिसंगमात तू मूर्तिमंत अवतरतोस !

●

## : ५७ :

प्रकाश ! माझा प्रकाश ! साऱ्या विश्वात भरून राहिलेला
प्रकाश ! डोळे दिपवणारा, हृदयाला संजीवनी देणारा
प्रकाश !
प्रिये, हाच प्रकाश माझ्या हृदयाचा गाभा आहे ! माझ्या
प्रेमाच्या तारा तो अखंड छेडत असतो.... आकाशाला
उमलवतो, वाऱ्याला थयथया नाचवतो आणि साऱ्या
धरणीला खदखदा हसवून हसवून घुसळतो !

ह्याच प्रकाशझोतांवर पतंग आपले पंख पालवतो.
ह्यावरच जाई नि जुई सुगंधाचा वर्षाव करतात !!
प्रिये हा तो प्रकाश.... सोनेरी ढगांआडून डोकावणारा, नि
हिऱ्यांतून अनंत कलांनी खुणावणारा !
पानापानांना असीम आनंदानं डोलावणारा प्रकाश तो हाच.
आकाशगंगा दुथडी भरून वाहते आहे आणि आनंद
किनाऱ्याचे बांध फोडून ओसंडतो आहे.
विश्वाच्या वैभवशाली सागराला
आनंदाची भरती आणणारा प्रकाश देखील हाच !!

●

## : ५८ :

ह्या आनंदाचे सर्व स्वर
माझ्या या शेवटच्या गीतांत रुजवूं दे !
साऱ्या ब्रह्मांडाला हिरवळीवरून पुढं धावायला लावणारा
हा आनंद -
- जीवन नि मरण ह्या जुळया भावंडांना साऱ्या विश्वांत
बेभानपणं नाचवणारा हा आनंद -
घनघोर वादळावत् सारं जीवन खळाळून हसवणारा हा
आनंद
दुःखाच्या आरक्त कमलांवर दवबिंदूच्या स्वरूपांत
निश्चलपणं आपले अश्रू आवरणारा हा आनंद !
आपली सर्व संपत्ती धरतीमातेच्या चरणी अर्पण करणारा
आणि त्या असीम त्यागाबद्दल एक शब्द देखील न
उच्चारणारा हा बैरागी - आनंद.
ह्या आनंदाचे सर्व स्वर
माझ्या ह्या शेवटच्या गीतांत रुजवूं दे.

●

## : ५९ :

प्रिया,
पानापानांवर नाचणारा हा प्रकाश
हेमंतात इतस्ततः हुंदरणारे हे मेघ,
....माझ्यावर अमृताचा वर्षाव करून निघून जाणारी ही
गार वाऱ्याची झुळूक
हे सारं काही तुझ्या, माझ्यावरल्या प्रेमाचं द्योतक आहे !
माझे डोळे दिपवणारा हा अरुणोदय....
छे : तो अरुणोदय नव्हे
माझ्या हृदयाला तू पाठवलेला संदेश आहे....
त्या दूर क्षितिजाआडून तुझा चेहरा माझ्याकडं वळलाय्.
तुझी माझी नजरानजर झाली आहे....
आपण एकमेकांच्या डोळ्यांत खोलखोल बघतोय्....
आणि माझं हृदय तुझ्या पायावर मी वाहिलं आहे....
ह्या अरुणोदयाच्या प्रकाशांत मला हे सारं स्पष्ट
दिसतंय् !!!

●



## : ६० :

विश्वसागराच्या अनंत किनाऱ्यावर मुलं येतात !
वर असीम आकाश अविचल असतं !....
समुद्राच्या अवखळ लाटा आनंदानं आंदोलत असतात !
हे सगळं पाहून ती मुलं आनंदानं फेर धरून नाचू
लागतात !

कुणी किनाऱ्यावर वाळूचे किल्ले बांधतात
कुणी रिकाम्या शिंपल्यानं त्यांना अलंकारतात....
वाळलेली पानांची बोट करून कुणी त्या अथांग
सागरावर सोडून देतात
तर कुणी नुसतंच हे सारं पहात बसतात !
विश्वाच्या त्या अथांग किनाऱ्यावर आपआपल्या बुद्धीनुसार
मुलं खेळतात !

रत्नाच्या अभिलाषेनं पाणबुडे त्याच्या तळाशी बुडी
मारतात,
व्यापारी व्यापाराकरता तरंगत तरंगत दूर जातात.
....पण मुलांना काय त्याचं ?
त्यांना पोहता येत नाही.
किनाऱ्यावरच्या शिंपा गोळा करून ते त्या पुन्हा दूर
भिरकावून देतात....
तळाशी असलेल्या रत्नांची त्यांना अभिलाषा नसते....
समुद्रात जाळं फेकण्याची कुशलताही त्यांच्या अंगी नसते !
हे सारं पाहून सागर त्यांच्याबरोबर खिदळतो....
किनाऱ्यावरली रानफुलं त्यांच्यात रमून जातात !....

आई आपल्या लहानग्याला पाळण्यांत जोजावताना
अर्थहीन गीत गाते.... तसं त्या आक्राळविक्राळ लाटा
मुलांना गाणं म्हणून रिझवतात.
विश्वाच्या त्या किनाऱ्यावर मुलं एकत्र येतात....
विराट वादळ पाण्याचे पर्वत हेलकावतात.
आकाशावर नेऊन थडकवतात....
हजारो तारू समुद्रात झगडतात.... अखेर बुडतात....
भयानक मृत्यू अक्राळ विक्राळ स्वरूपानं लाटांवर
तांडवनृत्य करत असतो....
पण मुलांचं तिकडे लक्ष नसतं !
विश्वाच्या त्या अथांग किनाऱ्यावर ते चिमणे भेटतात....
हसतात.... खिदळतात....!!
●



## : ६१ :

चिमुकल्या बाळाच्या नेत्रांवर बागडणारी निद्रा !....
कुठून आली माहीत आहे कुणाला ?
होय,
दूर रानांतल्या एका खेड्यांत, लुकलुकणाऱ्या काजव्याच्या
प्रकाशांत दोन भित्र्या सुगंधी नि सुस्वरूप कलिका
आनंदानं बागडत होत्या.
त्यांच्या कुशीत ही निद्रा होती....
आणि तिथूनच ती ह्या चिमण्यांच्या नेत्रांचं चुंबन घेण्यासाठी
धावत धावत आली असं म्हणतात !

आणि हा चिमणा निजल्यावर त्याच्या ओठांवर विलसणारे
हे हास्य ?
हे कुठं होतं माहिताय् ?
होय !
एका हेमंताच्या रात्री चतुर्थीची चंद्रकोर हसत हसत एका
सुवर्णमेघाला भेटली....
आणि त्यांच्या मीलनातून दवांनं धूसरलेल्या पहाटे ह्या
हास्याचा जन्म झाला
तिथूनच हे हास्य नाचत बागडत ह्या चिमण्या ओठांवर
येऊन बसलं असं म्हणतात !!

आणि ह्या चिमुकल्याच्या शरीरावर बहरणारी गोड
टवटवी....
इतके दिवस कुठं लपली होती ? माहीत आहे कुणाला ?
होय....
ह्या बाळाची आई जेव्हा सुकुमार तरुणी होती तेव्हा तिच्या
हृदयांत नाजूक प्रेमाच्या रूपानं ती लपली होती
.... आज तिथूनच ह्या मनोहर मुलाच्या अंगाखांद्यावर
बागडायला नाचत गात आली
असं म्हणतात.

●



## : ६२ :

बेटा,
विविधरंगात बुडणारे हे मेघ,
सूर्य प्रकाशांत सोन्यानं चमकणारे हे जलांचे तुषार
रंगीबेरंगी नटणारी ही फुलं....
ह्या सगळ्यांचे अर्थ, मी तुला जेव्हा वेगवेगळी नि
चित्रविचित्र खेळणी आणून देतो तेव्हाच मला कळतो !

आणि जेव्हा मी गाणं म्हणून तुला नृत्य करायला लावतो
तेव्हा मला पानांच्या सळसळीतलं गीत ऐकू येतं
.... आपल्या लाटांच्या संगीतानं ह्या धरेच्या हृदयात
प्रतिध्वनी उमटवणारा सागर मला डोळ्यापुढं दिसू
लागतो !

तुझ्या आधाशी हातांवर मेवा मिठाई ठेवतांना
फुलाच्या वाटीतल्या मधाचं कोडं उलगडतं
फळांत गोड रस कां भरला हे समजू लागतं !

आणि तुझ्या ओठांचं चुंबन घेऊन तुला हसवतांना
अरुणोदय होताच दिशा कुठल्या असीम आनंदानं
बागडतात ह्याची कल्पना येते....
आणि वसंताचा गार वारा मला कां पुलकित करतो हे
अनंत कालापासून पडलेलं कोडं, एकदम उलगडतं !!

●

## : ६३ :

अपरिचितांशी तू मला परिचित केलं आहेस. परकीयांच्या घरांत तू माझा शिरकाव करून दिलास, दोन दूरस्थांमधलं अंतर तू कमी केलंस आणि दोन अनोळखी व्यक्तींत तू बंधुभाव निर्माण केला आहेस !

आणि आज हे सारं ओळखीचं वातावरण सोडून जातांना माझ्या हृदयांत कालवाकालव होते आहे ! त्या नव्या सृष्टीत देखील चिरपरिचित वातावरण आहे. आणि तिथे देखील तुझं वास्तव्य आहे ह्याचा मला विसर पडला आहे !

जन्म वा मृत्यू : ह्या लोकांत किंवा परलोकांत, जिथं जायचं तिथं तुझ्या सांगाती जायचं आहे. तूच माझा अनंत कालाचा एकमेव सवंगडी आहेस ! अपरिचितांशी स्नेहाच्या सांध्याने सांधणारा तूच आहेस.

तुझी खूण पटली म्हणजे साऱ्यांची खूण पटते. मग सारे मार्ग मोकळे होतात. प्रभो, म्हणून माझी ही एकच प्रार्थना आहे. ह्या अनंत कालापासून चालत असलेल्या प्रवासांत मी तुझ्या स्पर्शाला कधीच आंचवणार नाही. एवढीच माझी इच्छा तृप्त करावीस !!

●



## : ६४ :

त्या ओसाड रानांतून वाहणाऱ्या नदीकिनारी, उंच उंच वाढलेल्या गवतात मी उभा होतो ! तिथं आपल्या पदरानं पणती झाकून ती जात असतांना मलादिसली. तिला थांबवत मी म्हणालो
– "ही पणती घेऊन कुठं निघालीस तू ? माझ्या घरांत सर्वत्र अंधार पसरला आहे ! मला देतेस ही पणती ?"

तिनं काही क्षण आपले काळेभोर डोळे माझ्यावर स्थिरावले ! नंतर लांब क्षितिजाकडे पहात म्हणाली, "ही पणती या नदीवर सोडावयाला मी आले आहे. सूर्यास्त होतोय्. अंधार पडू लागला आहे. ही पणती मला नदीवर सोडू दे !"

आणि मग तिनं ती पणती नदीवर सोडली. लाटांच्या खळबळीत ती पणती देखील सामील झाली !! विनाकारण वाहून गेली !

अमावस्येची रात्र काजळली होती. त्या अथांग अंधारांत मला ती दिसली. तिच्या हातांत नंदादीप पाहून मी तिला म्हणालो
"तुझ्या घरी तर पणत्यांचा इतका झगझगाट आहे. मग कशाला हवा तो दिवा. उलट माझ्या घरी मात्र काळोखाचे राज्य आहे. मला देतेस हा नंदादीप ?"

पुन्हा तिने आपले काळेभोर डोळे माझ्यावर स्थिरावले. कसल्यातरी विचारांत ती पडलीसे वाटले. नि शेवटी म्हणाली
- "हा प्रकाश मला आभाळाला अर्पण करावयाचा आहे ! आकाशांत पहा किती अंधार आहे !!"

आणि तो नंदादीप कितीतरी वेळ तसाच व्यर्थ जळत होता. अगदी शांत नि मंद ! मग केव्हा विसावला कुणास ठाऊक !

चंद्र सूर्याचा पाठलाग करीत पश्चिमेच्या घरांत शिरल्यावर अंधारानं आपलं राज्य प्रस्थापित केलं. त्या थंडीच्या कडाक्या रात्री ती मला पुन्हा दिसली. हातांतल्या मेणबत्तीला आपल्या हृदयातली ऊब देत ती एकटीच निघाली होती ! मी तिला म्हणालो,
"ह्या माझ्या घरांतल्या अंधारात मी एकटाच कधीचा ठेचाळतो आहे आणि हा दिवा घेऊन कुठं निघाली आहेस तू ? कुणाला शोधते आहेस ? मला दे ना हा दिवा !"
ती थबकली ! माझ्याकडे बराच वेळ आपल्या काळ्याभोर डोळ्यांनी पहात म्हणाली - "तो पहा तिकडे प्रकाशाचा तांडा चालला आहे ! त्यांच्यात मला हा दिवा सोडावयाचा आहे !"
आणि तिच्या बरोबरच तिनं सोडलेला दिवा देखील व्यर्थच त्या तांड्यासहित माझ्या दृष्टीआड झाला !!

●



## : ६५ :

प्रभो
माझ्या ह्या शिगोशिग भरलेल्या आयुष्याच्या घटातून
कुठलं अनुपम पेय तुला मिळणार आहे ?
तुझी कृती माझ्या लोचनांतून अवलोकतांना तुला आनंद
होत नाही का ?
स्वतःचंच चिरकालीन संगीत माझ्या श्रवणांतून ऐकताना
तू बेभान होत नाहीस ?

कवींद्रा, तुझं विश्व माझ्या अंतरात काव्य गुंफित असतं आणि तुझ्या आनंदानं अनुपम संगीताची संगत साधत असते. तू प्रेमानं आत्मसमर्पण करतोस आणि त्याचा आसमंतात पसरलेला सुगंध देखील तूच आस्वादत असतोस !

●

## : ६६ :

जी माझ्या अस्तित्वाच्या मुळाशी बसली आहे
जिनं आजपर्यंत माझं अंतर्मन सोडलं नाही आणि जग
शिवलं नाही....
शब्द तिला रिझवण्यासाठी अखंड नाचले....
मन वळवण्यासाठी अविश्रांत झटले ! पण निराश झालेत् -
जिला माझ्या हृदयाशी कवटाळून त्रिखंड पालथं घातलं....
जिच्यामुळं कीर्तीशिखरावर चढलो.... मानहानीच्या खोल
दरीत घरंगळलो....
माझ्या जागृतीवर वा स्वप्नांवर वा आचारांवर नि
विचारांवर जिनं राज्य चालवलं.... आणि तरीहि अलिप्त
राहिली.
जिच्यासाठी मोठमोठे लोक माझ्याकडे घिरट्या घालून
निराश होऊन परत गेलेत.
जिला जगातलं कुणीही समजू शकलं नाही -
कुणाच्याही दृष्टिपथात् पडली नाही -
फक्त तुझ्यासाठीच नेत्रांत प्राण साठवून बसली होती.
ती माझ्या ह्या शेवटच्या गीतांत प्रभो तुला
माझी अखेरची वंदना !

●



## : ६७ :

ह्या क्षितिजापासून त्या क्षितिजापर्यंत आसमंत पसरलेलं
आकाश तूच आहेस,
आणि प्रभो,
त्या आकाशातळी बांधलेलं लहानसं घरटं हे देखील
तुझंच रूप आहे !
त्या चिमुकल्या घरट्यांत चित्रविचित्र रंगांत नटलेलं आणि
दिवसरात्र किलबिलाटानं बागडणारं हे तुझ्या प्रेमाचं
प्रतीक आहे !
पूर्वेच्या महालांतून आपल्या नाजुक गुलाबी हातांत
सोन्याची परडी घेऊन रूपेरी फुलांची पखरण
धरणीमातेवर करत प्रभा अवतरते -
आणि संध्याकाळच्या प्रशांत एकांती गाई-गुरं परतलेल्या
निर्जन नि एकलकोंड्या वाटेनं आपल्या सोनेरी
कलशांतून शांततेचा सडा शिंपित पश्चिमेच्या प्रशांत
प्रांगणातून संध्या प्रवेशते -
पण त्या दोहोंच्या मंदिरामधोमध जिथं असीम आकाश त्या
घरट्यांतल्या चिमण्या जीवाला आपले पंख पालवायला
पाचारण करतं, तिथं अकलंकित शुभ्रता विराजत असते....
तिथं दिवस नसतो.... रात्र नसते....रूप नसतं....रंग
नसतो.... आणि शब्द देखील शांततेच्या कुशीत तोंड
खुपसून बसले असतात !!

●

## : ६८ :

पहाट होताच तू पाठवलेल्या सहस्त्र रश्मी अत्यंत आतुरतेनं माझ्या दाराशी दिवसभर उभ्या असतात. आणि संध्याकाळ होताच परत जातात.... माझ्या अश्रूंचं, निश्वासांचं आणि गीतांचं बाष्प तुझ्या चरणाशी अर्पण करतात
अत्यंत आनंदानं तू ते आपल्या हृदयाशी कवटाळतोस त्यांना चित्रविचित्र आकार देतोस, क्षणोक्षणी पालटणाऱ्या रंगांनी रंगवतोस... त्या विविध रंगाचे वस्त्र जणू मोठ्या अभिमानानं पांघरतोस !.... किती हळूवार, किती चंचल, किती नाजुक नि किती करूण ! आणि म्हणूनच की काय प्रभो, तुझ्या प्रसन्न सुहास्यावर ते आपली कारुण्याची छाया पांघरतात !!

●



## : ६९ :

माझ्या नसांनसांतून वाहणारा जीवन प्रवाहच साऱ्या विश्वांतून वाहतो आहे आणि त्याला आनंदानं डोलवतो आहे !
ह्या धरणीवरच्या धुळीला, अगणित पानाफुलांना, आनंदानं डोलवणारा, मला देखील असीम आनंदानं, हास्यानं खळखळून सोडतो !
आसमंतात पसरलेल्या महासागरावर भरती ओहोटीच्या लाटा आणणाराच, जीवनमृत्यूचा झोपाळा आंदोलीत असतो !
ह्याच जीवनप्रवाहानं माझ्या शरीरावर आनंदाचं साम्राज्य पसरवलं आहे आणि माझा अभिमान म्हणजे माझ्या रक्तांत भिनलेलं युगायुगाचं स्पंदनच आहे !!

●

## : ७० :

ह्या आनंदाच्या तालांत आपली पावलं टाकणं
तुला शक्य होणार नाही कां ?
ह्या हृदयद्रावक सौख्याच्या सांगाती आपण देखील
फेर धरून नाचावं असं तुला वाटत नाही ?

साऱ्या वस्तुमात्रांचा ओघ पुढंच धावत असतो.
वाटेत कुठंही तो थांबत नाही. कधीही मागं वळून बघत
नाही
कि कुठल्याही अडचणींना दाद देत नाही.
त्याचा प्रवास अखंड चालूच आहे.
त्याच्याच तालावर पाय नाचवत;
त्या बेमान स्वरात स्वर सामावत, चित्रविचित्र रंग उधळत,
सुगंध दरवळत, नाचत नाचत
ऋतु येतात अन् आनंदात स्वरांत स्वर गुंफत
निघून जातात. क्षणोक्षणी अमर्याद
आनंद उमलतो आणि आनंदाची,
स्वरांची नि रंगांची वेणी गुंफत विरामतो

त्याच आनंदाच्या तालांत आपली पावलं
पुढं टाकणं तुला शक्य होणार नाही कां ?
●



## : ७१ :

मी माझ्या चित्रविचित्र रंगानं तुझ्या शुभ्र तेजोवलयावर
छाया पाडावी - अशीच तुझी माया आहे !
स्वतःभोवती अभेद्य आवरणं आवळून एकांतात अभंग
आळवीत असतोस -
ही तुझी एकांत वृत्ती माझ्यांत भिनली आहे. !
ह्या तुझ्या हृदयद्रावक गीतानं आकाशात विविध
पडसाद उमटतात... हास्य...लास्य...अश्रु....आशा....
निराशा.... लाटा उसळतात पुन्हा ओसरतात....
स्वप्नांचा मनोरा उंचावतो....पुन्हा भंगतो.... !
मी म्हणजे तुझ्या पराजयाचं प्रतीक आहे !
तूच उभारलेल्या ह्या पडद्यावर दिवस रात्रीच्या कुंचल्यानं
अनंत आकडे रंगवतोस. त्यामागं तुझं सिंहासन, साध्या
सरळ रेषा टाकून देऊन आश्चर्यकारक वळणदार, वेड्या
वाकड्या रेषांनी तू सजवलं आहेस.... तुझ्या नि माझ्या
नृत्यानं सारं ब्रम्हांड सामावून घेतलं आहे ! तुझ्या नि
माझ्या गीतांनी सारं अवकाश थरथरतय्.
आणि आपल्या पाठशिवणीच्या खेळांत युगामागुन युगं
धावताहेत.
●

## : ७२ :

माझ्या हृदयात सामावलेला,
आपल्या अदृष्य नि गाढ स्पर्शानं माझ्या अंतरमनाला
जागृत करतो - !
आपली प्रसन्नता माझ्या नयनांत ओततो !
माझ्या हृदयवीणेवर सुखदुःखाचे स्वर छेडतो !
- मायेचा धागा सोनेरी, रुपेरी, नील
हरित या क्षणिक रंगात तो विणतो -
त्या अतीव नाजुक वस्त्रांतून त्याची पावलं डोकावतात
नि त्याच्या स्पर्शानं मी सारं काही विसरतो !
दिवस उगवतो.... युगं मावळतात !
तो नानाविध रूपं धारण करतो,
चित्रविचित्र सोंगं वठवतो.
अथांग दुःखानं व अनुपम सुखानं
माझं हृदय हेलावून सोडतो !!

●

## : ७३ :

मुक्त होण्याची मला स्वतःलाच इच्छा नाही.
स्वातंत्र्यानं आपल्या आनंदी बाहुपाशांत मला
आवळून घेतलं आहे !
सुगंधानं व सुमधुरतेनं ओथंबलेली सुरा तू आपल्या
हातानं ह्या माझ्या घड्यांत ओततो आहेस !
आणि तो घट शिगोशिग भरतो आहेस !

तुझ्या ज्वलंत ज्योतीनं मी माझे दीप प्रज्वलित करीन
आणि प्रभो तुझ्या मंदिराच्या गाभाऱ्यांत शान्तपणं
तेवण्यासाठी ठेवीन !
आणि माझ्या इंद्रियांची दारं सतत उघडी ठेवीन.
तुझं रूप पाहीन, तुझं गायन ऐकत तुझ्या
पदकमलांना स्पर्श करीन
माझ्या इंद्रियांची सार्थकता ह्यातंच आहे !
आणि त्यातच माझी क्षणभंगुर माया पेट घेईल.
....आनंदाचा प्रकाश सगळीकडं पसरेल....
माझ्या आशा-आकांशा
प्रेमाच्या परिपक्वतेनं डोलू लागतील !!

●

## : ७४ :

सूर्य अस्तंगत झाला आहे !
संध्याकाळच्या लांब लांब सावल्या
अंधाराच्या कुशीत दडून गेल्या आहेत !
चारी बाजूंनी अंधारून आलं आहे....
मला आता नदीवर गेलंच पाहिजे.
माझा हा रिकामा घडा भरावयाचा आहे !
हे संथपणानं माझ्या कानांवर पडणारं नदीचं आर्त
संगीत.... निर्जन पायवाटेवरला हा एकांत.... हा पडलेला
वारा.... ह्या सर्वांच्या पार्श्वभूमीवर लाटांचं अवखळ नृत्य
मला साद घालतंय् !!
पण तिथून परत येईन की नाही ?
कुणी सांगावं ?
कदाचित् येणार देखील नाही ?
तिथं मला कोण भेटणार आहे हे सुद्धा मला माहीत नाही.
दूरवर दिसणाऱ्या किनाऱ्यापाशी नदीच्या लाटांवर एक
होडी हेलावते आहे आणि त्यात कुणी अज्ञात अनामिक
आपला पावा वाजवतो आहे.
ह्या विषण्ण वातावरणांत ते
आर्त स्वर नदीच्या खळबळीशी स्पर्धा करताहेत.
इतकंच मला ठाऊक आहे !!
●



## : ७५ :

तूं आम्हाला देणग्या देतोस, त्या आमच्या साऱ्या इच्छा
तृप्त करतात आणि परत तुझ्याजवळ अक्षय परततात.

ही नदी आपली सारी कामं यथासांग पार पाडते आणि
ह्या रानावनांतून घाईघाईनं मार्ग आक्रमत तुझ्या
चरणारविंदाचं क्षालन करायला परतते.

ही पुष्पं आपल्या सुगंधानं सारं विश्व भारावून टाकतात
पण त्यांच्या कृतकर्तव्याची तृप्ती तुझी पूजा केल्यानंच होते !

खरंच प्रभो तुझी पूजा ह्या जगांत अखंड चालू असते !!

कवीच्या काव्यांतून त्यांना रुचेल तसा अर्थ रसिक घेतात.
पण त्याचा खरा अर्थ मात्र
तुझ्या भोवती भोवती फेर धरून असतो !
●

## : ७६ :

प्रभो,
दिनप्रतिदिन, दिवसरात्र मी तुझ्या सामोरी सतत राहू शकेन ? माझ्या प्रभूच्या मंदिरांत प्रार्थनेसाठी हात जोडून मी त्याच्या अगदी समोर याचना करू शकेन ?
आकाशाच्या या असीम नीलाखाली तारकांच्या मणी-मोत्यांनी नटलेल्या रजनीसमवेत, किंवा सारं विश्व सोन्यानं अलंकारणाऱ्या भास्करासांगाती मी माझं दारिद्य पदरी बांधून प्रभो, तुझ्यासमोर येऊ शकेन ?
आपल्या नित्यकर्मात चूर झालेल्या तुझ्या जगात, कामाच्या प्रचंड पर्वताशी झगडणाऱ्या ह्या धांदलीत, मी देखील तुझी वाट पहात, तुझ्या सान्निध्य उभं राहण्याचं सद्भाग्य मला कधी लाभेल ?
आणि सर्व कामधंदा संपल्यावर, उत्सवाचं पारणं फिटल्यावर, एकांताचं बोट धरून
थरथरत्या अंतःकरणानं तुझ्या सामोरी मला यावयाला मिळेल ?

●

## : ७७ :

प्रभो,
तुला सन्माननीय समजून सर्वेश्वरापासून दूर उभा राहतो
आपलाच समजून अभिमानानं जवळ येत नाही.
पिता समजून प्रणाम करतो
मात्र मित्रत्वानं मिसळून हातांत हात घेत नाही !
आपल्या बादशाही सिंहासनावरून खाली उतरून तू
किती सहजतेनं खाली माझ्याजवळ येतोस !
पण मी तुला सहचर समजून माझ्या अंतःकरणांत
सामावून घेत नाही !
तू माझा सहोदर आहेस : इतर बांधवांसारखाच.
पण तुझ्या इतकी त्यांची पर्वा मी करत नाही
माझ्या सर्वस्वांत तुला भागीदार करतो
- पण त्यांना मात्र दूर ठेवतो.
सुखाच्या सागरांत किंवा दुःखाच्या दारुणतेत
मी त्यांच्यात सहभागी होत नाही
माझी धाव तुझ्याकडे असते.
त्यामुळंच की काय
त्यांच्या आयुष्यात माझं जीवन झोकून देत नाही
जीवन सागरापासून दूर दूर होऊन जातो.

●

## : ७८ :

ह्या विश्वाची निर्मिती नुकतीच झाली होती. साऱ्या तारका आपल्या तेजानं लुकलुकत होत्या. सारी पृथ्वी ताजेपणानं टवटवीत दिसत होती.... त्या चांदण्यांच्या प्रकाशांत आकाशातले देव साऱ्या सहकाऱ्यांच्या समवेत आनंदानं फेर धरून नाचूं लागले ! साऱ्यांचा आनंद उतूं जाऊ लागला. त्या परिपूर्ण चित्रनिर्मितीच्या आनंदानं ते ओथंबून गेले होते, आणि फेर धरून नृत्य करत होते !
पण तितक्यांत कुणीतरी म्हणालं....
"ह्या दीपमालिकेत कुठलातरी एक दीप दिसत नाही !
एक चांगला तारा दिसत नाहीये !...."

आणि त्यांचे नूपुर एकदम थबकले. विणेच्या तारा एकदम थांबल्या !.... मृदंगाचा ध्वनी आवरून बसला....फक्त लांबवरून, विरलेल्या संगीताचा प्रतिध्वनि आला. आणि मग पुन्हा शांतता पसरली !
दुःखातिशयाने सारे देव ओरडले....
"आणि तो हरवलेला तारा सर्व ताऱ्यांपेक्षा तेजस्वी होता.
साऱ्या अनंतात तो सुंदर होता....
साऱ्या वैभवाचा तो कळस होता !
-- चला आपण त्याला शोधून काढूं !".....



आणि त्या क्षणापासून त्या हरवलेल्या ताऱ्याचा शोध सुरू झाला....
अजूनही सुरूच आहे !
अजूनही सारे देव स्फुंदत असतात....
"– त्या तेजस्वी ताऱ्याच्या हरवण्यामुळं विश्वाच्या आनंदाला गालबोट लागलं आहे"

– त्या हरवलेल्या आनंदाचा शोध अव्याहत चालूच आहे !

पण मध्यरात्रीच्या निःशब्द एकांतात
त्या चिमुकल्या चांदण्या गालातल्या गालात हसतात.
एकमेकींच्या कानात कुजबुजतात – "ही शोधाशोध विनाकारण आहे. आमच्यापैकी कुणीच हरवलं नाही !"
सगळी परिपूर्णता अभंग आहे.... अभेद्य आहे !"
पण देवाधिदेवांची शोधाशोध चालूच आहे....
चालूच आहे....!

●

## : ७९ :

आणि ह्या उरलेल्या आयुष्यांत देखील जर आपलं मीलन
व्हायचं नसेल तर त्याची जाणीव मला जन्मभर असू दे !
ह्या दुःखाचा मला क्षणभर सुद्धा विसर पडू नये !
जागृतावस्थेत या स्वप्नांत देखील
ह्या दुःखाला मला कवटाळू दे !

जगाच्या गजबजलेल्या बाजारात दिवसेंदिवस माझ्या
पदरात यश पडतय् - तरी देखील मी काहीच मिळवलं
नाही. असंच मला वाटू दे. तुझ्या विरहाचं दुःख क्षणभर
सुद्धा विसरू नये.
जागृतावस्थेत वा स्वप्नांतसुद्धा
मला ह्या दारूण दुःखाला कवटाळू दे !

ह्या रस्त्याच्या कडेला मी श्रांत नि क्लांत होऊन गुडघ्यात
मान खुपसून
किंवा ह्या धुळीत विश्रांतीसाठी पथारी पसरतो.
तेव्हा देखील माझा प्रवास अजून अपूर्णच आहे
ही जाणीव मला असू दे.
तुझ्या विरहाच्या दुःखाला जागृतावस्थेत वा स्वप्नात सुद्धा
मला कवटाळू दे !

माझा प्रासाद फुलांनी श्रृंगारल्यावर, आनंदाची कारंजी
चारी बाजूंना उडत असतांना तुला आमंत्रणच द्यायला
विसरलो आहे हे दुःख मला सतत डांचू दे.
जागृतावस्थेत व स्वप्नांत सुद्धा
मला सतत ह्या दुःखाला कवटाळू दे !!

●



## : ८० :

हेमंतात इतस्ततः हुंदडणारा मी एक उनाड अभ्रखंड आहे !
आणि तू साऱ्यांचा स्वामी चिरप्रकाशित सूर्यराज आहेस !
तुझ्या स्पर्शानं मी माझं जडत्व विरून अजून तुझ्यात
विलीन होऊ शकलो नाही. आणि तेवढ्याचसाठी मी युगं
मोजत पडलो आहे ! तुझ्यापासून अनंत अंतरावर त्या
अंतिम क्षणाची वाट पहात कशीबशी कालक्रमणा करत
घुटमळतो आहे !

आणि हाच जर तुझा खेळ पुढंही चालणार असेल,
आणि अशीच जर तुझी इच्छा असेल,
तर माझ्यातील स्वप्नांचासारा फोलपणा शोषून घे !
त्याला रमणीय रंगात रंगव !
सोन्याच्या पाण्यानं खुलव आणि चित्रविचित्र आकार
देऊन ह्या चंचल वाऱ्यावर मोकाटपणानं सैरभैर
विहरण्यासाठी सोडून दे !

आणि मग तुझी इच्छा होईल तेव्हा एखाद्या प्रशांत आणि
गंभीर शर्वरीत ह्या खेळाला पूर्णविराम दे ! उषेच्या
सुहास्य वदनानं विभूषिलेल्या शांत नि शुचिर्भूत समयी
तुझं नि माझं चिरमीलन होऊ दे !....
त्या अंतिम क्षणाचीच
वाट पहात मी रानोमाळ घुटमळतो आहे !!

●

## : ८१ :

व्यर्थ गमावलेल्या वेळेबद्दल कितीतरी वेळा मी पश्चात्ताप करत बसे, पण नाही, प्रभो, माझा क्षण अन् क्षण तू आपल्या हातांनी घडवत असतोस !

प्रत्येक प्राणिमात्रांच्या गाभ्यांत बसून तुझा हा उद्योग अखंड चालू असतो. बीजाचे तू पुढच्या क्षणी रोपट्यांत रूपांतर करतोस; कलिकांना फुलांत बहरवतोस आणि फुलांना फळांची परिपक्वता देतोस.
प्रत्येक क्षण प्रत्येकाला सारखा पुढं नेत असतो !

त्या आळसावलेल्या रात्री मी माझ्या बिछान्यावर पहुडलो.
मला वाटलं माझं काम पूर्णपणे बंद झालं असेल.
हा सारा वेळ मी व्यर्थ घालवला असेल.... पण पहाटे उठून पहातो तो माझ्या मनोमंदिरातल्या बागेत शेकडो फुलांना बहर आला होता !.....
शेकडो कळ्या हसत होत्या !!

●



## : ८२ :

तुझ्या जवळ काल अमर्याद असतो. क्षणांची बंधनं तोडून तिथं तो पोहोचला असतो ! दिवसा मागोमाग रात्री निघून जातात तुझ्या बागेतल्या फुलांप्रमाणं वर्ष उमलतात नि कोमेजून जाता. पण तू वाट पहात उभा असतोस.
ह्या रान फुलाला उमलवित युगामागून युगं धावताहेत.

प्रभो, पण आम्हा पामरांजवळ तेवढी निश्चिंती नाही....
आणि म्हणूनच प्रत्येक क्षणासाठी आम्हाला धडपड करावी लागते.... प्रत्येक वेळी घाई करावी लागते.
कालदरिद्री माणसाला उशिरा पोहोचून चालत नाही.
तुझ्या पूजनासाठी मी घाई करतो.
वाटेत अनेक दुःखी कष्टी भेटतात....
त्यांची समजूत घालण्यांत माझा अमूल्य वेळ खर्च होतो....
तुझं पूजन तसंच रहातं
तुझ्या मंदिरापाशी पोहोचायला खूप उशीर होतो !
आणि ह्या धकाधकीत तुझ्या आरतीची वेळ तर निघून जाणार नाही ना अशी मला सारखी भीती वाटत असते....
पण छे....
तुझ्या मंदिरापाशी पोहोचताच ही भीती खोटी ठरते.
तू माझी वाट पहात थांबला असतोस !

●

## : ८३ :

माते माझ्या दुःखाश्रूंनी गुंफलेली एक मौक्तिकमाला मी
तुझ्या कंठात घालीन !
नभोमंडळातल्या तारकांनी तुझ्या पायांत चमचमणारी
सुवर्ण पैंजण घातलीत.
पण माझी मौक्तिकमाला मात्र तुझ्या हृदयावर रुळेल.

यश आणि धन ही तुझ्या इच्छेनुरूप आम्हाला मिळतात
- त्यांचा उगम तुझ्यातच आहे.
पण माझे हे अश्रु - हे केवळ माझे आहेत
- तीच माझी स्वतःची दौलत आहे.
आणि म्हणूनच की काय तुला ही माला अर्पण करताच
आनंदाश्रूंनी तू मला जवळ करतोस !!

●



## : ८४ :

हे विरहाचं दारूण दुःखच साऱ्या विश्वात पसरलं आहे.
अनंत आकाशांत देखील ते चित्रविचित्र रूपानं मिरवत
असतं !!
ग्रीष्मातल्या शांत रात्री ते तारकांच्या डोळयांनी खुणावतं,
तर वर्षाऋतूंत पर्णाच्या खुळखुळी प्रमाणं भासणाऱ्या
गीतांनी सारं रान दुमदुमून टाकतं !
हे असीम दुःखच प्रीतीत नि मनीषेत खूप खोल रुतून बसतं.
मानवी घरकुलांतला आनंद नि दुःख, ह्याचीच रूपं आहेत.
आणि हेच विरहाचं दारूण दुःख माझं कवि हृदय
वितळवून गीताच्या रूपानं सारखं स्रवत असतं !!

●

## : ८५ :

आपल्या प्रभूच्या घरांतून बाहेर पडतांना त्यांची शस्त्रास्त्रं
कुठं होती ? त्या योध्यांची महाप्रचंड शक्ती कुठं होती ?
ते अगदी हीन दीन नि निःशस्त्र दिसत होते.
आणि अशा त्या निःशस्त्र दीन दुबळ्यांवर चहूबाजूंनी
बाणांचा वर्षाव झाला होता. आपल्या घरकुलांतून बाहेर
पडतांच त्यांच्यावर हजारो अस्त्रं तुटून पडत होती !

आणि आज देखील युद्ध जिंकून घरी परत जातांना त्यांची
शस्त्रास्त्रं कुठे आहेत ?
शत्रूला पाणी पाजणारं त्यांचं तेज कुठं लुप्त झालं आहे ?

त्यांनी आपलं खड्ग टाकून दिलं आहे. धनुष्य बाणांचा
त्याग करून तर परत आपल्या प्रभूच्या घरी जाताहेत.
आपल्या कृत्याची फळं देखील मागं टाकून
शांतपणानं ते घरी जाताहेत.
जसे बाहेर पडले तसेच !

●



## : ८६ :

मृत्यू, तुझा सेवक आज माझ्या घरी आला आहे.
सातसमुद्र ओलांडून आज तुझी आज्ञा घेऊन माझ्या
दाराशी उभा आहे.
ह्या काजळलेल्या भयाण रात्री भीतीनं हृदयाचा थरकाप
होतोय् ! ह्या फडफडणाऱ्या पणतीच्या प्रकाशांत मला दार
उघडून त्याला अभिवादन करायचं आहे ! तो तुझा दूत
आहे....तुझा निरोप घेऊन माझ्या दाराशी आला आहे !
बद्धं करांनी व सजल नयनांनी मी त्याचं पूजन करीन !
माझ्या हृदयाची दौलत.... माझे अश्रु.... त्याला आनंदानं
अर्पण करीन !

आणि आपलं काम करून तो परत जाईल ! फक्त एक
कृष्ण सावली मागं राहील.... ह्या माझ्या मोडकळलेल्या
झोपडीत माझं निष्कासित शरीर मात्र शिल्लक राहील
आणि तेच मी तुला शेवटची भेट म्हणून अर्पण करीन !

●

## : ८७ :

मोठ्या आशेनं मी तिला शोधण्यासाठी, माझ्या चिमुकल्या खोलीचा कोपरा न् कोपरा पालथा घालतो आणि शेवटी तितकाच निराश होतो.... माझं घरकुल फार लहान आहे. त्यातून एखादी गोष्ट गेली की परत मिळणं फार कठीण आहे !

पण प्रभो, तुझं मंदिर फार विशाल आहे आणि म्हणूनच तिला शोधत शोधत आज मी तुझ्या दाराशी आलो आहे ! संध्याकाळच्या सोनेरी कमानीखाली उभा राहून आसुसलेल्या नेत्रांनी तुझ्याकडे पहातो आहे ! होय आज मी तिला शोधत शोधत अनंताच्या किनाऱ्याशी आलो आहे. इथून काहीच हरवू शकणार नाही ! आशा नाही, सुख नाही, समृद्धी नाही ! अश्रूपूर्ण नेत्रांनी पाहिलेला कुठलाही चेहरा इथून नाहीसा होणार नाही.

प्रभो, त्याच अनंतात माझं हे निष्प्रभ जीवन बुडू दे. अगदी तळापर्यंत डुबू दे ! ह्या अनंताच्या सर्वस्वांत मला तो हरवलेला स्पर्श पुन्हा सुखवू दे एवढंच माझं मागणं आहे !!

●

## : ८८ :

उध्वस्त देवालयांतल्या प्रभो ! तुझं गुणगान करणाऱ्या वीणेच्या तारा तुटल्या आहेत ! पूजेसाठी होणारा संध्याकाळचा घंटानाद बंद पडला आहे ! भयानक शांतता विराजते आहे.

ह्या शांततेत मधूनच वासंतिक वाऱ्याची झुळूक येते ! त्या वाऱ्यांत पुष्पांचा सुगंध आहे ! पण ती सुमनं तुला ह्या पुढं कधीच समर्पित होणार नाहीत ! कारण -

कारण तुझा पुजारी कधीच परांगदा झाला आहे. आशेने आशीर्वादाची अपेक्षा त्यानं केली - आणि तू त्याची उपेक्षा केलीस !

आणि तरीसुद्धा छायाप्रकाश गोरजांत एकरूप होतात त्यावेळी तो तुझ्या पायाशी येतो - ह्या विध्वंस झालेल्या देवालयांतल्या देवापाशी दयेसाठी दीन होतो. अपेक्षेनं आसुसलेला असा लोटांगण घालतो....!

....कित्येक उत्सव येतात.... नि परत जातात ! कैक प्रार्थनेच्या रात्री डोकावून जातात -- पण भंगलेल्या देवळातल्या प्रभूच्या मूर्तीजवळच्या नंदादीपाची काजळलेली वात -- तशीच काजळलेली असते ! जगांतले कलावंत अप्रतिम मूर्ती घडवतात आणि त्यांचं भाग्य उमलताच सुंदर विशाल मंदिरात त्यांची स्थापना होते !

-- पण ही भंगलेल्या राऊळांतली मूर्ती - मात्र, मृतवत् पडली आहे. कैक दिवसांपासून झिडकारल्या गेली आहे !!

●

: ८९ :

ह्यापुढं माझी बडबड बंद ! मी फक्त कुजबुजणार आहे !
माझ्या हृदयाचं बोलणं फक्त गीतांच्या गुणगुणीतच
उमलणार आहे !.... अशीच माझ्या प्रभूची इच्छा आहे.

बादशाही बाजारांत लोकांची धमाल गर्दी उसळली आहे !
विकणारे अन् विकत घेणारे... सारे तिथल्या गडबडीत
गर्क आहेत.... एकेकाळी मी सुद्धा त्या गर्दीत गुदमरत
होतो. पण आज मला माझ्या कामातून ऐन दुपारी सुटी
मिळाली आहे ! खेळाच्या ऐन रंगात मी बाद झालो आहे !
आणि म्हणूनच ह्या भलत्यावेळी सुद्धा माझ्या बागेतल्या
फुलझाडांना बहर येऊ दे. ह्या अवेळीसुद्धा फुलपाखरांना
बागडू दे ! सुख आणि दुःख, चांगलं आणि वाईट ! ह्या
दोहोंच्या ओढाताणींत माझे कैक दिवस फुकट गेलेत ! पण
आज फावल्या वेळेतला माझा सवंगडी मला बोलावतो
आहे ! आज त्याची माझ्याशी खेळायची इच्छा आहे आणि
कुठल्या अज्ञात स्थळी त्यानं मला एकदम बोलावणं
धाडलं आहे हे मला सुद्धा माहीत नाही !!

●



: ९० :

"....आणि मृत्यू तुझं दार ठोठवील तेव्हा काय देशील
त्याला ?...."

"....माझ्या आयुष्यानं भरलेला परिपूर्ण घट त्याच्यासमोर
ठेवीन ! त्या याचकाला मी रिक्त हस्तानं कधीच परत
पाठवणार नाही. हेमंतातील धूसर पहाट, वसंताच्या शांत
रात्री, माझ्या गजबजलेल्या जीवनांतले सोनेरी दिवस
लाभलेले सारे यश -
साऱ्या जीवनांतला मधू त्याच्यासमोर ठेवीन.
आयुष्याच्या संध्याकाळी येणाऱ्या त्या अनाहूताला
रिक्त हस्तानं कधीच पाठवणार नाही !!"

●

## : ९१ :

मृत्यो - जीवनाच्या शेवटच्या साधने - ये आणि
माझ्याजवळ बैस !
दिवसरात्र मी तुझी वाट पहातो आहे.
जीवनातली सुखदुःखं मी केवळ तुझ्यासाठीच सहन
केली आहेत !
माझं वर्तमान, भविष्य, आशा, आकांक्षा, प्रेम, लोभ सारं
काही तुला अर्पण करण्यासाठीच आहे.
तुझ्या एका दृष्टिपाताबरोबर हे सारं तुझं होणार आहे !
फुलांचा हार गुंफून प्रिया तयार आहे. विवाहानंतर आपलं
माहेर सोडून रात्रीच्या एकांतात आपल्या प्रियकराच्या
कंठात तो हार घालण्यासाठी ती आतुरलेली आहे.
आपल्या प्रभूशी एकांतात एकरूप होणार आहे !

●



## : ९२ :

शेवटी एक दिवस ह्या जगाचं शेवटचं दर्शन घेऊन माझे
पंचप्राण साऱ्यांचा निरोप घेऊन निघून जातील,
शेवटचा काळा पडदा माझ्या नेत्रांवर ओढल्या जाईल...
सर्व शांतपणानं उरकलं जाईल.
हे सगळं मला माहीत आहे !
तरीही चंद्रचांदणे नेहमी प्रमाणं अमृताचा वर्षाव करतील
अरुण संध्येचा पाठशिवणीचा खेळ तसाच पुढं राहील.
....काल प्रवाहाच्या लाटा सुख दुःखाचे तुषार उधळत
आपलं अखंड नृत्य पुढंही करत राहतील !

- आणि हा शेवटचा क्षण जेव्हा माझ्या दृष्टीसमोर उभा
राहतो तेव्हा काळाची बंधनं विरघळून जातात....
आणि मृत्यूच्या प्रशांत प्रकाशांत
तुझी सुवर्ण नगरी मला दिसू लागते.
ती अतुल नि अनुपम नगरी माझ्या हृदयात
ठसते !
ज्या गोष्टीची मी मनीषा बाळगली....आणि ज्या गोष्टी
मला मिळाल्या....जावू दे त्या साऱ्या....ज्या गोष्टीची मी
कधी दखल घेतली नाही, वाटेतल्या निष्कासित
रानफुलांप्रमाणं मी ज्यांना अव्हेरलं त्याच मला
आता उराशी कवटाळूं दे !!

●

## : १३ :

मला सुटी मिळाली आहे. मित्रहो जाण्यापूर्वी हा माझा शेवटचा प्रणाम !
ह्या माझ्या घराच्या किल्ल्या घ्या. त्यावरचे माझे सारे हक्क सोडून जातो आहे. ह्या शेवटच्या प्रसंगी मला तुमचे शुभाशीर्वाद हवे आहेत !
आपण कैक वर्षं शेजारी होतो. त्या काळांत तुम्हाला काही देण्यापेक्षा तुमच्या कडूनच मला अमाप मिळालं....
आता आज शुभ दिवस उजाडला आहे. आतापर्यंत शान्तपणानं जळणारा तो कोपऱ्यातला नंदादीप मंदावला आहे.... मला प्रभूचं बोलावणं आलं आहे.
आणि मी निघायच्या तयारीत आहे....मित्र हो जाण्यापूर्वी माझा हा शेवटचा प्रणाम !!

●



## : १४ :

मला निरोप देतेवेळी मित्रहो मला तुमचे शुभचिंतन हवंय् !
पूर्वेकडून ओसंडून वाहणाऱ्या तेजोकलशानं माझा मार्ग सर्वांग सुंदर सजला आहे.
माझ्या बरोबर काय आहे ?
ते मला विचारू नका. माझा प्रवास मी रिक्त हस्तानं पण आशाआकांक्षानं भरलेल्या मनानं सुरू करणार आहे !
माझा अत्यंत आवडता लग्नांतला पोशाख मी चढवीन
मार्गात अनेक विघ्न येतील – पण मला त्याची भीती वाटत नाही....
आणि माझा प्रवास संपला की सायंतारा मोठ्या दिमाखानं चमकेल.
प्रभूच्या प्रवेश द्वाराशी निशागीत सुरूं होईल.
मित्रहो मला तुमचे शुभचिंतन हवय् !!

●

## : १५ :

माझ्या जीवनाचा पहिला उंबरठा ओलांडतांना मला त्याची
काहीच कल्पना नव्हती !
विशाल अरण्यात मध्यरात्रीच्या काळोखांत एखादी
एकाकी कळी उमलते ! त्याचप्रमाणं ह्या चित्रविचित्र
जगात कुणीतरी अज्ञात शक्तीनं मला आणून सोडलं !
पहाटे मी माझे डोळे उघडतांच आतापर्यंत नवीन वाटणारं
हे वातावरण माझ्या पूर्ण परिचयाचं आहे असं मला
वाटलं !
त्याच निराकार अनामिकानं जणू मला आईच्या रूपानं
येऊन पोटाशी धरलं !

तसंच आता मृत्युसमयी देखील तोच निराकार अनामिक
पुन्हा माझ्या समोर येऊन उभा राहील
आणि पुन्हा मला पोटाशी धरील.
मला ह्या आयुष्याबद्दल प्रेम उत्पन्न झालं
तर त्या आयुष्याबद्दल देखील कां होणार नाही ?
मृत्यु देखील खचित इतकाच सुंदर राहील !
रित्या केलेल्या स्तनापासून माता आपल्या मुलाला
तोडतांच ते किंचाळणारं मूल भरल्या स्तनाला लावतांच
आनंदानं हसू लागत नाही का ?

●



## : १६ :

आणि उद्या प्रवास संपतेवेळी माझ्या तोंडी हेच शब्द
घुटमळतील 'मी ह्या जगात जे काही पाहिलं, जे काही
अनुभवलं, ते अनुपम आहे !

प्रकाशाच्या अथांग सरोवरांत फुललेल्या कमल पुष्पांचा
सुप्त मध मी चाखला.
खरोखर माझ्या सारखा भाग्यवान दुसरा कुणी नसेल !
प्रवास संपतेवेळी माझ्या मनांत हेच विचार घोळतील !

विश्वाच्या विशाल क्रिडांगणांत मी मनसोक्त खेळलो !
तिथंच मला त्या निराकाराचं आकलन झालं !
स्पर्शातीत स्पर्शानं माझं अंग पुलकित झालं ! आणि ह्या
क्षणी जरी माझा अंत व्हावयाचा असेल तरी माझी तयारी
आहे. प्रवास संपतेवेळी माझ्या तोंडी हेच शब्द
घुटमळतील !!

●

## : १७ :

तुझ्या बरोबर खेळत असतांना तू कोण आहेस याची मी
कधी चौकशी केली नाही. मला संकोच म्हणून माहित
नव्हता. बेहोशपणं वाहणाऱ्या निर्झराप्रमाणं माझं आयुष्य
होतं !
पहाटे पहाटे माझ्या जिवलग मित्राप्रमाणं तू मला झोपेतून
उठवून न्यायचा आणि आनंदानं भराऱ्या मारणाऱ्या
विहंगाप्रमाणं आपण नाचत बागडत खेळत असू.
त्या प्रसंगी तू मला कितीतरी गीतं शिकवलीस. त्यांचा
अर्थ समजवून घ्यावयाचा मी प्रयत्न केला नाही
तुझ्या गीतात स्वर मिसळून द्यायचा एवढंच मला माहित
होतं. त्या गीताबरोबर माझं हृदय अनिर्बंध उचंबळून येई !

आणि आज खेळ संपताच तुझी महती मला कळली !
सारं विश्व, सारं आसमंत आपल्या मूक तारकांसह
तुझ्या दरबारांत तुझ्या समोर हात जोडून
उभं आहे ! तोच राजाधिराज माझा बालपणीच्या
खेळांतला सवंगडी झाला होता !!

●

## : १८ :

माझ्या पराजयानं, प्रभो, मी तुझी पूजा बांधीन ! माझ्या
अपयशानं तुला मी आळवीन – अजिंक्य ? कोण आज -
पर्यंत अजिंक्य होऊन गेला आहे ? मग मीच अजिंक्य
कसा राहूं शकेन ? मग ह्या पराजयाची मी खंत तरी का
बाळगावी. माझ्या पराजयानं मी तुझी पूजा करीन !!
माझा अभिमान- ! –मला ठाऊक आहे, तो भिंतीत चिणून
मारला जाईल ! दुःखातिशयानं माझा आत्मा किंचाळेल
नि त्याचा तो आक्रोश शरीराची आवरणं भेदून छेदून
आसमंतांत निनादेल. पिचलेल्या पाव्यांच्या बेसून नि भेसूर
सुरांप्रमाणं माझं भकास हृदय हुंदके देईल ! त्या हुंदक्यानं
कठोर हृदयी पाषाण देखील पाझरतील. मला हे सारं
माहित आहे ! तरीही माझ्या पराजयानं मी तुला पूजीन.

सहस्र पाकळ्याचं कमल ! ते देखील केव्हातरी उमलतंच
आणि त्यातलं मधाच गुपित केव्हा ना केव्हा बाहेर
फुटतंच. मग माझा आत्मा शरीराच्या जखडबंदीतून बाहेर
पडल्याशिवाय कसा राहील ?

आणि मग एक दिवस एक तारा ठळकपणे चमकेल.
माझ्याकडे आपली दृष्टी स्थिरावील. त्या भयाण शांततेत
मला आवाहन करील ! मला जखडून ठेवणारं काही
देखील उरणार नाही !
मृत्यू ! पवित्र मृत्यू ! आणि त्या पतितपावन मृत्यूला
आलिंगन देतांना मी तुझ्या पायाशी एवढंच म्हणेन
- तुला मी माझ्या पराभवानं पूजीन ! - - - तुला माझ्या
अपयशाची आभरणं अर्पीन !!

●

## : ९९ :

आणि आज हा आयुष्याचा भार, हे शिरस्त्राण, उतरवतांना
ते अर्पण करण्याची वेळ आली आहे ह्याची जाणीव मला
झाली आहे ! जे काही घडावयाचय् ते निमिषार्धात घडून
येईल मग विनाकारण धडपड करण्यांत काय अर्थ आहे ?

मना, शिरस्त्राणाला आवळून धरणारे तुझे हात मागं घे,
आपलं अपयश आनंदानं कबूल कर !
एका ठिकाणी शांतपणानं बैस
त्यांतच तुझं भलं आहे.
माझ्या ह्या पणत्या क्षणोक्षणी वाऱ्याच्या झुळुकेनं शांत
होताहेत. आणि त्या पुन्हा पुन्हा प्रज्वलित करण्याच्या
प्रयत्नांत मी सारं काही विसरून जातोय् !
पण आता मात्र मी तसं काही करणार नाही.
सारे दीप शांत झाल्यावर ह्या अंधारात मी माझी पथारी
पसरून शांतपणं बसून राहीन !
प्रभो जेव्हा केव्हा तुझ्या मनांत येईल तेव्हा माझ्या जवळ
ये
आणि आपली जागा स्वीकार !

●



## : १०० :

साकाराच्या विशाल सागराच्या तळाशी बुडी मारून मला
निराकाराचे परिपूर्ण रत्न मिळवावयाचं आहे - - -
वावटळीत खिळखिळी झालेली ही होडी ह्या पुढं या
किनाऱ्याकडून त्या किनाऱ्याकडं चकरा मारणार नाही.
अवखळ लाटांवर हुंदडायचे माझे दिवस संपले आहेत.
मृत्यूला मिठी मारून मला अमरत्व हवं आहे ! त्यासाठी
मी धडपडतो आहे - - - - ठेचाळतो आहे !
विश्वाच्या अथांग तळाशी, ताल स्वरांच्या बधंनातून मुक्त
झालेलं अनहत संगीत अखंड गुंजन करतय्. तिथं मी
माझी वीणा घेऊन जाईन. तिचा झंकार चिरकालीनत्वाच्या स्वरांशी
मिळवीन आणि - - - त्यातून शेवटची आर्त तान
निघतांच - - -  ती शांत झालेली वीणा. निश्चलतेच्या
पायाशी ठेवीन ! - - - त्या साठीच मी धडपडतो आहे - -
- - दिनरात ठेचाळतो आहे !!

●

## : १०१ :

सारं आयुष्यभर मी तुला माझ्या गीतांच्या साह्यानं आळवलं ! माझ्या कणाकणाला त्यांनी फुंकर घालून फुलवलं त्यांच्या साह्यानं मी घर अन् घर धुंडाळलं ! त्यांनी मला सारं काही शिकवलं ! कित्येक गुप्त मार्ग शोधून दाखवले. माझ्या हृदयांतल्या किती तरी ताऱ्यांचा उदय, त्यांच्यामुळं झाला !
जगातले सुखदुःखाचे कितीतरी प्रकार त्यांनी मला दाखवलं. सारं आयुष्यभर त्यांनी माझ्या वाटाड्याचं काम केलं. आणि आज प्रवासाच्या शेवटी, माझ्या आयुष्याच्या संध्याकाळी मला ह्या राजद्वाराजवळ आणून सोडलं !

●



## : १०२ :

मला तुझं आकलन झालं आहे ! आणि ते मोठ्या
अभिमानानं मी माझ्या मित्रांना सांगत सुटलो ! माझ्या
सर्व कृतीत त्यांना तुझंच प्रतिबिम्ब दिसतं आणि असीम
आनंदानं नि आतुरतेनं ते मला विचारतात.
"कोण आहे हा ? साऱ्या तुझ्या कृतीत भिनला आहे ?"
त्यावर त्यांना काय उत्तर द्यावं हे मात्र मला कळत नाही
"खरोखर मला नाही सांगता येणार"
खाली मान घालून चाचरत मी उत्तरतो !
चरफडत नि मला शिव्या देत ते निघून जातात !
– तूं मात्र तिथेच सस्मित उभा असतोस !!

तुझ्याबद्दलच्या साऱ्या गोष्टी काव्यांत गुंफण्याचा
मी प्रयत्न केला ! पाषाणखंडातून अचानक पाझरणाऱ्या
निर्झराप्रमाणं सारं गुपित माझ्या नकळत बाहेर पडलं !
माझ्या साऱ्या मित्रांनी ते काव्या वाचलं अन् माझी प्रशंसा
करत विचारलं
"....पण ह्या साऱ्या काव्याचा सखोल अर्थ आम्हाला
समजावून सांग ना !"
आणि ....आणि पुन्हा मी चाचरतो ! ....अडखळतो.
त्यांना काय सांगावं मला कळत नाही.
"....त्याचा अर्थ .... ह्याचा अर्थ ....खरंच मला नाही
सांगता येणार ....!"
छद्मी पणानं हसत हसत ते मला शिव्या देत निघून
जातात
आणि तूं ....तिथेच, तसाच हसत असतोस !

●

## : १०३ :

प्रभो,
ह्या शेवटच्या प्रणामांत, माझी सारी गात्रं विशाल
पक्षीराजाप्रमाणं पंख पालवून तुझ्या चरणारविंदाशी चित्रित
होऊ देत.
जलदिंने ओथंबून ओठंगळणाऱ्या श्रावणातल्या
कृष्णमेघाप्रमाणं माझं मन देखील तुझ्या दाराशी ह्या
शेवटच्या प्रणामांत प्रतिबिंबित होऊ दे !
माझ्या निरनिराळ्या गीताचे जलौघ एकत्र येऊन त्याचा
प्रचंड ओघ ह्या शेवटच्या प्रणामाच्या रूपानं अथांग
शांततेच्या सागरांत विलीन होऊ दे !
दूर दिशांतरी गेलेले मानस पक्षी अव्याहत फडफडत
आपल्या घरट्याकडे जातात !
त्याचप्रमाणं माझं सारं जीवन
आपल्या अनंताच्या घरकुलांत प्रस्थान करण्यासाठी
ह्या शेवटच्या प्रणामांत निघू दे !

●



# गीतांजली–बंगालीवरून...

Gitanjali ह्या बंगाली काव्यसंग्रहाचा मराठी भावानुवाद



– राम म्हैसाळकर

स्वतः गुरुदेव रवीन्द्रनाथ टागोर ह्यांनी भाषांतर केलेल्या इंग्रजी गीतांजलीत त्यांच्या मूळ बंगाली गीतांजलीमधल्या सगळ्या कविता समाविष्ट केलेल्या नाहीत. एकंदर १५७ कवितांपैकी केवळ ५० कविता त्यात आहेत. बाकीच्या ५३ कविता 'खेया' 'नैवेद्य' ह्या दोन संग्रहातल्या आणि काही इतरत्र मासिकांतून वगैरे प्रसिद्ध झालेल्या कवितांपैकी आहेत. तसे त्यांनी नमूद करून ठेवले आहे.

इंग्रजी कवितासंग्रहात समाविष्ट नसलेल्या ह्या मूळ बंगाली गीतांजलीतल्या कविता. ह्या कविता वाचून आणि समजावून सांगण्याचं बहुमोल कार्य माझी पत्नी डॉ. सौ. कमल म्हैसाळकर ह्यांनी केलं आहे. श्री. देवगिरीकर ह्यांच्या मराठी शब्दशः भाषांतराचा आम्हाला खूप फायदा झाला. त्याचप्रमाणे सी. पी. ॲण्ड बेरार महाविद्यालयाचे माजी प्राचार्य अमल कुमार डे आणि त्यांच्या सुविद्य पत्नी सौ. सुनंदा डे ह्यांचा देखील. राजाराम लायब्ररीचे मुकुंद नानीवडेकर ह्यांनी देवगिरीकरांचे भाषांतर उपलब्ध करून दिले. काही कवितांचे अंतःप्रवाह श्रीमती वीणा आलासे ह्यांनी सुरेख रितीने आम्हाला समजावून सांगितले. डॉ. वि. स. जोग ह्यांची आपुलकी मला मोलाची वाटते. जे. जे. स्कूल ऑफ आर्ट चे निवृत्त प्राचार्य आणि माझे बंधू श्री. अप्पासाहेब देशपांडे ह्यांनी ह्या पुस्तकाचा आलेख करून दिला, ह्या सर्वांचा मी ऋणी आहे.

मराठीतल्या ह्या कविता भावानुवाद स्वरूपातील गद्य आहेत हे जाता जाता सांगायलाच हवे.

आणखी एक गोष्ट.

कवितांच्या अनुक्रमात काही अनुक्रम चुकून गळले आहेत असा समज होण्याची शक्यता आहे. गळलेल्या अनुक्रमाच्या कविता "गीतांजली - इंग्रजीवरून" ह्या प्रकरणात सापडतील. त्यांची सूची इतरत्र दिली आहे.

- राम म्हैसाळकर

चि. सौ. शुभदा आणि अनिरुद्ध देशपांडे

चि. सौ. अरुंधती आणि मिलिंद घिरणीकर

चि. भवान आणि चि. सौ. अश्विनी म्हैसाळकर

ह्यांना

चि. अंबरीष : चि. चिन्मयी

चि. अदिती

चि. अनिशा : चि. अनिकेत

हे ओघात आलेच.

- डॉक्टर बाबा

## : ९ :

प्रभो,
माझं हे मस्तक तुझ्या चरणधूलींनी
पावन होऊ दे !
आणि माझ्या अश्रुधारांत माझा सारा
अहंकार वाहून जाऊ दे !
ह्या अहंकारानं मी स्वतःभोवतीच गोल गोल फिरतोय्.
त्यानं मला भोवळ आली आहे,
तो माझा अहंकार माझ्या अश्रुधारांनी धुऊन जाऊ दे
स्वतःच स्वतःचा बडेजाव करण्यांत काय अर्थ आहे ?
प्रभो, तुझ्या सर्व इच्छा माझ्यातून पूर्ण होऊ दे
त्यानं माझ्या जीवनाला झळाळी येऊ दे
माझ्या हृदयांत तुझी पदकमलं चिरस्थित होऊ दे.
माझ्या साऱ्या अहंकाराला
माझ्या ह्या अश्रूत
चिरसमाधी मिळू दे !

●

## : ४ :

प्रभो,
माझी प्रार्थना वेगळीच आहे.
संकटापासून संरक्षण नको.
त्याला सामोरं जाण्याचं धैर्य मला दे !
व्यथित हृदयाला सांत्वना नको
त्या व्यथांवर मात करण्याची शक्ति मला दे.
मला सहाय्य नको -
पण माझ्या अवसानघातकीपणाच्या मुळाशी घाव घाल.
जीवनातल्या अनिष्ट काळांत, प्रतारणेच्यावेळी
ती मला हानी वाटू देऊ नकोस !
माझ्या उद्धाराची विनंती नाही
पण विपदांवर कुरघोडी करण्याची हिंमत दे
माझा भार हलका करू नकोस.
तो पेलण्याची ताकद माझ्या बाहूत असू दे
सुखासीनकाळी मी तुझ्यासमोर नतमस्तक होतो
पण दारूण दुःखाच्या वेळी सुद्धा,
तुझ्या अस्तित्वाबद्दलची माझ्या मनांतली शंका
उन्मळून टाक.
प्रभो, माझी प्रार्थना आगळी वेगळी आहे.

●



## : ५ :

माझ्या जीवितेश्वरा,
माझ्या अंतर्मनाचा विकास होऊ दे
ते शुद्ध : शिव : शंकारहित, सुंदर असू दे !
सदैव जागृत, उज्वल, उदयोन्मुख असू दे !
ते सर्वांशी युक्त आणि माझ्यातून मुक्त असू दे
त्यांत माझ्या कार्याचा तुझ्या प्रतीचा ध्यास
प्रतिबिंबित होऊ दे !
माझं चित्त तुझ्या चरणारविंदाशी विसावू दे
त्यातच सुखावू दे
माझ्या अंतर्मनाचा विकास, असाच होऊ दे.

●

## : ६ :

प्रभो,
तुझ्या निर्मल अमृताचा महापूर लोटला आहे.
सारं त्रिभुवन त्यांत न्हाऊन निघालं आहे.
अनेक रूपं धारण केली आहेत त्यानं -
कधी प्रेममय होतं. कधी प्राणांत सामावतं
कधी गीतातून स्रवतं, तर सुगंधानं दरवळतं
कधी प्रकाशमान होतं, तर कधी आनंदानं पुलकित होतं
हे बंधनातीत अमृत, आनंदित स्वरूपांत
स्वच्छंद विहरतय्
माझ्या जीवनांत आकंठं डुंबतय्
तुझ्या आशीर्वादानं आकंठ न्हालेली माझी चेतना
सहस्रपाकळ्यांनी हर्षोत्फुल्ल होऊन
आपली सारी मधुरता तुझ्या चरणी अर्पण करते आहे.
आणि ह्या अरुणोदयानं माझ्या हृदयांतली निस्तेजता
कुठल्या कुठं अंतर्धान पावली आहे.
●

## : ७ :

प्रभो,
नित्य नव्या नव्या स्वरूपांत तू माझ्या हृदयांत
प्रवेश करावास
तुझा तो प्रवेश....
तो गंधमय असू दे. तर कधी वर्णाच्या आभरणांत, गायन
करत करत, स्पर्शानं मला रोमांचित करणारा तो प्रवेश
असावा.
माझ्या दोनही नेत्रांत तू सदा सामावलेला असावास
नित्य नव्या नव्या स्वरूपांत माझ्या हृदयांत तुझं स्थान
असू दे.
निर्मल : उज्वल, मनोहर, स्निग्ध, प्रशांत अशा
अनेक आश्चर्यमुग्ध, वैचित्र्यमय स्वरूपांत
तुझा प्रवेश असू दे.
माझ्या नित्य कार्यात तर तू येच
पण कार्यान्ती देखील
तुझ्या नित्य नव्या स्वरूपांत माझ्या हृदयांत प्रवेश कर !
●

: ८ :

हिरव्यागार शेतांत ऊनसावलीचा लपंडाव सुरू झालाय्
निळ्याशार आकाशांत हा पांढऱ्या ढगांचा पिसारा
स्वच्छंदपणानं हिंडतोय्
हा मधुप मधुसेवनच विसरलाय्.
जणू प्रकाश पिऊन सैरभैर,
गुणगुणत गुणगुणत तरंगतोय्....
ह्या पक्षांच्या जोड्या नदीकाठच्या पुळणीवर का बरं
जमल्या आहेत ?....
छेः छेः आज मी घरी जाणार नाही.

वाटतं, ह्या आकाशातली सारी संपत्ती लुटून न्यावी
आनंदात खळखळाट करणाऱ्या ह्या नदीतले तुषार
वाऱ्याशी दंगामस्ती करण्यांत दंग झाले आहेत
वाटतं, आपण देखील बांसरी वाजवत वाजवत
रेंगाळत रेंगाळत नुसतं हिंडत रहावं.
बघता बघता दिवस संपून जाईलं

छेः छेः आज मी घरी जाणार नाही
जाणारच नाही
●



: ९ :

आनंद सागराला आज भरती आली आहे.
या, सारे जण ह्या बोटींत या
ह्या भरतीतून वल्हवत वल्हवत जाऊ या.
.... छे छे ह्या गाठोड्यांची चिंता कशाला करायची ?
लाटांवर स्वार होऊ या, साऱ्या अडचणींवर मात करू
या !
मृत्यूवर कुरघोडी करू या !
मित्र हो, आनंद सागराला आज उधाण आलं आहे.

मागच्या किनाऱ्यावरनं
कुणी आपल्याला आवाज देतय् कां ?
कुणी इशारा देतोय् ?
भीति ?
छेः कुणाला भीति वाटतेय् ?
ती तर आपल्या चांगल्या ओळखीची आहे
आमचं सुखदुःख ही आमचीच मिळकत आहे
ती ग्रहताऱ्यांची किंवा शिव्याशापांची देण नाही
शीडाची दोरी घट्ट पकडून
आनंदानं गात गात
आपला प्रवास संपवू या !
आज आनंद सागराला भरती आली आहे.
●

## : ११ :

विविध तृणपल्लवांचा गुच्छ तयार करून
सुकुमार प्राजक्तांची माला गुंफून
गहू बाजरीच्या मंजिरींची डाली तयार करून आणली
आहे
वीणावादिनी शारदे, शुभ्र मेघांच्या रथातून
अलगत तरंगत तरंगत निळ्या निळ्या स्वच्छ
मार्गानं ये !
शुचिर्भूत धूसर प्रकाशानं चमकणाऱ्या पर्वत शिखरावर ये !
शिशिरातल्या दवबिंदूंनी सुशोभित झालेल्या
श्वेत कमलांचा मुकुट धारण करून ये.
ह्या तुडुंब भरून वाहणाऱ्या गंगेच्या किनाऱ्यावर
मालती पुष्पांचं आसन
ह्या शांत एकांती कुंजात अंथरलं आहे.
तिथं तुझ्या चरणातली राजहंस आपले
शुभ्र पंख पसरून,
आपल्या मानस सरोवरातल्या घरकुलाला विसरून
वाट पहात बसला आहे.
तुझ्या वीणेच्या सुवर्णतारांवर शांत राग निनादू दे
आता पर्यंतचं अल्लड वातावरण, शांत गंभीर होईल
ह्या अश्रुधारांतून ते प्रतीत होईल
तुझ्या केशकलापातला चमकणारा परीस
माझ्या मनाला गोंजारू दे.
त्यानं माझ्या साऱ्या भावना सोनेरी होऊन
आपल्या प्रकाशानं माझ्या अंतःकरणातला अंधःकार
नाहीसा करील !

●



## : १२ :

हा मंद मधुर समीर
ह्या श्वेत शिडांच्या नौकेला हळुवार गती देतो आहे.
....हे ....हे सारं अदृष्ट आहे
अनामिक सागरतीरावरून ह्या नौकेनं दूरस्थ संपदा
संपादन करून आणली आहे.
छेः छेः माझी सारी संपत्ती झटकून टाकून
माझं अचपल मन वाऱ्यासारखं तरंगत तरंगत त्या
नौकेकडं निघालं आहे.
आकाशांतले मेघ, चिरणाऱ्या पाऊसधारांसमवेत
गर्जना करताहेत !
त्या फाकलेल्या मेघातून अरुणोदयाचे किरण माझ्या
चेहऱ्याला हळुवारपणानं गोंजारताहेत
हे सारं कोणाचं कृत्य असेल बरं ?
ह्या साऱ्यांचा सूत्रधार कोण असेल बरं ?
हसूआसूंचं धन कोणाचं ?
सुरात लावलेल्या तारांवर कोणता राग छेडावा ?
त्या स्वरांत कोणते शब्द गुंफावेत ?
कोणता मंत्र म्हणावा ?
.....छेः छेः
कांही....
कांही सुचत नाही !

●

## : १३ :

नजरबंदी करून तू आलीस
आणि माझ्या हृदयात डोकावून बघितलंस –
काय दिसलं तुला ?
दवांनं भिजलेल्या तृणपल्लवांवर प्राजक्तानं अंथरलेल्या
पायघड्यांवरून अलगत पावलं टाकत टाकत तूं आलीस
नजरबंदी करून –
वनराईतून छायाप्रकाशाच्या तलम ओढणीनं झाकलेल्या
चेहऱ्याकडं बघता बघता
ही वाटेतील फुलं काय म्हणताहेत ठाऊक आहे ?
म्हणताहेत –
"ही ओढणी बाजूला कर ना
तुझ्याशी आम्हाला एकरूप व्हायचय्
आकाशातल्या मेघाच्या, पदराला आपल्या हातांनी
दूर सार ना....."

नजरबंदी करून तू आलीस !
वनदेवीच्या मंदिरात गंभीर शंखनाद होतोय्
आकाशातल्या वीणेवर स्वागतगीत वाजतंय्
माझ्या हृदयातले नूपुर त्या तालावर नाचताहेत
सर्व कार्याला रिझवणारी
पाषाणांना पाझरवणारी
तू आलीस
अमृत सिंचन करत.... नजरबंदी करून !

●



## : १४ :

माते,
तुझ्या कारुण्यपूर्ण चरणांची चाहूल
मी पहाटेच्या अरुणोदयांत अनुभवतो,
तुझी अमरत्व प्रदान करणारी वाणी
शांत, नीरव आकाशांत भरून जाते
साऱ्या आसमंतातल्या तुझ्या अस्तित्वाला
शतशः प्रणाम
माझ्या नित्यनैमित्तिक कार्यात
माझं तुला अभिवादन
माझं तन मन धन तुझ्या अर्चनेच्या धूपाला
अर्पण असो

तुझ्या कारुण्यपूर्ण चरणांची चाहूल
मी पहाटेच्या अरुणोदयात अनुभवतो.

●

## : १५ :

धीरगंभीर स्वर आसमंतात पसरून आनंदगान सुरू
झालं आहे.
त्याचे पडसाद माझ्या हृदयांत कधी बरं उमटतील ?
पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश या पंचतत्वांवर
माझं प्रेम कधी बरं बसेल ?
त्यांच्या वेगवेगळ्या वाद्यांतून स्त्रवणारं संगीत
मला कधी बरं आत्मसात करता येईल ?
डोळे उघडल्याबरोबर मला केव्हा बरं आनंद होईल ?
माझे सहप्रवासी समाधान पावतील
असा मार्ग मला केव्हा बरं सापडेल ?
तुझ्या सर्वव्यापी अस्तित्वाचा अनुभव
मला केव्हा बरं मिळेल ?
आणि माझ्या सर्व कार्याला तुझे नामरूप
मला केव्हा बरं देता येईल ?

●



## : १९ :

दिवस संपला.
सायंकाळ आषाढ घनांनी झाकळून गेली
पावसाच्या अस्ताव्यस्त धारा कोसळताहेत
कोठीच्या कोपऱ्यांत कसला विचार करतो आहेस ?
पावसानं सर्द झालेला वारा
जाईच्या कुंजात काय बरं कुजबुजतो आहे ?
कुणास ठाऊक !
पाऊसधारा सैरभैर कोसळताहेत
हृदयांतल्या विविध कल्लोळांना जणू शेवट नाहीय्ये !
पावसानं चिंब भिजलेल्या बनफुलाच्या सुगंधानं
मला भारून टाकलं आहे
ह्या साऱ्या अंधाऱ्या रात्रीला सुरांनी मनसोक्त भिजवता
येईल कां ?
काय झालंय् मला ?
असा कसा हरवून बसलो आहे मी ?

आषाढघनांच्या धारा राहून राहून कोसळताहेत !

●

## : २१ :

ह्या कालप्रवाहांत
कधीपासून तरी मला सोडून दिलं आहेस तू !
मला माहित आहे
अगणित घरीदारी मला तू सहजतेनं
आनंदित करीत असतोस !
कधी मेघांच्या आडून सस्मित बघतोस
तर पहाटेच्या अरुणप्रभेतून तुझ्या चरणांचा स्पर्श
माझ्या भाली विराजतो
अनंत काळातलं
अनेक चेहऱ्या मोहऱ्यातलं
नवनवीन प्रकाशातलं
तुझं अमूर्त रूप
मी नेत्रांत साठवून ठेवलं आहे
दुःखात वा सुखात
प्रेमात वा गीतात
युगानुयुगं तुझ्या ह्या दर्शनाचं अमृतपान
मी करत आलो आहे
ते कल्पनातीत आहे !
अनाकलनीय आहे !

●



## : २३ :

प्रभो,
असा दृष्टीआड राहू नकोस !
कुणाच्याही नकळत मुकाटपणानं माझ्या हृदयातलं आपलं
स्थान ग्रहण कर
तुझ्या शोधार्थ मी वणवण भटकलो
आता मला हुलकावणी देऊन तिथून निघून जाऊ नकोस
तसं मला वचन दे.

प्रभो,
हा लपंडाव आता पुरे
मला ठाऊक आहे
माझं हृदय तुझं सिंहासन होण्याच्या पात्रतेचं नाही
ते कठोर आहे
ओबडधोबड आहे
पण तुझ्या नुसत्या चाहुलीनं ते मृदुमुलायम होऊन
पाझरायला लागेल
तुला सामावून घेण्याइतकी माझी पुण्याई नाही
पण तुझ्या कृपाकटाक्षात माझं मन फुलेल
....बहरेल ....परिपक्व होईल
म्हणून म्हणतो
हा लपंडाव आता पुरे
माझ्या हृदयसिंहासनावरलं आपलं स्थान ग्रहण कर !

●

## : २५ :

घरी, दारी.... कुठेही गेलो तरी तुझा हा विरह
दिनप्रतिदिन मी अनुभवतोय्.
पर्वतराजीवर, घनघोर अरण्यांत, विशाल अथांग सागरांत,
ह्या अनंत अवकाशांत, चित्रविचित्र रूपानं हा सजला आहे.
श्रावणांतल्या ढगाळ वातावरणांत, त्या विरहाचं धारानृत्य
चालू असतं
तर आकाशांतल्या तारकातून, निबिड अंधकारांतसुद्धा
तो मूकपणानं लुकलुकत असतो
आजूबाजूच्या पानफुलांतून त्याची सळसळ जाणवते.
अनेकांच्या अंतःकरणांत अनंत वेदनातून
त्याची उत्कटता उफाळून आली आहे.
प्रेम : वासना : सुख : दुःख
ह्या वेगवेगळ्या रूपातून आणि नित्यनव्या कार्यातून
तो प्रतीत होत असतो
सारं जीवन उदास करून
माझ्या साऱ्या गीतातून
सुरासुरातून
ठिबकत असतो.
माझं सारं अंतःकरण त्यानं व्यापून टाकलं आहे.

●



## : २७ :

ह्या शिगोशिग भरल्या मेघातून पाऊसधारा झरझरताहेत,
अनिर्बंध !
जणू आकाश चिरत कोसळताहेत.
आरडाओरडा करत त्यांना वादळवारा झोके देतोय्.
अवखळपणानं खळखळ करत जमीनीवर वाहणारे जलौघ
स्वच्छंदपणानं धावताहेत
आणि आपल्या शामल जटा उडवीत
कोण बरं हे तांडव नृत्य करतंय् ?
त्या वादळपावसासमवेत माझं मन देखील लोळतंय्....
....मधेच हर्षोत्फुल्ल धावतंय्
हृदयातून उतू जाणारे तरंग
कुणाच्या बरं चरणावर कोसळताहेत ?

माझ्या हृदयांतला आनंदघन
सारी कवाडं फोडून सैरभैर पळतोय्
कानांत वारं शिरल्यागत धावतोय्
असं हे वेड
अंतर्बाह्य
का बरं मातलंय् ?

●

## : २८ :

प्रभो,
माझे नेत्र तुझ्या दर्शनासाठी व्याकुळले आहेत
..... अजून व्याकुळलेलेच आहेत
त्याची प्रतीक्षा करण्यांत देखील
माझं मन समाधानी आहे.

माझ्यावर कृपेचा वरदहस्त ठेवावास म्हणून
धुळीनं माखलेलं माझं भिकारडं हृदय
तुझ्या दाराशी याचना करीत बसतं
त्या कृपेला मी आचवलो आहे अजून तरी,
त्या प्रतीक्षेत सुद्धा
माझं मन समाधानी आहे.

आपल्या कर्तव्यमुक्तीच्या सुखांत
तृप्त होऊन माझे सहकारी
मला एकटं टाकून निघून गेलेत.
माझ्या एकाकी जिवाला तू हवाहवासा वाटतोस
त्यांतसुद्धा माझं मन समाधानी आहे.

आसमंतात अमृतमयी, प्रेमानं व्याकुळलेली धरा
आनंदानं गहिवरली आहे
माझ्या ओटीत फक्त व्यथा आहे.
त्यांतसुद्धा माझं मन समाधानी आहे.

●



## : २९ :

सुवर्णपाशांत आणि सभोवारच्या गोतावळ्यांत
मी गुरफटलोय्
पण माझं मन मात्र तुझ्या भोवती भोवती गुंजारव करतंय्
हे तुला माहित आहे.

हृदयेश्वरा, तू माझ्या हृदयांतच विराजमान झाला आहेस
माझं अंतर्मन माझ्यापेक्षा तुलाच जास्त माहित आहे.
सुखदुःखाच्या आणि भांबावलेल्या स्थितीतसुद्धा,
मला तुझाच ध्यास सतत असतो
हे तुला माहित आहे.

अहंकारातून माझी सुटका होत नाही
उलट त्यांत मी अधिकच गुंतत चाललो आहे -
- त्याच्या ओझ्याखाली पूर्णपणे दबून गेलो आहे.
सुटकेचा मार्गच दिसत नाही
मला सतत तुझाच ध्यास असतो
हे तुला माहित आहे.

माझं सर्वस्व केव्हा बरं हरण करशील ?
त्याच्या त्यागांतच तुझं सान्निध्य आहे
म्हणूनच मला सतत तुझा ध्यास असतो
हे सारं तुला माहित आहे.

●

## : ३२ :

प्रभो,
मला निर्भय कर.
माझ्याकडे बघ ना
माझ्या इतक्या जवळ असून सुद्धा
मी तुला ओळखू शकलो नाही.
माझी दृष्टी भरकटत होती
हृदयस्थ प्रभो,
सुहास्य वदनानं माझ्याकडं बघ ना !

माझ्याशी कांहीतरी बोल ना !
आपल्या प्रेमळ हातानं मला एकदा कुरवाळून
उचलून घे !
माझी विद्या, माझा समज, ह्या जाणीवा
हे सारं भ्रामक आहे
हसू आसू
सारं सारं खोटं आहे
मला दर्शन दे
आणि माझे सारे भ्रम दूर कर !
●



## : ३३ :

मन पुन्हा भरकत चाललं आहे
नजर झाकोळलीय्
अनंत विचारांचा धुरळा उडाला आहे.
चित्त सैरभैर भटकतय्
त्या साऱ्यांत दाहकता आहे
त्यानं तुझे चरणकमल दूर दूर जाताहेत

ह्या आजूबाजूच्या कल्लोळांत
तुझी निःशब्दता माझ्या हृदयांत खोल खोल दडू दे !
ह्या मेळाव्यांत तू माझ्या सांगाती रहा.
मला तुझ्यांत सामावून घे.
आणि तुझं सारं दिव्य त्रिभुवन
माझ्या इवल्याशा चित्तात
शिगोशिग भरून राहू दे !
●

## : ३५ :

घननीळा,
पाऊसधारांच्या आणि सजल प्रेमाच्या
वर्षावानं ये !
गिरीखिरांना चुंबित,
वनराईना आपल्या सायेत लपेटून
धीरगंभीर गर्जना करत ये !

कदंबवृक्षांचं बन
पानफुलांनी बहरून
तुझ्या स्वागतासाठी आसुसलं आहे -
त्याचा हर्षोल्लास
नदीकाठी निनादतोय्.

माझं हृदय व्यापून टाकलय्स् तू
तृष्णा शांत झाली आहे
नेत्र समाधान पावलेत
घननीळा
आता माझ्या चित्तात
भरभरून ये !
घननीळा
पाऊसधारांच्या सजल प्रेमाच्या वर्षावानं ये !

●

## : ३६ :

गळता गळता : वाहता वाहता : मोडता मोडता
तुला आनंदानं त्यात रमून जाता येणार नाही का ?
मृत्यूच्या सारंगीवर, त्या चंद्रचांदण्यात,
आसमंतात छेडले जाणारे स्वर
जिवाचा कान करून ऐकता येणार नाहीत का ?

हा सूर्य : हे तारे : हा चंद्र
जळता जळता : प्रकाश देता देता
मरणाधीन होतात
हर्षोल्लासानं धावत धावत जाऊन
यज्ञात आहुती देऊन
तुला आसमंत आनंदित करता येणार नाही कां ?

सारा परिसर संगीतात धुंद होऊन सारखा इतस्ततः
(पुढंच) धावत असतो
बंधनातीत होऊन मागं वळून बघत नाही
त्याच बेहोषीत सारे ऋतू नृत्यमग्न असतात
ह्या धरेवर संगीत स्वर-गंधांना उधाण येतं
त्या आनंदाच्या डोहात बुडी मारून
मृत्यूला प्रेमालिंगन देऊन
त्या सुखात स्वतःला सामावता येणार नाही का ?

●

## : ३७ :

अहाहा !
निशास्वप्न भंगलं !
नुकतंच -
बंधनातीत झालो
श्वास मोकळा झाला
स्वच्छ, पारदर्शी
बाहेर मोकळया जगांत आलो.
हृदयपद्माची पाकळीन् पाकळी मोकळी झाली -
उमलली : विलग झाली
नुकतीच !

घरकुलाची कवाडं फोडून तू सामोर आलास !
आणि माझ्या अश्रूंच्या रूपानं
माझं हृदय तुझ्या पायाशी लीन झालं
अरुणानं आलिंगनासाठी बाहू पसरले
माझ्या तुरुंगाच्या दाराशी यशोनौबत
दुमदुमली
नुकतीच !

●

## : ३८ :

शरदाच्या शांत प्रभाती
माझ्या घरकुलाच्या दाराशी कोण आलंय् ?
हर्षोल्लासित गायन कर
मना, आनंदानं गा !
त्याचं स्वागत कर !

नील गगनाचा मुग्ध राग
दवांत भिजलेली व्याकुळता
त्याचा अनुपम संयोग
त्याचं संगीत
ह्या वीणेच्या तारातून स्त्रवू दे !
मना आनंदाचं गायन कर !

ह्या धरेवरल्या धानाच्या सोनेरी सळसळीला संगत कर
तुडुंब भरलेल्या ह्या सरितेच्या लहरीलहरींवर
त्याचा प्रतिध्वनी नाचू बागडू दे !
ह्या अभ्यागताच्या मुखकमलाचं
आनंदानं उचंबळून दर्शन घे
ऊठ, घरकुलाची दारं उघड
बाहेर ये
आणि त्याच्याबरोबर प्रस्थान कर !

●

# : ४० :

नाशवंतांचं किती वेळ रक्षण करायचं ?
प्रभो,
त्याच्या काळजीत मी आलोचन यामिनी जागणार नाही.
अहोरात्र कवाडं लावून मी बसलोय्.
घाबरून,
येणाऱ्या साऱ्यांना मी घालवून देतोय्
पुन्हा पुन्हा
माझ्या एकाकी कोठीत त्यामुळं कुणी येत नाही
बाहेर मात्र आनंदाला उधाण आलंय्.

तुझा रस्ता हरवलाय कां ?
माझी कोठी सापडत नाही तुला ?
म्हणून तू येतोस : परत जातोस -

मला हवंहवंसं वाटतं ते
मला सांभाळता येत नाही.
सारं मातिमोल होऊन जातं !
●



# : ४१ :

माझा अहंकार -
फाटक्या, मळक्या वस्त्राप्रमाणं लगेच फेकून द्यायला
हवा.
दिवसभराच्या कामामुळं हे वस्त्र
धुळीनं डागाळलं आहे
त्याचा ताप सहन करणं शक्य नाही.
सायंकाल झाला आहे
माझी कामं संपली आहेत
माझी आशा पल्लवित करणारी त्याच्या आगमनाची सुवेला
जवळ आली आहे.
शुचिर्भूत होऊन.
श्रद्धेची वसनं परिधान करायला हवीत
संध्यासमयीच बहरणाऱ्या फुलांचा हार तयार
करायला हवा
छे : छे :
आता वेळ गमावताच येणार नाही !
●

## : ४२ :

सारं शरीर रोमांचित झालं आहे
मला भोवळ येते आहे
माझ्या हृदयावर रक्षाबंधन कुणी केलं आहे बरं ?
ह्या गगनतळी
जळी स्थळी
कुसुम-फली
मनरमणा
माझ्या मनाचं कसं सिंचन केलं आहेस रे ?
तुझ्या सांगाती आज मी रमलो
मला हवं ते मिळालं आहे —
की अजून मी शोधतोच आहे ?
मला कांहीच कळत नाहीय्ये !
माझ्या नेत्रांतले हे अश्रू -
ते आनंदाश्रू आहेत ?
की जिवाला विद्ध करणारं
विरहाचं हे मधुर रूप आहे ?
●

## : ४३ :

प्रभो,
रक्षाबंधनासाठी मी आलो आहे
तुझा उजवा हात मोकळा कर.

ह्या रक्षाबंधनानं मी सर्वांबरोबर बांधला जाईन
कुठेही ते असले तरी मोकळे राहणार नाहीत
आता परकेपणा राहिला नाही.
अंतर्बाह्य मी एक झालो
आत एक, बाहेर एक, असं कांहीही नाही.
तुझ्या विरहानं व्याकुळ होऊन
माझी भटकंती चालू आहे.
- त्याला पूर्णविराम मिळावा
त्यासाठी मी तुझा धावा करतो आहे.
●

## : ४५ :

प्रकाशाला तेजस्विता देत
हे तेजोनिधी
तू आलास.
माझ्या नेत्रासमोरचा अंधाराचा पडदा दूर झाला.
ही धरा : हे आकाश
हर्षोल्लासांनं भरून गेली
सारं कसं मंगलमय झालंय् !

वृक्षराजींच्या पानापानांवर आनंद सळसळतोय्
पक्षांच्या घरट्यांत संगीत किलबिलंय्
आणि तुझा हा प्रकाश
माझ्या सर्वांगाला गोंजारतोय् !

●



## : ४६ :

तुझ्या सिंहासनाच्या पायधुळीत माझी जागा असू दे !
चरणरजांनी मी स्वतःला सारवून घेईन

उगाच सन्मानित करून मला दूर ठेवलंस !
त्यांना मी विस्मरणांत जाईन
कायमचा.
असं का केलंस ?

तुझ्या भक्तगणांच्या मेळाव्यांत मी राहीन
अगदी मागं : सर्वांच्या शेवटी
अशी जागा मला दे.

प्रसादाकरता होणारी झुंबड मी बघतोय्
मला काहीही नको
अनिमिष नेत्रांनी मी तुझं दर्शन घेत राहीन
सगळ्यांना वाटून झाल्यावर
जे उरेल
ते मी घेईन
तुझ्या चरणरजांनी स्वतःला
मनसोक्त मारवून घेईन !

●

## : ४८ :

नील गगनांत प्रकाशकमल उमललं !
त्यांच्या पाकळ्या
दशदिशांत उमलल्या आहेत.

अंधाराच्या काळयाभोर जलाशयाला
त्यानं झाकून टाकलंय्
मध्यभागी सुवर्ण कोषांत
मी आसनस्थ झालोय्

ह्या तेजोमय कमळानं मला बघतां बघता -
वेढून टाकलं आहे
आकाश लहरीबरोबर हा समीर
मंद मंद झोका घेतो आहे.
सारा आसमंत
स्वरांनी निनादतो आहे.
आणि अंतःप्राण
सैरभैर नाचत सुटले आहेत

ह्या अवकाशांतल्या परीस स्पर्शांनं
माझं शरीर पुलकित झालं आहे.
जीवनाच्या आकंठ पानानं
माझं मन तृप्त झालं आहे
आणि हा वारा
मला कसा गोलगोल फिरवतो आहे.
ही धरा
सर्वांना आपल्या पदराखाली घेऊन
आपल्या हृदयाशी आवळतेय् !
सर्व प्राणिमात्रांना बोलावून बोलावून
त्यांची तृषा निवारण करतेय्.
जवळ असलेलं सर्व-सर्वांना वाटून देते आहे.

माझं मन संगीतानं गंधित झालं आहे
आनंदानं तृप्त होऊन
त्याचा आस्वाद घेत मी बसलो आहे !
धरणीमातेच्या पदराआड
तिला बिलगून बसलो आहे.

त्या प्रकाशाला माझे शतशः प्रणाम
तेजोदेवते,
माझे सर्व अपराध विसर
मला पितृतुल्य आशीर्वाद दे !
पवना
तुला देखील माझा अखंड दंडवत
माझी सारी विषण्णता मावळून टाक
तुझ्या वडीलकीच्या वरदानानं !
धरणीमाते
तुझ्या चरणी माझे विनम्र अभिवादन.
माझे सारे डोहाळे पूर्ण होवोत
तुझ्या मातृतुल्य आशिर्वचनानं
सारं सफल होऊ दे !

●

## : ४९ :

माझ्या घरात तो मांडी घालून शांत बसला आहे.
त्याच्या आवडीचं आसन
त्याच्यासाठी मांडून ठेवायला हवं !

प्रसन्न चित्तानं गाणं गात गात
खोलीतला सारा धूळ पसारा साफ करून
फुलदाणीतल्या फुलांवर पाणी शिंपडून
ती ताजीतवानी ठेवायला हवीत
आणि त्याच्या आवडीप्रमाणे आसन सजवायला हवं !

दिवस-रात्र त्याचा मुक्काम इथंच असतो
त्याच्या प्रसन्न स्मितानंच
पहाटेचा प्रकाश माझ्या घरांत अवतरतो.
सकाळी जागा होतो तेव्हा
त्याच्या स्मितवदनाचं दर्शन होतं
आणि त्यानं सारं घर उजळून निघतं.
सारं घर आपल्या प्रसन्न हास्यात ओसंडत
तेजस्वी ठेवतो.

घरांत तो एकटाच असतो
नित्यनैमित्तिक कामासाठी आम्ही बाहेर पडतो



तेव्हा दारापर्यंत येऊन आम्हाला निरोप देतो.
बस्स !
पण नंतर आम्हीच हर्षोल्लासित -
गाणं गात गात
आमच्या कामावर आम्ही जणू धावतच निघतो.
विविध उद्योग करून कामावरून परत येतो
तेव्हा एकांतात बसला असतो
आमची वाट बघत
रात्री विश्रांतीसाठी मी बिछान्यावर आडवा होतो
बघता बघता निद्राधीन होतो
पण तो मात्र माझ्यासाठी जागत बसतो.
साऱ्यांच्या नजरा चुकवून लावलेली दिवलाणी
पदराआड लपवून
रात्रभर जळत ठेवतो.
झोपेत कितीतरी स्वप्न येतात
आणि जातात
पण तो शांत बसलेला असतो
घरातल्या अंधारात - !

●

## : ५० :

ह्या एकलकोंड्या
मूक : तरीही जागृत देवतेच्या मंदिराचं द्वार
मोकळं कर !
त्या देवतेचं दर्शन मी आज घेईन
रात्रंदिवस इतस्ततः भटकत काय बरं शोधतोय् मी ?
सायंकाळची स्तोत्रं देखील फारशी म्हटली नाहीत
तुझ्या जीवनज्योतीवर आज माझी पणती चेतवणार आहे.
एकांतात बसून पूजा प्रसाधन सजवणार आहे.
विश्वातल्या साऱ्या भक्तगणांच्या तांड्यात
माझी पणती पेटवीन.

●



## : ५१ :

साधका,
आपली जीवनज्योती ज्यावर प्रज्वलित करून तू
ह्या धरेवर अवतरतोस
कोणता रे तो नंदादीप ?

वेड्या,
ह्या जीवनवीणेवर सदान्कदा
करूण रागाचेच स्वर हुंदकारतात -
पण तुझ्या चेहऱ्यावरची स्मित रेखा तशीच कोरीव आहे.
कोणत्या वात्सल्याचं प्रतिबिंब आहे ते ?

प्रेमळा,
आपल्या सुखाचा होम करून
इतस्ततः भटकतोयस्
त्याला शोधण्यासाठी.
तुला व्यथेनं अलंकारून व्याकुळणारा
कोण आहे तो ?
तुझ्या सवंगड्याबद्दलची मला उत्कंठा आहे.
तू मात्र त्याबद्दल निश्चिंत आहेस.
मृत्यूचा विचार सोडून
जीवन कासारी
निःशंकपणानं जलविहार करतो.
कोणता जलाशय आहे रे तो ?

●

## : ५२ :

तू माझा प्राण आहेस.
माझ्या सन्निध आहेस
असं मला सांगता येऊ दे !

माझा सारा जीवनानंद तू आहेस
असं मला सांगता येऊ दे !

माझा मृदु मधुर अविनाशी सूर लागू दे,
वाचेतून अमृत स्त्रवू दे,
माझा जिवलग तू : तूच आहेस
असं मला सांगता येऊ दे !

ह्या आकाशाला,
ह्या धरणीला,
तू व्यापून टाकलं आहेस.'
मला मनापासून वाटतं.
असं मला सांगता येऊ दे !

माझी व्यथा आपल्याला आवळून टाकते
माझं हे नगण्य अस्तित्व - !
त्यामुळंच तू माझ्यावर अमाप प्रेम करतोस
हे माझ्या लहानग्या मुखातून
मला सांगता येऊ दे !

●

## : ५३ :

प्रभो,
तुझ्या पदारविंदाशी मला नतमस्तक ठेव !
माझं मन दुःखाश्रूतून पाझरू दे !-
माझं जीवन, तरंगू दे !
अहंकाराच्या उंच शिखरावरचं
माझं आसन तोडून फोडून
जमीन-दोस्त कर !
आणि तुझ्या
पदारविंदाशी मला नतमस्तक ठेव !

हे जीवन निष्फळ आहे : निरर्थक आहे !
मग गर्व कशाचा करायचा ?
आकंठ भरलेला हा प्रकोष्ठ
तुझ्याविना रिता आहे.
ह्या तुडुंब अहंकाराच्या तळी
नित्य नैमित्तिक कामं रसातळाला गेली आहेत
निदान सायंकालीन अर्चना तरी रिती राहू नये.
प्रभो तुझ्या पदारविंदाशी मला सतत नतमस्तक ठेव.

●

## :७४ :

अरण्यांतल्या अचपल सुगंधी वातावरणांत
कुणाच्या शोधासाठी सैरभैर भटकतोय् मी ?
ह्या भयाण निळ्यानिळ्या आकाशांत
हे कसलं आर्त रुदन चाललं आहे ?
लांबवरून येणाऱ्या ह्या स्वरातली व्यथा
माझं मन पिंजून काढते आहे
ह्या सैरभैर भटकणाऱ्या सुगंधी वातावरणांत
मनोमन शोध चालू आहे !
कुणाला शोधतो आहे मी ?
माझ्या चेतना चेतनवणारा
कोणता राग नंदनवनांत बहरतोय ?
आम्र मंजिरीच्या सुगंधात
नव्या पालवीच्या कुजबुजीत
आकाश, चंद्र किरणानं न्हालं आहे
सुगंधी शीतल समीर,
त्यांच्या सहवासांत
आनंदाश्रूंनी मी रोमांचित झालो आहे -
अनामिक स्पर्शासाठी !
कुणाचा स्पर्श आहे हा ?
●



## : ७५ :

चैतन्यानं फुललेला वसंत आज तुझ्या दाराशी आला
आहे
त्याचं आनंदानं स्वागत कर !
मरगळलेल्या मनानं,
आणि निराश अंतःकरणानं
त्याला सामोरं जाऊन
त्याचा अपमान करू नकोस !
आपलं हृदय मोकळं कर : आपपरभाव विसर
आसमंतातल्या आनंदी आलापांत
तुझे गंधित स्वर मिसळू दे !
अंतरातल्या अमृतानं
तुझी मधुरता
दशदिशांना उधळून टाक !
अंतःकरण चिरणारी व्यथा
वनराईतल्या पानापानातून झिरपते आहे
क्षतविक्षत क्षमा क्षितिजाकडं डोळे लावून
कुणाची वाट बघत बसली आहे ?
दक्षिणवात माझ्या मनाला गोंजारतोय्
समोर वसंत दारावर टक्टक् करतोय्
कुणाला बोलावतोय् तो ?
गंधव्यथित यामिनी -
ही अशी जमिनीवर कुणाच्या चरणापाशी जागत बसली
आहे ?
सुंदरा : गंभीरा : कान्ता : - हे गंभीर आवाहन कुणासाठी आहे ?
●

## : ५७ :

प्रभो,
माझं हृदय तू हरण केलय्स
आता परत फिरू नकोस.
त्याचा आता कायमचा स्वीकार कर
तुझ्या वाचून जाणारा दिवस -
विस्मरणांत जाऊ दे -
गाडून जाळून टाकावासा वाटतो !
तुझ्या सांगाती माझं जीवन
उमलावं ः तेजस्वी व्हावं असं वाटतं
दिन प्रतिदिन सदैव जागृत ः टवटवीत राहावं
अशी माझी इच्छा आहे.
उन्मादानं ः काही बाही ऐकून भरकटलो होतो.
आता तुझे स्वर माझ्या हृदयांत साठवून ठेवावेत
त्यानं
माझ्यातली अभद्र ः फसवी वैचारिकता भस्म व्हावी
एवढीच माझी इच्छा आहे
हे फेरे आता कायमचे थांबव !

●



## : ५९ :

प्रभो
ह्या कवीच्या तोंडाला कुलुप घाल !
त्याची हृद्वीणा ताब्यात घेऊन -
एखादा धीरगंभीर राग छेड !
रात्रीच्या निबिड अंधःकारतल्या सुरांनी
ग्रह ताऱ्यांना आश्चर्यमुग्ध करून सोड.
त्या स्वरांच्या आकर्षणानं
माझ्या जीवनभराचं सारं कार्य
तुझ्या चरणतली विसावू दे !
सारी कामं क्षणार्धात संपवून
तुझं गान भानरहित होऊन
ह्या काळोख्या रात्री ऐकत बसेन

बंद कर माझी ही बडबड !

●

## : ६० :

सारं विश्वं विसावलंय्
आकाश अंधारात आकंठ बुडालंय्
अदृश्य झालंय्
मग माझ्या हृदयवीणेवर हा झंकार कसला ?
होण ह्या तारा छेडतंय् ?
नेत्रीची नीज निमाली
उठून बसलोय् माझ्या मंचकावर मी
भिरभिरती नजर त्याच्यासाठीच स्थिरावतेय्
पण त्याचं दर्शन होत नाही....
होतच नाही - !
गाता गाता गळा दाटून आलाय्
चित्त चिरणारे हे व्याकूळ स्वर....
कोण बरं आळवतंय् ?
कसल्या वेदनांनी हृदयाचं रुदन चाललं आहे ?
अव्याहत ?
काहीच कळत नाही.
नेत्र डबडबताहेत
ही अश्रूंची माला कोणाच्या गळयांत घालायची आहे ?
काही कळत नाही.

●



## : ६३ :

माझा पराजय मला कबूल आहे
तुला लोटता लोटता, मीच दूर गेलो !
माझ्या चित्तवृत्तीतून
तुला अदृश्य केलेलं मला खपणार नाही
माझ्या हे लक्षात आलंय्

गतजीवनाची छाया माझा पाठलाग करतेय्
मोहमयी सुरांनी जखडून ठेवायचा व्यर्थ प्रयत्न करते आहे
त्याचा संग सोडून मी तुझ्या स्वाधीन झालोय्
माझं सर्वस्व आता
तुभ्यं समर्पयामि
तुभ्यमेव समर्पयामि ।

●

## : ६४ :

ह्या साऱ्या जुन्या जंगलेल्या तारा तोडून टाक !
एक एक करून जाऊ देत
आणि नवीन तारा सतारीला जोड.

सकाळचा संगीतोत्सव संपलाय् -
आता सांध्यरागाच्या तयारीला लाग !
त्याचा अंतिम आलाप आता आळवायचाय्
सायंकालीन संगीतसभेची वेळ झाली आहे
सतारीला नवीन तार जोड

अंधाऱ्या आकाशाचं तुझं दार आता सताड उघड
आकाशातील नीरव शांतता घरांत येऊ दे
आजपर्यंतच्या साऱ्या मैफिलींचं
आता समापन आहे.
आतापर्यंत तुला संगत करणारी सतार -
त्यावरचा हक्क सोडून दे
चल
सतारीला नवी तार जोड !

●

## : ६५ :

प्रभो,
मी तुझी स्तुतिस्तोत्रं गात गात
बाहेर भटकतोय्
कधीचा - !
तुझ्या प्राप्तीसाठी आलो आहे
आणि नेमके हेच विसरतोय्
कधीचा - !
झुळझुळ करीत निर्झर कपारीतून बाहेर पडतो
निर्हेतुकपणं अजाणतेपणी अनिर्बंध वहात असतो
माझा जीवन प्रवाह देखील तसाच वाहतो आहे
कधीचा -!
अनंत नावांनी तुला साद घातली
अनंत आकारांनी तुला चितारलं
अनुद्‌भुत आनंदात माझी पावलं
पुढं पुढं पडत राहिली
कधीची - !

एखादी कळी निबिड अंधःकारांत फुलण्याकरता
प्रकाशाची वाट बघत जागत बसते
तसंच तुझ्या दर्शनासाठी माझा आत्मा
आशेनं आणि आकांक्षेनं वाटचाल करतोय्
कधीचा - !

●

## : ६६ :

तुझं प्रेम स्वीकारण्याची माझी पात्रता आहे कां ?
मला शंका वाटतेय्
तू माझ्यापासून दूर गेला आहेस
त्याचं कारण कदाचित हेच आहे
आपल्यांत किती अडथळे आहेत
द्रव्य : मानापमान : सुखदुःखाच्या भावना....
ह्या साऱ्या उभ्या असलेल्या भिंतीआडून
तू मला अधुन मधून दर्शन देतोस !
- काळ्याभोर मेघांच्या सोनेरी किनाऱ्याआडून डोकावणाऱ्या सूर्यासारखा
आणि माझ्या आशा पल्लवित ठेवतोस
तुझी प्रीत तोलणाऱ्यांना तू सशक्त बनवतोस
मधली कुंपणं, आडोसे, भिंती क्षणांत जमीनदोस्त करून टाकतोस.
वनवासी, निर्लज्ज, निर्धन्, निर्लेप, मानापमानातीत -
असा त्याला बनवतोस
आणि मग विश्वात्मका : सर्वात्मका
तूच त्याचं सर्वस्व होतोस
त्याच्या हृदयात प्रवेश करतोस
त्याला आपल्यात सामावून घेतोस
अशा त्या निर्लोभी दयावंताला
मग कशाचीच आवश्यकता नसते !

●



## : ६७ :

पतित पावना
आज पहाटे पहाटे अरुणवर्णी प्राजक्ताचं पुष्प हातांत -
घेऊन तू आलास !
सारीजण निद्रित होती
आपल्या सोनेरी रथातून एकाकी वाटेनं आलास
क्षणभर थांबून, माझ्या गवाक्षातून एक करुण दृष्टिक्षेप
टाकून निघून गेलास !
धूसर पहाटे तू आला होतास
तुझ्या हातातल्या प्राजक्ताच्या सुवासानं
माझं स्वप्नं गंधित झालं
माझ्या खोपटातला अंधार आनंदानं रोमांचित झाला
कोपऱ्यांतली निःशब्द वीणा -
अनाहत स्वरांनी निनादली
माझ्या आळसावलेल्या गात्रांनी मला उठवलं -
पण
मी बाहेर येईपर्यंत तुझा रथ धूळ उडवत
निघून गेला होता
जागृतेश्वरा -
तू माझ्याकडं आला होतास
पण मला दुर्भाग्याला मात्र
तुझं दर्शन झालं नाही
अरेरे !

●

## : ६९ :

गेली !
ती बोट पार पल्याड गेली
आता तुझं हे सामान....?

आता असं कर....
हे ओझं, इथं, मागंच राहू दे
त्यानंच तर तू असा अडकून पडतोस !
आपल्या घरकुलातलं हे ओझं आटापिटा करून....
पाठीवर थापून बोटीसाठी किनाऱ्यावर आलास....
त्यासाठी किती चकरा मारल्यास, आठवतं ?

आता हे ओझं इथंच टाकून दे -
नदीच्या प्रवाहात वाटलं तर हे सामान वाहून
जाऊ दे
निर्लेप होवूनच त्याच्या चरणारविंदांवर
स्वतःला अर्पण कर !
हं चल
त्या माझीला साद घाल
दे आवाज त्याला....!

●

## : ७० :

ह्या (श्रावण) मेघांबरोबर माझं मन सैरभैर भटकतय्
ह्या मेघांची वीणा विजेच्या चपल बोटांनी
रौद्रतानांची आतषबाजी करतेय्
त्यांची स्पंदनं माझ्या हृदयात उमटतायत्
हा निळानिळा अंधःकार -
जणु कडे करून माझ्या भोवती जमा झाला आहे
त्याचं प्रतिबिंब माझ्या चित्तात दाटतंय्
ही वावटळ त्याच्यात सहभागी होऊन
बेधुंदपणं नृत्य करू लागली आहे -
बेफाम होऊन अनिर्बंध धावत सुटली आहे !

●

## : ७२ :

तुझं आसन माझ्या हृदयाच्या अंधःकारानं वेढलं गेलं
आहे
कारण मी प्रज्वलित केलेली पणती विझू विझू जातेय्
ह्या वेलीचं मूळच सुकलं आहे
त्यामुळं कळया कोमेजून जातात. न फुलताच
ह्या माझ्या व्यथांनीच मी तुझी पूजा करतो
त्याला सेवा तरी कशी म्हणायची ?
पुण्यदरिद्रीच मी !

एकाकी : दीन : लज्जित
दैन्याची आणि लज्जेची वसने लेऊन आलेला
परित्यक्त !
तुझ्या आगमनाचा उत्सव साजरा करण्यासाठी
ना घर सजवलं : ना मंगल वाद्य जुळवलं
माझ्या व्यथेनं आक्रंदून तुला पाचारण केलं -
ते सुद्धा भंगलेल्या मंदिराच्या सोपानावर !
●



## : ७३ :

सगळ्यांपासून दूर तुला लपवून ठेवावं
अशी एकाकी जागा माझ्या घरकुलात कुठं आहे ?
माझ्या रोजच्या दिनचर्येच्या धावपळीत -
माझ्या मित्रमंडळीच्यात वावरत असतांनाच जर
माझ्या सोबत राहिलास
तरच मी तुला बांधून ठेवू शकेन !

तुझा सन्मान मी काय करणार ?
प्रभो
तुझ्या पूजेचं साहित्य देखील माझ्या जवळ नाही.
तुझ्यावर जर माझं खरोखरच प्रेम असेल
तर माझा पावा आपोआप वाजू लागेल
आणि बघता बघता रानफुलं
डालीडालीवर डोलू लागतील !
आपणहून !!
●

## : ७४ :

प्रभो,
बासरीवर वज्रकठोर : घणाघाती स्वर देखील
तू किती सहजतेनं वाजवतोस
त्यानंच मला जागृती यावी
असेच कान मला दे !
माझा अंतःप्राण, माझा आत्मा
त्याला माझ्या दृष्टिआड करू बघतोय्
माझ्या मृत्यूचं वलय !
पण आता त्याचा विसरं मला पडणार नाही.
त्यातच मी मग्न होवून जाईन
तुझ्या स्वरलहरींवर सारं आसमंत
बेभान होवून नाचत असतं.
माझ्या हृदयवीणेच्या तारांतून
ते झपाटून टाकणारं संगीत
झंझावाताप्रमाणं दशदिशांत हेलकावू दे !
त्याचा तो उन्मत्त आक्रोश मी सहन करीन -
पण ह्या साऱ्या गुंतावळीतून
मला उपसून काढ
प्रचंड वादळाच्या गाभ्यांत जी
चिरशांती असते
तिकडं मला घेऊन चल !

●



## : ७५ :

माझ्या जीवनावर चढलेली ही काजळी,
तुझ्या कृपावलयानं पुसल्या जावी.
त्याशिवाय मी चरणस्पर्श करू शकणार नाही
तुझ्यासाठी आणलेली ही फुलांची डाली
धुळीनं माखली आहे.
तुझ्या पायाशी कशी वहायची ?
माझं जीवन निर्मल कर
आजपर्यंत तुझ्या मीलनाची तळमळ होती....
हे शरीर मलीन झालंय्
ते शुचितेसाठी तळमळतंय्
प्रभो त्याला धीर दे.... जवळ घे
पुन्हा कलंकित होण्यासाठी लोटू नकोस !

●

## : ७६ :

सभा समापनानंतर मी कोणती भैरवी गाईन ?
ती गायला मला सुचेल ?
मी भांबावून जाऊन तुझ्या मुख कमलाकडंच
बघत राहीन, एकटक !
मला अजून सूरच सापडत नाही
मग भैरवी कशी गाता येईल ?

तुझ्याबद्दलची माझी प्रेमव्यथा
सायंकाळच्या सोनेरी मेघांनी आच्छादली आहे

ह्या भैरवीच्या सुरांची रियाझ मी दिवसरात्र करत असतो.
ती रियाझ फलद्रुप होईल का ?.... ह्या जन्मांत तरी ?
तसं झालं तर हे मनीमानसींचं कमलपुष्प
शेवटच्या आलापाबरोबर
अंतिम सागराला अर्पण करीन !

●

## : ७७ :

प्रभो,
माझी आजन्म वेदना
हीच माझ्या जन्मजन्मांतरीची साधना आहे !
माझ्या दुर्बलतेमुळं माझ्यावर कृपा करू नकोस !
अमर्याद व्यथा सहन करण्याची माझी मनीषा आहे.
तुझ्या तेजानं माझी सारी वासना भस्म होऊन जाऊ दे !
तुझ्या आवाहनासरशी मला आवळणारी सारी बंधन
गळून पडू दे !
तुझ्या अमोघ शंखध्वनीनं माझी निद्रा चळू दे !
माझा सर्व गर्व नष्ट होऊन -
काळझोप सरून
सारी तीव्रचेतना जागी होऊ दे !
करुणाकरा, आता उशीर करू नकोस !

●

## : ७९ :

प्रभो, माझ्या प्रेमाचा जलौघ तुझ्याकडंच
सतत धाव घेऊ दे !
माझ्या साऱ्या आकांक्षाची जाणीव तुला होऊ दे
माझ्या चित्तवृत्ती तुझ्या आवाहनाला अनुसरू दे
माझी सारी संकटं,
तुझ्या आकर्षणानं विरघळून जाऊन देत !
हे भिक्षापात्र क्षुद्र वस्तूंनी भरलय्
ते रिकामं होऊन तू दिलेल्या दानानं
भरुन जाऊ दे
मुकाटपणानं मी ते अंतःकरणांत सामावून ठेवीनं
माझ्यांत जे काही शिव आहे : सुंदर आहे
ते तुझ्या संकीर्तनानं निनादित होवू दे !

●



## : ८१ :

"तुझे दूत" असं सांगून त्यांनी मला वाटेत अडवलं
आणि कफल्लक केलं
अशा निष्कांचन अवस्थेत पैलतीर कसं गाठायचं ?
मला निष्प्राण : निर्धन केलं ते तुझ्या सांगण्यावरून
असं ते म्हणाले
जे काही किडुकमिडुक होतं ते हिरावून घेतलं -
- ते तुझे सहचरी आहेत, असं सांगून !
पण खरं सांगू ?
त्यांची कुटिलता मला माहीत आहे.
- आणि माझी दुर्बलता देखील ते जाणतात
त्यामुळं
आता ते राजरोसपणं निर्लज्ज होऊन
उजळ माथ्यानं माझ्यासमोर
माझी वाट अडवून उभे आहेत !

●

## : ८२ :

मी जागा झालो !
रात्र शुभ्रचांदण्यानं न्हाऊन निघत होती
अशावेळी मी तुझ्याजवळ येऊ शकेन कां ?
त्या अपूर्व मुखकमलाचं ह्या आतुरल्या नजरेला
दर्शन होईल कां ?
साश्रु नयनांनी
माझ्या कंठातून स्त्रवलेले स्वर
तुझ्याभोवती भोवती रेंगाळत राहतील कां ?
माझं देयदान परत करशील,
ह्या भीतीनं
तुझ्या चरणावर स्वतःला अर्पण करण्याचा धीर
मला झाला नाही,
आणि एकांतात तोंड खुपसून बसलो मी !
पण तू अनाहूतपणं येऊन
मला जवळ घेऊन उठवलंस
तरच माझ्या निष्कांचन दारिद्र्याचा
नाश होईल !

●



## : ८४ :

ह्या एकाकी घरकुलातून निघून
विशाल विश्वात विहरता
येईल कां ? -
माझ्या जिवाच्या सहाय्यानं ?
सर्व सवंगड्यासकट माझ्या कामांत गढून जाईन
आणि अशाच गजबजाटात तुझी भेट होईल.
खरंच ! असं मला करता येईल ?

ह्या सुखदुःखाच्या अथांग सागरांत
मनसोक्त हुंदडत त्या लाटांना सामोरा जाईन -
त्याचे आघात सोसत, हुंदके देत देत
मी तुझ्या कुशीत शिरेन
जगाच्या गजबजाटात, त्या कोलाहलांत
तुझा मंजुळ स्वर व्यथेला गोंजारत मला शांत करील
ह्या एकलकोंड्या घरातून मला बाहेर पडता येईल ?

●

## : ८५ :

छेः
असं मोहाच्या धुक्यानं आपल्याच मनाच्या गुंतावळीत
अडकण्यात काही अर्थ नाही
वाटलं, तुला बाहुपाशांत बांधून टाकावं....
पण तसं करतांना मीच मला कवटाळून बसतो !
तुझ्या अस्तित्वाची खूण पटतांच
तुला मी माझ्यांत सामावून घेईन
माझ्या मनाच्या देठावर
विश्वकमल विराजमान झालं आहे
त्या कमलावर तेजोवलय बघायची माझी इच्छा आहे !

●



## : ८६ :

प्रभो,
तू मला जागृत केलं आहेस
माझ्यावर दयेचा वर्षाव करत असाच माझ्याजवळ रहा
माझ्याकडं पाठ फिरवू नकोस !
रानावनातल्या वृक्षराजींवर आषाढघन बरसताहेत
गर्जना करत.
त्यामुळं ही शर्वरी आळसावून निपचित पडली आहे.
प्रभो, कारुण्याचा वर्षाव करत
असाच माझ्या जवळ रहा !

मेघांच्या सतारीवर सौदामिनीचा झाला सुरू झाला आहे.
त्याच्या तालावर माझं उल्हसित मन
नाचू गाऊ लागलं आहे !
अश्रूधारांच्या रूपानं माझं हृदय
अंधाराचा शोध घेतय्
तर कधी आकाशाकडे हात पसरून
चाचपडतंय्
आता मला सोडून जाऊ नकोस
दयेचा वर्षाव करत करत
असाच माझ्या जवळ रहा !

●

## : ८९ :

माझं प्रेम
असं अश्रू ढाळीत का बरं बसेल ?
ते भित्र नाही : आणि कमकुवतही नाही
सुखाच्या आणि मोठेपणाच्या स्वप्नात
कशाला त्याला रमवायचं
ह्यात कसला मोठेपणा ?
आनंदानं बेभान होऊन तुझ्या सांगाती त्याला रहायचय्
तुझ्या तांडवनृत्याच्या भयंकर तालात
ते शंकेनं व्याकुळतं -
आणि लाजून : भिऊन तुझ्यापासून दूर दूर पळू लागतं
माझ्या साऱ्या क्षुद्र स्वर्गीय आशांना
पाताळांत पळवून
तुझ्या रुद्र रूपात विलीन व्हावं -
माझ्या प्रेमानं !

●



## : ९० :

माझी जीवनवीणा
ह्यापेक्षाही जास्त आघात सहन करू शकेल !
निःसंकोचपणं तार खेचून
त्यातून रौद्र स्वर निघू देत
माझ्यात एका रागाचं कलम तू केलं आहेस
तो तुला हवा असलेला राग आणि स्वर
अजून झंकारला नाही.
त्यासाठी तार कितीही ताणलीस
तरी त्याला माझी तयारी आहे.

मला नाजूक करुण राग नको आहेत
त्यानं सारं जीवन फुकट जाईल
ज्वालेसारखा प्रखर : वादळासारखा भयाण
आसमंत ढवळून टाकणारा राग वाजवून
मैफिलीचं समापन होऊ दे !

●

## : ९१ :

हं,
सुरेख झालं
उत्तम केलंस
असाच माझ्या हृदयांत अग्नी चेतव
हा धूप जळला नाही
तर सुगंध कसा पसरेल ?

प्रकाश पसरण्यासाठी दिवा जळावा लागतो
तुझी चपराक उपकारक असते -
माझं मन आळसावून बसतं तेव्हा.
माझ्या नजरे समोरचं
लाजेचं आणि मोहाचं पटल फाडून फेकून दे !
समोरचा अंधार
आपल्या कठोर वज्राघातानं घालवून
प्रकाश दाखव !

●



## : ९३ :

तुझ्या नित्याच्या कामात मला सहभागी करून घेणार
नाहीस कां ?
हळुवार गोंजारून
मला झोपेतून उठवणार नाहीस ?
ह्या विश्वाच्या कार्यशाळेत
साऱ्या बऱ्यावाईट घडामोडीत
तुझ्याच सांगाती रहावं आणि तुझा परिचय व्हावा
असं वाटतं
सायंकाळी लांब लांब होत जाणाऱ्या सावल्यांच्या सांगाती
एखाद्या एकांत स्थळी
तुझी ओळख होईल असं वाटलं होतं
पण
अंधारात एकट्यानं भेटणं तुला
हे भासमय होईल
त्यापेक्षा बाजाराच्या गजबजाटात
देवाण-घेवाणाच्या गर्दीतच
मी तुला साद घालीन !

●

## : १४ :

सर्व सवंगड्यांसमवेत
तू नाचत खेळत असतोस
त्याच ठिकाणी तुझं माझं मीलन व्हावं, जनांत !
वनात : मनात
अशा एकांतात नव्हे !
जिथं तू सर्वांच्या सांगाती असतोस
तेव्हाच तू माझाही असतोस.
सर्वांना आपल्या बाहूत कवटाळत असतानाच
माझंही तुझ्या बद्दलचं प्रेम
जागृत होईल
प्रीती अध्याहृत नसते
ती प्रकाशाप्रमाणं सर्वदूर संचार करते
सर्वांना प्रेम वाटत सुटतोस
हाच माझा आनंद आहे.

●



## : १५ :

तुझ्या स्निग्ध : पवित्र, शीतल सावलीत
मला पाचारण कर !
माझं जीवन गलितगात्र झालं आहे
अगणित विचारांना अन् विकारांचा हा भुंगा
पोखरून, पोखरून अधिकच निपचित करून सोडतोय्
जिणं मातिमोल झालंय्

तुझ्या दाट, प्रशांत, उदार आणि अमर्याद सावलीत
त्याला मुक्ति दे
नीरव रात्रीच्या एकांती
मला वाचिविराम दे
माझं बाह्य स्वरुप : निष्कासित जीवन
एकसंघी कर !

●

## : १६ :

ह्या जगात जिथं तू सहजपणं आणि मनसोक्त
उपलब्ध आहेस
तिकडं मी कसा जाईन बरं ?

सुवर्णपात्रात प्रकाशाच्या धारा
अविरत कोसळताहेत
सूर्य-तारे त्या सातत्यानं वाहून नेताहेत
अनंतजीव गगनमंडळी विराजमान झाले आहेत
तिकडं मी कसा जाईन बरं ?

सर्वांना दान देत
तू सिंहासनावर विराजमान झाला आहेस
तिकडं मी कसा जाईन बरं ?

जिथं तुझ्या नवरसयुक्त नवनवीन स्वरुपाचं
प्रकटीकरण सातत्यानं होत असतं
तिथलं आमंत्रण
मला ह्या जन्मी मिळणार नाही का ?
तिकडं मी कसा जाईन बरं ?

●

## : १७ :

प्रभो,
माझं गायन ही तुझीच किमया आहे
कळीचं तू फूल फुलवतोस, तसंच !
पण त्या फुलाला मी माझं माझं म्हणत
आनंदानं कुरवाळत राहतो.
माझीच देणगी म्हणून तुला अर्पण करतो !
मोठ्या प्रेमानं हसत हसत तू ती स्वीकारावीस
आणि माझा मान ठेवावास !
मला माहीत आहे
पूजेनंतर ते धुळीत गळून मातिमोल होईल
पण मला त्याचं काही वाटणार नाही
तुझ्या हातून गळून पडलेली अनेक सुमनं
अशीही मातिमोल होतात
सारी संपदा अशी रिती होतेय् असं वाटतं
पण प्रभो,
ही गीतं माझ्या जीवनांत
क्षणभर फुलतात
पण मला अनंत कालपर्यंत कृतार्थ करतात !

●

## : १८ :

प्रभो,
मी सदासर्वदा तुझ्याकडंच बघत असावं अशी
माझी मनीषा आहे.
ही एकमेव इच्छा तृप्त करावीस
मी केवळ तुझ्या सन्मुख असावं,
तुझ्याकडंच माझी दृष्टी वळलेली असावी
माझ्या नेहमीच्या दिनचर्येत, साऱ्या व्यथा,
साऱ्या आकांक्षा ह्यातून माझं मन अलिप्त असावं
माझ्या साऱ्या आशा आकांक्षा सैरभैर धावतात
पण माझी ही एकमेव इच्छा तू तृप्त कर !
अहोरात्र ही व्यथा मला जाळत असते
दिवसानुदिवस माझा सारा आनंद
ह्या एकाच सूत्रात गुंफला असतो.

●

## : १९ :

आषाढानं पुन्हा येवून आकाशाला झाकळून टाकलय्
मृद्गंधानं तुडुंब भरून वारा वाहतो आहे
ते पाहून माझं हृदय देखील रोमांचित होऊन आनंदानं
भारावून गेलंय्

आषाढानं पुन्हा आकाशाला गवसणी घातलीय्

ह्या लांबलचक हिरवळीवर त्यानं सावली धरलीय्
त्याच्या आगमनाची ग्वाही फिरवत
ही छाया इतस्ततः धावतेय्
त्याचा प्रतिध्वनी माझ्या अंतःकरणात निनादतोय्
नयनी वचनी हृदयी एकच धृपद
सारखं सारखं घोळतंय्
"तो आला आहे" "तो आला आहे" !

आषाढानं पुन्हा सारं आकाश आच्छादून टाकलय् !

●

: १०० :

माणसांच्या रूपानं पाऊस वावरतो आहे कां ?
हं !.... मला तसंच भासतंय्.

तो पहा उगाचच् किंचाळत चालला आहे
हां इकडे बादशाही वैभवात जणु डोलतोय्
ह्याच्या अंर्तमनातलं भीषण नृत्य स्पष्ट जाणवतंय्
पलीकडला तो -
अनिर्बंध धावतोय्
एकमेकांशी हे विजेच्या कडकडाटासारखे भांडताहेत
सारी जण आज मला पावसासारखी भासताहेत !

तो पहा - तिकडे पहा
मेघांचा प्रचंड जमाव
पाठलाग करत दूर कुठं तरी निघाला आहे
कशासाठी ?.... कुणास ठाऊक -
एखाद्या अभेद्य आणि विशालकाय पर्वताच्या पायथ्याशी
काळ्याकभिन्न रात्री
घनघोर वर्षाव करतील
केव्हा ?.... कसा ?



काहीच कळत नाही
त्या घनघोर ऐश्वर्यात
जीवन मरणाच्या खेळात
किती भयानकता असेल
कुणास ठाऊक ?
सारीजण आज मला पावसासारखी भासताहेत !

हा वादळवारा आरडा ओरड करंत
ईशान्येच्या कानांत
काय बरं कुजबुजतोय् ?
अनाकलनीय : अबोल व्यथा
दूर कुठं तरी... ह्या भयाण अंधारात पिटाळून लावतोय्
का ?
ह्या तिमिरतली अविलंब कार्यासाठी
कृष्णविचार गर्दी करताहेत

सारी जण मला आज पावसाच्या वस्त्रात हिंडतांना
दिसताहेत !

●

## : १०३ :

प्रभो,
तुझ्या आनंदमय रागाचा ख्याल माझ्या जीवनात
सातत्यानं गर्जत राहो.
तुझं असीम आकाश : त्याची अक्षय आभा
माझ्या झोपडीच्या इवल्याशा कवाडांना पाहून
परतायला नको

नववनोन्मेषित षड्‌ऋतु
त्याचं अमर्याद नर्तन
सतत माझ्या हृदयी ठसो
तुझा आनंद माझ्या चित्ती
अनावरणीय आणि अनिर्बंध राहो.
माझ्या व्यथेला
तुझ्या पवित्र आणि दैदिप्यमान आनंदाचं
कवच लाभो
त्यानं माझं दैन्य छिन्नविच्छिन्न होऊन
माझ्या कार्यातून फुलून येवो !

●

## : १०४ :

तुमच्या सर्वांच्यात मला सामावून घ्या !
जिथं आसनासाठी किंमत मोजावी लागणार नाही
- जिथं दुरावा वाढवणाऱ्या मर्यादा घातल्या नाहीत
- जिथं मानसन्मानाची दरी अस्तित्वातच नाही
तिथं, सर्वांच्या समवेत : अगदी खालच्या पायरीवर
जमीनीवर : धुळीत
मला आसन मांडू द्या.

जिथं वातावरणात मोकळीक आहे.
निःसंकोचपणानं
स्वतःची ओळख करून देता येते.
स्वत्त्वाचं आवरण जिथं नाही
तिथं माझी निर्लज्ज दीनता
त्याच्या परमपवित्र दानानं दूर लोटीत
तुम्हा सर्वांमधे मला सामावून घ्या
त्यासाठीच मी तुमच्याकडं आलो आहे !

●

# : १०६ :

मना,
हा भारत देश,
श्रेष्ठ महापुरुषांचा एक विशाल सागर आहे.
त्याच्या सान्निध्यांत शांत आणि दक्ष रहा.
ह्या भारतवर्षाच्या पुरुषश्रेष्ठांना
आपले बाहू पसरून
आनंदानं अन् श्रद्धायुक्त अंतःकरणानं
मी अभिवादन करतो.
त्यांना माझे शतशः प्रणाम

ध्यानस्थ आणि एकचित्त असलेल्या पर्वतराजींच्या
शिखरावरून खळखळ खळखळ जपमाला ओढणाऱ्या
नदीच्या किनाऱ्यावरून
ह्या पुण्य भूमीवरून
आपली नजर विचलित होवू देऊ नकोस !
हा महापुरुषांचा विशाल सागर
आपल्या डोळ्यांत साठवून ठेव !

अनामिक आमंत्रणानं अगणित अतिथी
अगम्य क्षेत्रांहून असीम ओढीनं आले
ह्या सागरांत विलीन झाले.
आर्य, अनार्य, द्रविड, हूण
शक, पठाण, मोंगल
सर्वांना ह्या महासागरानं
एकजीव करून
सामावून घेतलं



आज पश्चिमेचं दार उघडलय्.
तिथले अतिथी येतील
भेटी आणतील
देवाण घेवाण होईल
एकमेकांत मिसळतील, एकजीव होतील
ह्या सागरतीरावरून परत जाणार नाहीत.
रक्ताच्या नद्या वाहणारे
विजयाच्या उन्मादानं यशोगीत गाणारे
कंटकपथ तुडवीत, अभेद्य पर्वत पोखरून
आता माझ्यात एकरूप झाले आहेस
न दुरावता माझ्या समीप आले आहेत
त्यांचे भिन्न भिन्न स्वर माझ्यांत भिनले आहेत
त्यांची सुरेल वीणा सतत निनादत राहिली पाहिजे.
दुरावलेले दुर्लक्षित, बंधनातीत होऊन
भारताच्या भोवती फेर धरून नाचत नाचत
माझ्यात सामावून जातील
एकेकाळी इथं विभिन्न हृदयं एकत्र करणारा
ओंकाराचा मंत्रजागर झाला होता.
या यज्ञात भिन्नत्वाची आहुती देऊन
एक विशाल एकचित्त उदयाला आलं.
त्या साधनेच्या, आराधनेच्या यज्ञाचं
महाद्वार उघडलं आहे.
सर्वांनी एकरूप होऊन नतमस्तक झालं पाहिजे.
ह्या होमाची लाल शिखा धडधडते आहे.
त्याचा दाह सहन करणं दैवदत्त आहे.
हे सारं दुःख सहन करून
एकतेच्या आवाहनाला हुंकार भर !
लज्जा भीति - त्यावर मात कर !

अपमान रिचवून टाक
असह्य प्रसुती वेदनेतून नवीन विशाल जीव जन्म घेईल
शर्वरीचा शेवट होईल
ह्या सागर तीरावर माता जागत बसली आहे.
आर्य....अनार्य....मुस्लिम.....ख्रिश्चन....इंग्रज
सारे....सारेजण या
ब्रह्मवृंदानो, सर्वांना शुद्ध मनानं हात द्या
पतितांनो, सारा अपमान झटकून टाका
भारतमातेच्या अभिषेकांत सामील व्हा
तुमच्या सर्वांच्या स्पर्शानं पवित्र झालेल्या तीर्थानं
ह्या भारताच्या सागरतीरावरचा मंगलघट
अजून पूर्ण भरला नाही.
●



## : १०८ :

माझ्या हतभागी देशा,
ज्यांची मानहानी केलीस
तेच तुझा आता अपमान करताहेत !
त्यांचे मानवतेचे हक्क हिरावलेस
आपल्यासमोर तिष्ठत ठेवलंस
त्यांना कधीही अंकावर खेळवलं नाहीस
तेच तुझा अनमान करताहेत !
त्यांना स्पर्श करायचं तू सातत्यानं टाळलंस,
त्यांच्या हृदयातल्या परमेश्वरापासून
लांब लांब पळालास
ह्या तुझ्या वागणुकीनं रागावलेला परमेश्वर
तुला शिक्षा करतोय् !
त्यांच्याच प्रमाणं
आज दारिद्र्यात खितपत पडून
अन्नासाठी दारोदार भटकावं लागतय् तुला
हे सारं त्यामुळंच !
त्यांच्याच पातळीवर ढकललय् त्यानं !
त्यांच्या बरोबरच अपमानाचा वाटेकरी व्हावं लागेल तुला
आपल्या उच्चासनावरून त्यांना झिडकारलंस,
खोल दुर्दशेच्या खाईत लोटलंस
टाचेखाली चिरडलंस्
त्यांचं जीवन मातीमोल केलंस
आता तुला देखील असंच पतित व्हावं लागेल
त्याशिवाय तुला मोक्ष नाही
ज्यांचा अपमान केलास, त्याच पातळीवर तुला जावं
लागेल

ज्यांना तू खाली फेकलंस, तिथंच तुला धरून ठेवताहेत ते
ज्यांना मागं हाकललंस तेच तुला आता मागं ओढताहेत
अज्ञानाच्या अंधारात लोटलंस
तेच तुझ्या मांगल्याला ग्रहण लावताहेत !
त्यांच्या दर्जानंच तुला आता जगावं लागणार आहे.
शतकानुशतकं ह्या पापाचा भार तुझ्या माथ्यावर वाढतोय्
पण अजून तू ह्या जनताजनार्दनासमोर
नतमस्तक होत नाहीस !
ह्या हीन दीप अपावनांत ईश्वर नांदतो आहे
नजर खाली वळवल्याशिवाय तुला तो दिसणार नाही !
- आणि त्याला तुझी तयारी नाही !
त्यांच्या पातळीवरच तुला रहावं लागेल
दाराशी उभा असलेला मृत्युदूत तुला दिसत नाही का ?
तुझ्या जातीय अहंकाराला शाप देतोय तो.
सर्वांच्या समवेत न राहता वेगळेपणा दाखवशील !
गर्वाचा ताठा दाखवशील !
पण मृत्यूच्या चितेत तुला
सर्वांच्या बरोबरच भस्म व्हावं लागेल !
●



**: १०९ :**

घट्ट धरून, ठामपणं उभा रहा.
यश तुझंच आहे
तो पहा
अंधार विरळ होत चालला आहे
आता कसली भीती ?
ते बघ तिकडं बघ
दाट काळोख्या, निबिड अरण्यापलिकडे
पूर्वेच्या तेजःपुंज भाळी,
शुक्राचा तेजस्वी कुंकुमतिलक बघ !
आता कसली भीती ?
नैराश्य : आलस्य : संशय
आत्मविश्वास गमावलेली,
ही सारी निशाचरं आहेत.
प्रकाशाला सामोरी जाणारी नाहीत ही.
ये, पटकन बाहेर ये !
ते बघ,
ताठ मानेनं निरखून बघ,
आकाशांत आभा आकंठ ओसंडतेय् !
आता कसली भीती ?
●

## : ११० :

प्रभो, माझं हृदय व्यापून ठसला आहेस तू !
आता कांहीही केलंस तरी चालेल.
असा हृदयस्थ असतांना
बाहेरचं सारं झाडून टाक !
मला निरिच्छ करून -
माझं चित्त परिपूर्ण करणार असशील -
तर वाळवंटातलं रखरखीत ऊन देखील
सुसह्य होईल
निरनिराळे खेळ तू माझ्याबरोबर खेळत असतोस
कधी हसवतोस तर कधी रडवतोस
त्यानं देखील मला खूप आनंद होतो
अनेकवेळा कांही गमावलय् असं वाटतं
पण विचारांती मला ते सापडतं
अंकावरून खाली ढकलतोस -
आणि पुढल्याक्षणी हृदयाशी कवटाळतोस
तुझ्या साऱ्याच खेळात माझं मन रमतं !

●

## : १११ :

मी तुझं नामस्मरण करतो. ही आत्मप्रौढी नाही....
त्याचं प्रदर्शनही करत नाही.
का ? - ते तुला कळलय्
अरे तुझं नाव उच्चारायची
माझी पात्रता तरी आहे का ?
सारी जण मला कांहीबाही बोलतात
मग माझं मलाच वाटू लागतं
तुझे अभंग मला मनातल्या मनातच
का बरं गुणगुणावेसे वाटतात ?
नक्कीच तुझा माझा दुरावा असला पाहिजे.
....भजन कीर्तनाच्या बुरख्याआडून
मी स्वतःलाच तर अलंकारत नाही ?
आणि मग माझीच मला लाज वाटते.
प्रभो,
ह्या वृथा अहंकारापासून माझं रक्षण कर
मला माझ्या योग्यतेची जाणीव करून दे !
परकीयांच्या नजरेपेक्षा तुझीच दृष्टी
मला लाभू दे
तुझ्या दयेसाठीच माझी अर्चना चालू असतांना
मला दुसरं काही नको
तुझ्या पायपथीत धुळीत : चुकत माकत
तुला आळवत बसेन
बस्स.
एवढंच !

●

## : ११२ :

मृत्यू कवटाळील तेव्हा
इथलं सर्व सोडून जाईन असं कोण म्हणतं ?
ह्या जगांत येतांना जे आणलं
ते सर्व सोबत न्यायलाच हवं !
ह्या सर्वसंपन्न कोषागारांत आल्यावर
रिक्त हस्तानं थोडंच जायचंय् !
मग जे न्यायचंय्
ते निदान व्यवस्थित
बांधून घेऊन जायला हवं !
हा जो निरर्थक पसारा जमवला आहेस
तो मात्र तुला नष्ट केला पाहिजे.
नाहीतर धडगत नाही
इहलोकी आलाच आहेस तर
छानपैकी वेशभूषा कर,
आणि राजेशाही थाटात
मरणातीत उत्सवात
हसत हसत सहभागी हो !

●



## : ११३ :

त्या पलिकडल्या किनाऱ्यावरची ही आषाढातली पहाट
मनाच्या कोपऱ्यात जपून ठेव !

हिरवा रंग...निळा रंग...सोनेरी रंग....
त्यांच्या मिश्रणाचं अमृत सिंचन झालं आहे
अस्मानी आभाळाखाली
गंभीर हुंकार गातो आहे
ते अमृत.... ते हुंकार
आपल्या हृदयांत जपून ठेव !

आणि हो....
प्रवासाला निघतांना
ह्या किनाऱ्याच्या बाजूची फुलं खुडून घे
भरभरून !
आपल्या हृदयकोशांत त्यांची माला गुंफून ठेव
काळजीपूर्वक !
ही ठेव तुला सापडली
मोठा भाग्यवान आहेस तू
आपल्या मनाच्या खोलखोल कप्प्यात
जपून ठेव ती !

●

## : ११५ :

माझ्या ह्या छोट्याशा घरकुलांत
लहानसं रूप घेऊन प्रवेश करतोस
दयार्द्र अंतःकरणानं
हेच तुझं माधुर्य !

ह्या विशालतेत स्वीकारलेलं लहानपण
माझ्या डोळ्याचं पारणं फेडतं
जळी स्थळी काष्ठी पाषाणी
अनंत रूपं घेऊन असतोस....
पिता माता बंधू
तुझी रूपं तरी किती सांगावीत
सूक्ष्मरूपानं माझ्यात सातत्यानं
वास करीत असतोस....!
विश्वरूपा -
तुला आणखीन किती सूक्ष्म करू ?
अशा नगण्य नात्यानं तुझी ओळख करून घेऊ ?
....आणि करून देऊ ?
●



## : ११७ :

अरे मी एक यात्रिक
मला कोण अडवणार ?
सुख : दुःख.... सारं झूट आहे.
हे घरकुल सुद्धा मागं मागं येणार नाही.
मागं ओढणारा विषयाचा पाश
....तुटून, मोडून पडेल.

अरे मी एक यात्रिक
खुल्या दिलानं गातगात
पुढं जात राहणार
शरीराची सारी कवाडं उघडतील
सारी इच्छाबंध तटातट तुटतील
पापपुण्याला पादाक्रांत करीत जात राहणार
इहलोक चालत चालत त्या लोकांत जाईन

अरे मी यात्रिक आहे
शिरावरचे सारे ओझे नाहीसे होईल
कुणा अनामिकाचे शब्दातीत स्वर
अनंत आकाशांत आमंत्रित करताहेत
मला दूर दूर आवाहन करणारा
कुणाचा बरं पावा
मला सांज सकाळ साद घालतो आहे ?

अरे मी यात्रिक आहे
मी बाहेर पडलो - कोणती पहाट होती ती ?
पहाट पक्षी गात नव्हते

रात्रीचा कोणता बरं प्रहर होता तो ?
अंधारात फक्त
एक नेत्र जागत होतं

अरे मी यात्रिक आहे
दिवस मावळता मी अनोळखी घरी जाणार आहे
तो दिवस कोणता ?
तो अनोळखी कोण ?
कुठला तारा तिथं दीप प्रज्वलित करील ?
वाऱ्याला धुंद करणारा -
कुठला पुष्प पराग असेल ?
लडिवाळ नेत्रांनी
कोणता अनादिकाल माझी वाट पहात असेल ?
कुणास ठाऊक ?
●



## : ११८ :

आकाशांतले ढग चिरत,
ध्वजा फडकवत धावणाऱ्या रथातून
कोण आलंय पहा !
आपल्याच घरात आपल्याला कोंडून घेऊ नकोस
पुढं हो आणि रथाच्या पुढच्या प्रवासाला मदत कर
तसा प्रयत्न करणारे पुष्कळ आहेतच
जा. त्यांच्यात मिसळून जा आणि त्यांना मदत कर.
बाकीची घरगुती कामं राहू दे
तन मन एकवटून, जिवाची पर्वा न करता
जगन्नाथाच्या ह्या रथाचा दोर ओढायला सुरवात कर
अंधार वा प्रकाश : शहर वा खेडं : अरण्यात वा
पर्वतराजीत
ह्या साऱ्या मार्गावरून हा रथ घेऊन जा !
पुढं पुढं, धावणाऱ्या चाकांची घरघर
तुझ्या अंतःकरणापर्यंत पोहोचली नाही का ?
त्यानं तुझं रक्त उसळून येत नाही का ?
मृत्यूवर कुरघोडी करणारं संगीत
तुझ्या मनात रुंजी घालत नाही का ?
खळखळत्या वेगानं
पुढंच धावणाऱ्या नदीच्या प्रवाहाप्रमाणं
तुझी मनीषा उद्याकडं धाव घेत नाही का ?
●

## : १२० :

अनंता,
अवकाशांतले तुझे स्वर
माझ्या अंतरातला तुझा प्रकाश मोहक करतात !
निरूपा
तुझ्या अनेकविध रंगांनी,
गंधांनी, स्वरांनी, छंदांनी
माझ्या हृदयसागराला भरती येते,
त्यानं तुझी शोभा अधिकाधिक वाढत जाते !
सारे अडथळे तुझ्या माझ्या मीलनात
विरघळून जातील
विश्वलाटांचं प्रचंड आंदोलन सुरू होईल
तुझ्या छायाहीन प्रकाशाला
माझ्या अंतरात काया प्राप्त होते
माझ्या पाझरणाऱ्या व्यथेनं
ते सुंदर होतं
आणि तुझी शोभा माझ्यात आकर्षक होते !

●



## : १२२ :

मानसन्मान : सुखासीन जीवन
तुझ्यासाठी नाही हे
त्याच्याकडं पाठ फिरवून बाहेर ये !
बंधुंनो,
तुम्ही सारेच जण या
तुम्हा सर्वांचं सम्मेलन भरवू या -
माझ्यासारख्या नगण्य माणसाच्या घरी !
टीकेचं वस्त्र महावस्त्र म्हणून पांघरू !
कंटकाची माला कंठहार म्हणून लेवू
सारा अपमान : - त्याचं शिरस्त्राण करू
जो कुणी दुःखी कष्टी असेल
त्याच्या झोपडीतली धूळ कपाळी लावू
त्यागाची कटोरी हर्षोल्लासानं भरून घेऊ
मित्र हो
या
बाहेर या !

●

## : १२६ :

निंदा : दुःख : अपमान
हे सारं सहन करण्यानं काहीच नुकसान होत नाही
ह्याची मला आता जाणीव झाली आहे.
मातीत फतकल मारून बसल्यावर
रंगीत पाटाची कुणाला आठवण होणार आहे ?
तुझ्या प्रसादाची वाट बघत बसतो !

सारीजण माझी प्रशंसा करतात
माझ्याबद्दल छान छान बोलतात
त्यानं मला गुदगुल्या होतात
ते सारं खरं नसतं
हे मला माहीत असतं
पण त्या असत्याचा मुकुट
मी डोक्यावर चढवून
इतस्ततः भटकत असतो,
तेव्हा तुझ्याकडं यायला
मला वेळच नसतो !

●



## : १२८ :

तानपुऱ्याच्या तारा बरोबर नाहीत -
जीवनाच्या !
एक जाड आहे तर दुसरी बारीक !
त्यामुळं तो नीट बोलत नाही.
बेसूर वाजतो : भेसूर भासतो
त्यानं माझा जीव गलबलतो.
गायन मधेच विरामतं,
तानपुरा आता सुरेल राहिला नाही !
तुझ्या समेवर साद देणं अशक्य झालंय्
त्याची मला लाज वाटतेय्
माझं अंतःकरण पिंजून पिंजून निघतंय्
तुझ्या सत्‌शिष्यांच्या सांगाती
मला वावरता येत नाही
लांब...सर्वांच्या मागं
दाराशी तिष्ठत असतो

हा तानपुरा आता बेसुरा झालाय् !

●

## : १२९ :

प्रभो,
गीतात गुंफावेत असे शब्द नाहीत
वा कुणाला काही द्यावं असं अनुदान नाही
सारं मनांत, मूकपणं आहे तसंच आहे
असत्याची झूल पांघरून तुला सादर करतो.
तुझ्या समीप येतो.
जीवनाला परिपूर्णता येऊन
त्याची आराधना केव्हा संपेल कुणास ठाऊक ?
सेवा करतांना सहकाऱ्यांची
मनापासून आणि भरभरून अर्घ्य देत असतो
माझं दारिद्य लपवतांना
अनेकदा असत्याचा आश्रय घेत असतो.
पण तुझी प्रतारणा कशी करणार ?
तू सर्वज्ञ आहेस
माझ्याबद्दल तुला सर्वच ठाऊक आहे !
उदार अंतःकरणानं तू सारं स्वीकारशील

- आणि त्यामुळंच माझं दरिद्री हृदय
'यथास्यात् तथा'
तुझ्या पायाशी अर्पण !

●

## : १३० :

प्रभो,
ह्या जगांत मी आलो कारण
माझ्या जीवनांतून तुझी लीला प्रकट होणार आहे !
ह्या खोपटाची कवाडं उघडताच
माझा सारा अहंकार विरून जाईल !
ह्या आनंदमय संसारात
सारं ममत्व विराम पावेल
माझ्या मृत्यूनंतर देखील
तुझीच माया, तशीच अव्याहत सुरू राहील !
अशा रितीनं मी अमर होईन !
साऱ्या माझ्या इच्छाशक्ती
तुझ्या प्रेमातूनच विराम पावतील
ह्या सुखदुःखाच्या विचित्र जीवनांत
शेवटी तूच तेवढा उरशील.

●

## : १३१ :

अनामिक अवस्थेतून येणाऱ्या दुःखानं
नेत्र डबडबतात
डोळे उघडतांच कळतं की
अरे ! हे तर केवळ स्वप्नं !
आपण मातेच्या मांडीवर शांत झोपलोय् !

अपरिचित समजून त्याच्याशी
भांडण करायला बाह्या सरसावतो
आणि तुझं परिचित हास्य कानी पडतं !
मग कळतं, हे हिंदोळे तूच देतोस.
ह्या जीवनात सुखदुःखाची आंदोलनं
सतत चालू असतात.
बस्स ! तेवढं एकच आहे ह्या जीवनांत
माझं सर्वस्व बनू पाहतं.
पण हा सारा कल्लोळ पहाटेच्या प्रकाशांत
वितळून जाईल !
नेत्रावरलं अंधाराचं पटल
तुझ्या तेजःपुंज दर्शनानं
कुठल्या कुठं विरून जाईल !
●



## : १३३ :

माझ्या जीवनांतीसुद्धा
मी तुझा शोध घेतच राहीन !

नव्या प्रदेशांत मी जाईन
तिथं सारं काही नवनवीन असेल
त्या नवीनतेत मी देखील नवा होईन
नव्यानं तुला राखी बांधेन
आणि तरीही तुझा शोध घेणं चालू राहील !

तुला शेवट नाही : मुळीच शेवट नाही.
म्हणूनच तुझ्या नवलीला देखील संपत नाहीत
कुठल्या वेगळेपणानं मला रस्त्यात भेटशील
कुणास ठाऊक ?
हसत हसत माझ्या सामोरी येशील
मी मात्र माझ्या नवनवोन्मेषांत असेन
अगदी जवळ येऊन तू माझा हात धरशील
तरी देखील माझा शोध सुरूच राहील !
●

## : १३४ :

ह्या गीत समापनाच्या भैरवीत
सारे राग संपून जावोत
आणि त्यांच्या सुरांत
माझा आनंद उफाळून येवो !
मृण्मय क्षमा : वृक्षवेली : ही हिरवळ....
प्रमुदित होऊन स्मित हास्य करते.
जो हा आनंद !
जन्म मृत्यू हे जुळे भाऊ
आपल्याच वेडांत ह्या धरेवर संचार करतात
तो हा आनंद
माझ्या भैरवीतून स्रवू दे !

वादळाच्या रूपानं येऊन
निद्रितांना खडबडून जागं करणारा आनंद,
व्यथेच्या कमलदलावर
पाझरणाऱ्या नेत्रांनी तिष्ठत असलेला आनंद,
आपल्या जवळचं असेल नसेल ते
मृत्तिकार्पण करणारा हा आनंद,
सन्यस्त वृत्तीचा हा आनंद
माझ्या गायनाच्या शेवटच्या सुरांत
आकंठ भरून राहू दे !

●




## : १३५ :

जेव्हा मला सारीकडून जखडून ठेवतोस
तेव्हा त्या बंधनातून सुटका नाही असं वाटतं
मला निष्कासून टाकतो आहेस
माझ्या पायावर उभं राहणं अशक्य आहे
असं वाटतं
पण तसं नसतं !

मला पुन्हा बंधमुक्त करतोस
पुन्हा कडेवर उचलून धरतोस
तुझ्या बाहूच्या झोपाळ्यावर
सतत मला झोके देत असतोस !
मला भीति दाखवतोस : माझी झोप चळते
आणि झोपेतून उठवून भीति घालवून टाकतोस !
दर्शन देतोस : साद घालून हृदयस्थ होतोस
मग, कुठं अंतर्धान पावतोस, तेच कळत नाही.
वाटतं, मी तुला आता आचवलो
आणि क्षणार्धात तुझी साद येते
कुणास, ठाऊक कुठून !

●

## : १३६ :

अशक्त : बालक आहेस तोपर्यंत
अंतःकरणाच्या अंतर्गृहातच रहा

थोड्याशा आघातानं तुला मूर्च्छा येईल
थोडासुद्धा दाह तुला सहन होणार नाही.
भस्मसात होशील.
थोडा वेळ धुळीत खेळलास
तरीसुद्धा मातीत बरबटशील.
थोडा तकवा आला :
प्रभूच्या तेजस्वी अमृत पानानंतर,
प्राण चैतन्यमय झाले म्हणजे
खुशाल बाहेर पळत जा !
साऱ्या बंधनासहित
तू बंधमुक्त होशील !
धुळीत मनसोक्त लोळून सुद्धा
शुचिर्भूत राहशील !
मात्र तोपर्यंत
अंतःकरणातल्या अंतःपुरात रहा !

●



## : १३७ :

माझं मन तुझ्यात गुंतून पडलं तरच स्थिर होईल
आणि सत्याचरणी होईल
सच्चिदानंदा,
असं केव्हा बरं घडेल ?

त्या मंगल दिवसाची मी डोळ्यात तेल घालून वाट
बघतोय्
त्या सत्यालापांत माझ्या बुद्धीचा विनियोग होऊन
ती सत्यशरण होईल
आणि त्यामुळंच ह्या जगात मी
सीमातीत होऊन मुक्त होईन
असं केव्हा बरं घडेल ?

प्रभो तुझ्या पूर्ण प्रकाशाचं दर्शन
मला केव्हा बरं घडेल ?
तुला अनंत योजने लांब ठेवून
मी ह्या असत्यात मृतवत् : खितपत पडलोय्.
इथं माझा नुसता गोंधळ चालू आहे !
असंबद्ध जीवन जगतोय्
माझं ममत्व फेकून देऊन तुझ्यात सामावून जाईन
तेव्हाच मी पवित्र होईन
खऱ्या अर्थानं जिवंत असेन,
तुझ्या चरणी होणारा मृत्यू
मला चिरंजीवत्व बहाल करील
प्रभो,
असं केव्हा बरं घडेल ?

●

## : १३९ :

मला इतकं भरभरून दिलं आहेस तू
कि आता मी मेलो तरी मला वाईट वाटणार नाही !

अहोरात्र सुखावणाऱ्या सुखांनी,
यातना व्यथांनी,
हृदयवीणेच्या अनंत सुरांनी,
पुन्हा पुन्हा दारांत डोकावणाऱ्या
विविध स्वरूपातल्या तुझ्या दर्शनांनी
माझं चित्त हरण केलं आहेस;
मला जिंकून घेतलं आहेस
आता मी मेलो तरी मला वाईट वाटणार नाही.

तू सर्वार्थानं माझा झाला नाहीस
कारण मी तनमनानं तुझ्यात एकरूप झालो नाही.
ह्याची मला जाणीव आहे.
पण जे माझ्या पदरांत पडलं आहे
त्यात मी पूर्ण समाधानी आहे.
लोखंडाचं सोनं करणारा परीस मला दिलास तुझ्या
जवळचा
तुझ्या अस्तित्वाची जाणीव मला करून दिली आहेस
त्या श्रद्धेच्या नौकेनं हा सागर मी पार करीन
आता मी मेलो तरी मला वाईट वाटणार नाही.

●





## : १४० :

सारंगा !
होडी हांकणाऱ्या माझ्या मित्रा,
पैलतीरावरले पाव्याचे सूर तुला ऐकू येताहेत का ?
ह्या घाटावर ही होडी आज तरी थांबणार आहे का ?
ह्या काजळी सायंकाळी तिकडं दिव्यांचा झगझगाट
दिसेल कां ?
मला वाटतं
नदीच्या लहरी लहरीवरून वाहणारा हा समीर
पल्याडचे स्मित हास्य तिन्हीसांजेला
आपल्यापर्यंत पोहोचवतो आहे.
ह्या अंधारातून
येतांना मी काही फुलं खुडून आणली होती
त्यातल्या ताज्या फुलांना निवडून
ही परडी सजवून घे !

●

## : १४१ :

प्रभो,
हे मन : ही काया : ही कृष्ण सावली
नष्ट होऊ दे ! कायमची - !
ही माया जळून भस्म होऊ दे !
नाही तर सागराच्या तळाशी जाऊ दे
चरणावर नत होऊ दे नाही तर
ठोकून : पिटून : कुटून : पीठ होवू दे !
जिथं जातो तिथं ही मला आपल्या अस्तित्वानं
लाजवते.
ह्या कृष्णा छायेला माझ्यापासून दूर घेऊन जा
माझं श्रेष्ठत्व तुला अडचणीचं होणार नाही -
ह्या मायेला दूर पिटाळल्यावरच
तू मला परिपूर्ण दर्शन देशील !
●



## : १४४ :

प्रभो,
हे नामरूप गळून पडेल
तेव्हाच माझ्या स्वनिर्मित स्वप्नातून
सावध होईन;
मला मुक्ति मिळेल
तुझ्यात पुनर्जन्म होईल
तुझ्या स्वलिखित लेखावर
मी रेषा ओढतो आहे, आणि मीच लिहिला आहे
असं भासवतो
अशा भीषणतेत आणखीन् किती काळ कंठायचा ?
सर्वांची आभरणं ओरबाडून
ती आपल्यावर चढवतो
इतर गवयांचा गळा आवळून
मीच तेवढा गळा काढतो !
स्वतःची टिमकी वाजवणं सोडून देऊन
आनंदानं तुझं नामस्मरण करीन
तेव्हाच नावगांव विसरून
सर्वांच्यात सामावला जाईन
●

## : १४६ :

तुझ्याजवळ दयेची याचना...
त्याबद्दल मी अनभिज्ञ आहे.
आणि तरीही तू दयावंत होऊन आपल्या पायाशी खेचून
घेतोस !
मी माझ्या निर्मितीकार्यात दंग होऊन तुला
विसरून जातो
फलाफुलांनी सुखावतो !
ह्या क्षुद्र मृण्मयी क्रीडेत दंग झालोय्
म्हणून मला निस्कारून टाकू नकोस,
हवं तर चटके देऊन मला झोपेतून उठव
ह्या द्वैतात सत्य पेंगुळल्यासारखं झालं आहे,
त्याला चेतवण्याची किमया फक्त तुला ठाऊक आहे !
मृत्यूला उल्लंघून अमृत स्त्रवत राहतं
आणि दैन्याची प्रचंड पोकळी भरून टाकतं
पतनाच्या दुःखामध्ये चैतन्याचा आवाज होतो आहे
ह्या विरोधाभासांत
तुझं गंभीर आश्वासन कानांत घुमत राहतं !
●

## : १४७ :

जीवनातली आराधना : अर्चना अपूर्ण राहिली !
- म्हणून ती वाया गेली नाही
हे मला कळलं आहे !

अस्फुट कळी मातीत मिसळते
सरिता विराण वाळवंटात अंतर्धान पावते
म्हणून सारं वाया गेलं, असं नसतं
हे मला कळलं आहे
आयुष्यात जे काही अर्धवट राहिलं आहे
ते वृथा नाही
हे मला कळलं आहे !

मला जाणवलेलं : न जाणवलेलं
सारं तुझ्या वीणेवर झंकारत असतं
ते सारं नष्ट होत नाही
हे मला कळलं आहे !
●

## : १४९ :

प्रभो,
आयुष्यात जे अविरत आभासमय होतं
अरुणोदयीन आभेतदेखील अव्यक्तच होतं
ह्या अंतिम गीतात
माझी अखेरची समर्पणा !

त्याला व्यक्त करताना शब्द अडखळले
सुरांच्या मदतीनं सुद्धा गीतांना जमलं नाही
ते चित्रविचित्र रूप घेऊन
साऱ्यांच्या नजरा चुकवून
अज्ञात स्थळी लपून बसलं होतं !
ते अरुणोदयीन आभेतदेखील अव्यक्तच होतं !

त्याच्या समवेत अनेक देशात भटकलो
माझ्या साऱ्या जीवनाच्या व्यथा
साऱ्या कथा
त्याच्या भोवतीभोवतीच
गुंजारव करत होत्या !

साऱ्या विचारांत
साऱ्या आचारात
नयनी
शयनी
स्वप्नी
माझ्या सर्वस्वात भरून होतं
ते अरुणोदयीन आभेत देखील अव्यक्तच राहिलं.



निशिदिनी, अनेकांनी
त्यासाठी दार ठोठावलं
परंतु ते सारे निराशेनं परत फिरले
केवळ तुझ्याशी परिचित राहून
इतरांशी अपरिचितां प्रमाणं वागलं
आपल्याला आपल्यातच गुंतवून ठेवलं
ते अरुणोदयीन आभेत देखील अव्यक्तच राहिलं

●

## : १५० :

तुझ्या बरोबरचं रोजचं हे भांडण
माझ्या सहनशक्तीच्या पलीकडं आहे.
रोजच्या रोज माझ्या शिरावरचं हे कर्ज वाढतंच आहे !
भारदस्त दरबारी पोषाखात
अनेकजण तुला दंडवत घालून गेले.
पण ह्या दरिद्री वस्त्रामुळं
तुझ्यापासून मी लपत छपत दूर दूर जातोय्
त्यामुळं माझी दखल घेतली जात नाही !
अपमानित झाल्यामुळं मी मूग गिळून बसलो आहे
मग माझी व्यथा तुला सांगू तरी कशी ?
माझी तक्रार तुला कशी समजावी ?
प्रभो,
आता माघारी फिरवू नकोस
मानापमानापल्याड
तुझ्या पायाशी
कायमचा आश्रय दे !

●



## : १५३ :

प्रभो,
तुझ्या प्रेमाचा सेवक कधी बरं धाडशील ?
तो आला म्हणजे सगळया शंका कुशंकांचं निरसन होईल
माझ्याकडं येणारे सर्व मला भीति दाखवून माझ्यावर सत्ता गाजवतात.
पण माझं बंडखोर मन, कवाडं बंद करून
त्यांना पिटाळून लावतं - त्याला बळी न पडता !
पण तुझा सेवक आल्यावर सर्व अडचणी दूर होतील
सारी बंधनं तटातट तुटतील
त्याच्या आवाहनाला 'ओ' द्यावीच लागेच
मग घरांत डांबून कोण ठेवणार मला ?

त्याच्या आगमनाची पद्धत मला ठाऊक आहे
एकट्यानं संथ पावलं टाकीत येतो,
आपल्या गळयांतली पुष्पमाला हिंदोलत येतो,
त्या मालेनंच बांधून मला तो ओढील
तेव्हा ते हृदय स्तब्ध अन् निःशब्द होऊन जाईल !

●

## : १५४ :

प्रभो,
अनेक प्रकारांनी सुखमय क्रीडांनी
दुःखानं झरणाऱ्या नेत्रांनी
मला तू गीत गायला उद्युक्त केलं आहेस.
तुझा लपंडाव सतत चालू असतो,
वाटतं, मी तुला बांधून ठेवलं आहे
पण तू मोकळाच असतोस
न कळत जवळ येतोस
आणि टिचकी मारून पळून जातोस
राहून राहून माझे प्राण कंठाशी आणतोस
अनेक तऱ्हेनं मला गायला लावतोस
तुझ्या वीणेच्या तारा तार स्वरांतल्या !
जीवनाला असंख्य छिद्र पाडून
तो पावा तू वाजवतोस
त्या आर्त स्वरांनी जीव व्याकुळलाय्
आता तुझ्या पदारविंदाशी
त्याला शांतपणं विसावू दे
ह्या लांबलचक आयुष्यांत
अनेक पद्धतीनं तू मला गायला लावलं आहेस !

●

## : १५५ :

वाटतं, आता इथंच थांबावं
पण छे :
कसं शक्य आहे ते ?
तुझ्या सभेतून आमंत्रण येतं
नवनवीन स्वरांनी आणि गीतांनी -
हर्षोल्लसानं हृदय उचंबळून येतं
त्या सुरांचा पाठलाग करता करता
मीच हरवून बसतो.

सांजवेळीच्या सोनेरी किरणांत-
न्हालेली माझी सतार
पूरिया राग आळवू लागते
कधी मध्यरात्रीचा गंभीर राग
माझं जीवन संतृप्त करतं
माझं जीवन तुडुंब भरून टाकतं !
रात्रीचा विसर पडतो
आणि माझे नेत्र विस्फारून
रात्रीवर मात करतात.

●

## : १५६ :

माझ्या गायनाच्या समापनाच्या वेळी
मला सारखं वाटतं -
पूर्ततेत अपूर्तता सामावली असते.
सूर थांबले आहेत
पण त्याचा न्यास कुठं थांबलाय् ?
त्याला थांबायची इच्छाच नसते.

वीणा देखील मूकपणानं विनाकारण निनादते.
तिला छेडल्यावर सूर झंकारतात
पण सर्वोत्तम गीत मात्र दूर दूर असतं

दिनान्ती होणारे संध्येचे गंभीर स्वर
शान्त झालेल्या वीणेवर
तरंगत तरंगत हळूच येवून उतरतात -
सारे आलाप शांत झाल्यावर !

●



## सूची १

### इंग्रजी गीतांजलीत समाविष्ट असलेली बंगाली गीते

| इंग्रजी गीतांजली क्रमांक | | बंगाली गीतांजली क्रमांक |
|---|---|---|
| २ | तुमि जखन.... | ७८ |
| ३ | तुमि केमन करे.... | २२ |
| ६ | छिन्न करे लओ. | ८७ |
| ७ | आमार अेथं गान.... | १२५ |
| ८ | राजार मतो.... | १२७ |
| ९ | आर आमाय आमि.... | १०५ |
| १० | जेथाय थाके.... | १०७ |
| ११ | भजन पूजन साधन.... | ११९ |
| १३ | हेथा जे गान.... | ३९ |
| १४ | आमि बहुवासनाय.... | २ |
| १५ | आमि हेथाय थाकि.... | ३१ |
| १६ | जगते आनंदजज्ञे.... | ४४ |
| १७ | प्रेमेर हाते धरा देबो.... | १५१ |
| १८ | मेघेर परे मेघ.... | १६ |
| १९ | ओगो मौन.... | ७१ |
| २२ | आजि श्रावण घन.... | १८ |
| २३ | आजि झडेर राते.... | २० |
| २४ | दिवस जदि सांग.... | १५७ |

# सूची २

१ ओळीसमोरचा आकडा कवितेचा क्रमांक आहे पृष्ठ क्रमांक नाही

२ नंतरच्या शब्दाचे स्पष्टीकरण ह्याप्रमाणे

-'ह' = ही भेट प्रेमिकांची

बा - मालाकार

इ - गीतांजली इंग्रजीवरून

ब - गीतांजली बंगालीवरून

## आभार

कै. बाबासाहेब कापुसकर,
विश्वभारती,
वीणा आलासे,
प्रा. अमलकुमार डे,
सौ. सुनंदा डे,
डॉ. सौ. कमल म्हैसाळकर,
डॉ. वि. स. जोग,
श्रीकांत आणि हेमंत जहागीरदार,
डॉ. द. भि. कुळकर्णी
आणि
श्री. अप्पा देशपांडे